The Department of Public Instruction, Bombay.

# THE NAVANÎTA

OR

## SELECTIONS FROM MARÂTHÎ POETS.

ORIGINALLY COMPILED BY

PARASHURAMPANT TÂTYÂ GÔDABÔLE.

REVISED, ENLARGED AND IMPROVED FROM THE EDITION OF 1889,

BY

NÂRÂYAṆA BÂLAKRISHṆA GÔDABÔLE,

VICE-PRINCIPAL, POONA TRAINING COLLEGE.

**Fourth (new) Edition—10,000 Copies.**

*Registered for copy-right under the Government of India's Act XXV. of 1867.*

Bombay.

GOVERNMENT CENTRAL BOOK DEPÔT.

1895.



*Price One Rupee and Four Annas.*

मुंबई इलाख्यांतील सरकारी विद्याशाळाखातें.

# नवनीत

अथवा

# मराठी कवितांचे वेंचे.

हें पुस्तक,


कैलासवासी परशुरामपंत तात्या गोडबोले

ह्यांनीं प्रथमतः तयार केलें;

त्याच्या सन १८८९ ह्या वर्षी तयार झालेल्या आवृत्तीवरून

पुणें एथील ट्रेनिंग कालेजांतील व्हाइस प्रिन्सिपाल,

नारायण बाळकृष्ण गोडबोले

ह्यांनीं


शोधून, ज्यास्त व्याख्या देऊन तयार केलें.


चौथी ( नवी ) आवृत्ति.

१०,००० प्रती.





मुंबई.

गवर्नमेंत सेंत्रल बुक दीपो.

इसवी सन १८९५.




किंमत सव्वा रुपया.

# सन १८७८ सालीं तयार झालेल्या आवृत्तीची सूचना.

ह्या ग्रंथाची प्रथमावृत्ति सन १८५४ त छापिली; नंतर सन १८५७ त दुसरी छापिली. त्यावर सन १८६० ह्या वर्षी तिसरी छापिली. नंतर सन १८६२ त चौथी, सन १८६४ त पांचवी, सन १८६८ त सहावी, सन १८७१ त सातवी आणि सन १८७३ त आठवी, ह्याप्रमाणें आवृत्ति छापल्या गेल्या.

पहिल्या आवृत्तींतील कठीण वेंचे सर्व काढून त्या ठिकाणीं सुलभ वेंचे घालावे आणि सर्वांस समजण्यास सुलभ पडेल अशी ह्या पुस्तकाची नवी आवृत्ति काढावी, असें मेहरबान चात्फील्द साहेब, विद्याखात्याचे दैरेक्तर, ह्यांनीं ठरवून तें काम मेहरबान मेजर क्यांदी साहेब, मराठी ट्रान्स्लेतर, ह्यांच्या सूचनेवरून आह्मांकडे सोंपविलें. त्याप्रमाणें आह्मीं ही नवी आवृत्ति तयार केली आहे. ह्या आवृत्तींत सुधारणा केली आहे ती एणेंप्रमाणें:—

१. मागील आवृत्तींत जे फार दुर्बोध आणि अध्यात्मसंबंधी किंवा वेदांतसंबंधी वेंचे होते ते गाळून नवे सुलभ, मनोरंजक आणि तरुण पुरुषांनीं वाचण्यास योग्य असे वेंचे घातले आहेत.

२. सभ्य रीतीस सोडून जें वर्णन होतें तें काढलें आहे.

३. कवितेंतील सर्व शब्द निरनिराळे तोडून समासांतील शब्द(—) अशा खुणेनें निरनिराळे करून दाखविले आहेत.

४. कठीण स्थलांचा अर्थ समजण्याकरितां पुष्कळ टिपा दिल्या आहेत.

५. ज्या कवींचे उतारे घेतले आहेत त्यांचें स्वल्प चरित्र वेंच्यांचे आरंभीं माहिती मिळाली त्याप्रमाणें दिलें आहे.

६. आख्यानांच्या किंवा प्रकरणांच्या आरंभीं त्यांच्या मूळपीठिका ह्मणजे अवतरणें दिलीं आहेत.

७. रा० सा० भास्कर दामोदर ह्यांनीं छंदांविषयीं लिहिलेला निबंध

( ५ ) रामदास—ह्याच्या कवितेंतील जे वेंचे मागील आवृत्तींत घेतलेले आहेत त्यांतहि फारसे मनोरम नाहींत असे सुमारें २५ अभंग दिसले ते काढून त्यांच्या जागीं कांहीं सुरस स्फुट अभंग घातले आहेत; व ह्याच्या ज्ञानशतकांतील ( सत्संगतिशतकांतील ) वेंच्यांपैकीं बरेच गाळून वैराग्यशतकांतील सुमारें ५१ अभंग नवीन घेतले आहेत.

( ६ ) मोरोपंत—ह्याचें उत्तरगोग्रहण, सावित्रीचें आख्यान, भीष्मपर्व आणि द्रोणपर्व ह्यांमध्यें कथाभागाचें सूत्र जुळविण्याकरितां सुमारें २० आर्या ह्या आवृत्तींत ज्यास्त घातल्या आहेत; आणि केकावलि व संशयरत्नमाला ह्यांतहि पांच सहा पद्यें ज्यास्त घातलीं आहेत. ह्याचीं प्रकरणें भारतांतील पर्वांच्या अनुक्रमानें मागच्या आवृत्तींत घातलीं नव्हतीं; तीं ह्या आवृत्तींमध्यें तो अनुक्रम साधून घातलीं आहेत.

( ७ ) अमृतराय—ह्याच्या प्रकरणांपैकीं रामचंद्रावरचा कटाव विशेष चांगलासा न वाटल्यावरून तो काढून टाकिला आहे.

( ८ ) महीपति—ह्याच्या एकनाथचरित्रापैकीं ४४ पासून ५५ पर्यंत ओंव्या क्लिष्ट आणि वेदांतविषयक असल्यामुळें त्या काढून टाकिल्या आहेत.

( ९ ) रघुनाथपंडित—ह्याच्या नलोपाख्यानांतील १०१ व १४४ ह्या पद्यांचा अर्थ सरस लागला नाहीं व तीं गाळिलीं असतां कथेचा संबंध तुटतो असेंहि दिसलें नाहीं, ह्मणून हीं पद्यें गाळिलीं आहेत.

( १० ) अनंतफंदी—ह्याच्या प्रकरणांपैकीं माधवग्रंथांतील अध्याय १ ला हें प्रकरण पुष्कळांस नीरस वाटल्यावरून काढून टाकिलें आहे.

( ११ ) पदें वगैरे—मागच्या आवृत्तींतील पदांपैकीं कांहीं शुद्ध वेदांतपर होतीं तीं व दुसरीं कांहीं तादृश चित्तवेधक नव्हतीं ह्मणून तीं काढून दुसरीं चमत्कारिक व प्रायः भक्तिवैराग्यपर अशीं सुमारें २० पदें ह्या आवृत्तींत घातलीं आहेत.

( १२ ) कवींचीं चरित्रें व त्यांनीं केलेल्या ग्रंथांचीं नांवें ह्यांमध्यें कांहीं चुका आढळल्या त्या हल्लींच्या आवृत्तींत दुरुस्त केल्या आहेत.

( १३ ) मागील आवृत्तीत ज्या ज्या कठीण स्थली टिपा द्यावयाच्या राहिल्या होत्या त्या त्या स्थलीं व नवीन घेतलेल्या प्रकरणांवर पुष्कळ नव्या टिपा दिल्या आहेत; त्याचप्रमाणें मागच्या आवृत्तींतल्या बऱ्याच टिपा चुकलेल्या आढळल्या त्याहि एथेंच दुरुस्त केल्या आहेत. तसेंच टिपा दुरुस्त करितांना व नव्या देतांना पुष्कळ ठिकाणीं संबंधनिदर्शनाकरितां कथानकें लिहिणें अवश्य दिसलें, ह्मणून भारत, भागवत, रामायण, स्कंदपुराण इत्यादिकांतलीं तीं तीं कथानकें संक्षिप्तरीत्या टिपांमध्यें लिहिलीं आहेत.

( १४ ) कोश—मागच्या आवृत्तीमध्यें कोशांतल्या कित्येक शब्दांचे अर्थ अस्पष्ट व स्थलविशेषीं लागू न पडणारे असे जे नजरेस आले ते हल्लीं दुरुस्त केले आहेत. आणि सुमारें ३०० शब्द कठीण असून त्यांचे अर्थ कोशांत घातले नव्हते ते हल्लीं घातले आहेत.

( १५ ) लेखक, टाईप जुळणारे व प्रुफें तपासणारे ह्यांच्या प्रमादानें मागच्या आवृत्तींत ऱ्हस्वदीर्घांच्या, विरामचिन्हांच्या व समासाचे अवयव निराळे दाखविण्याविषयींच्या बऱ्याच चुका झाल्या होत्या, त्या दुरुस्त करण्याकरितां पुष्कळ यत्न केला; तथापि ह्या आवृत्तींतहि तशाप्रकारच्या कित्येक चुका राहिल्या आहेत असें दिसून आलें; त्या बहुतेक चुका शुद्धिपत्रांत दाखल केल्या आहेत.

( १६ ) धांवणें, माजीं, लागीं, बाहेरीं, जाणों, त्वरें, कैंचा, पैं, पां, पुढारां, पुढतीं, सांवरणें, हांसणें, ढेंकर, हांक, ओंवी, कृपें, पांटी, जेवीं, फांसा, वांया, हळूं, सांवळा, नवळीं, संवय, वांकुल्या, तुह्मांस इत्यादि शब्दांचे उच्चार कोणी सानुनासिक करितात व कोणी तसे करित नाहींत, आणि त्या योगानें त्यांची हांक, ओंवी इत्यादि सानुनासिक, व हाक, ओवी इत्यादि निरनुनासिक अशीं दोन्ही प्रकारचीं रूपें लिहिण्याची वहिवाट पडून गेली आहे. ती वहिवाट मोडणें अप्रशस्त आहे असें कित्येक विद्वानांचें मत पडल्यावरून अशा शब्दांचीं दोन्ही प्रकारचीं रूपें राखिलीं आहेत. अशाच समजुतीनें करूनियां, देऊनियां, इत्यादि शब्दांचीं ही दोन्ही प्रकारचीं रूपें एथें राखिलीं आहेत, त्यांत विशेषेंकरून करूनिया इत्यादि निरनुनासिक रूपें फार राखिलीं गेलीं आहेत; परंतु त्यांचीं निरनुनासिक रूपें जुन्या हस्तलिखित ग्रं-

थांत मात्र आवळतात; हल्लींच्या ग्रंथांत सानुनासिकच रूपें योजिलेलीं आढळतात.

( १७ ) मागची ह्मणजे सन १८७८ सालची आवृत्ति तयार करितेसमयीं पूर्वीच्या आवृत्तींतले ज्ञानेश्वर व मुकुंदराज ह्यांचे सर्व वेंचे आणि मोरोपंत, वामन इत्यादिकांचे कांहीं वेंचे गाळून टाकिले; ही गोष्ट पुष्कळ लोकांस रुचली नाहीं, असें ऐकण्यांत येतें. परंतु असें करण्याचें मुख्य कारण हें कीं, जीमध्यें बहुतेक वेंचे सामान्यतः प्रौढदशेस येऊं लागणाऱ्या विद्यार्थ्यांस स्वतः समजण्याजोगे किंवा निदान शिक्षकांनीं समजून दिले असतां समजण्याजोगे व त्यांच्या स्थितीस योग्य असतील अशी नवनीताची आवृत्ति तयार करण्याविषयीं शाळाखात्याचे मुख्य अधिकारी ह्यांचा हुकूम झाला होता. त्या हुकुमावरून अर्थात् प्रौढ विद्यार्थ्यांसहि दुर्बोध असे जे ज्ञानेश्वरींतल्या सारिखे शुद्ध वेदांतपर व मोरोपंताच्या रासारंभींच्या आर्यांसारिखे अतिगहन रचनेचे वेंचे होते ते गाळून टाकणें प्राप्त झालें. पुढें ही आवृत्ति तयार करण्याविषयीं मे० दैरेक्तर साहेब ह्यांचा सन १८८१ सालच्या जुलै महिन्यांत हुकूम आला, त्यांत देखील ही आवृत्ति सामान्य विद्यार्थ्यांस समजण्याजोगी असावी असें स्पष्ट लिहिलें आहे; त्यामुळें ह्या आवृत्तीमध्येंहि ज्ञानेश्वरींतल्यासारिखे लोकप्रिय वेंचे गाळणें प्राप्त झालें. आतां असे दुर्बोध वेंचे समजण्याची योग्यता ज्या विद्यार्थ्यांचे आंगीं आली असेल त्यांच्या अवलोकनांत तेहि यावे व इतर लोकांचेंहि मनोरंजन व्हावें, ह्मणून तसले वेंचे ज्यांत घातले आहेत असा नवनीताचा दुसरा भाग तयार करावा असा मुख्य अधिकारी ह्यांचा उद्देश आहे.

( १८ ) ही नवी आवृत्ति तयार होत असतां निबंधमालेच्या ७३व्या अंकामध्यें एका मार्मिक विद्वान् गृहस्थानें नवनीताच्या सन १८७८ सालच्या आवृत्तींतले कित्येक दोष काढून प्रसिद्ध केले. ह्या कृत्याबद्दल त्याचे आह्मी आभार मानितों. त्या दोषांची व्यवस्था आह्मी काय केली, हें थोडक्यांत दर्शवितों. त्यानें दाखविलेल्या दोषांपैकीं कांहीं दोष तो अंक प्रसिद्ध होण्यापूर्वींच आमच्या ध्यानांत येऊन ह्या आवृत्तींत आह्मीं ते दुरुस्त केले होते; व बाकीच्यांपैकीं जे वास्तविक दोष

आहेत असें दिसलें तेहि कित्येक त्यांच्या सूचनांप्रमाणें व कित्येक आह्मांस योग्य दिसलें त्याप्रमाणें दुरुस्त केले आहेत. आतां त्यांनीं दाखविलेल्या स्थलांपैकीं ज्यांत खरे दोष आहेत अशीं स्थलें फारच थोडीं आहेत. ही गोष्ट सविस्तर सिद्ध करित बसणें हें एथें अप्रासंगिक होय; तथापि सुज्ञ वाचकांची खात्री होण्यासाठीं तीबद्दल एथें थोडेंसें सुचविणें अवश्य दिसतें; तें असें:—

सन १७७८ सालची आवृत्ति तयार करणारांनीं जागजागीं मागच्या आवृत्तींतले पाठ फिरविले असें दाखविणें व ते सारे पाठभेद अगदीं अयोग्य झाले असें ठरविणें ह्याविषयीं त्या पत्रकाराचा मुख्यत्वेंकरून यत्न आहे. आतां त्यानें दाखविलेल्या कांहीं स्थलीं मागील आवृत्तींतल्या पाठांपासून भिन्न पाठ आहेत खरे; परंतु त्यांपैकीं भामाविलासाच्या ९ व्या श्लोकांतील 'प्रगटति' रुक्मिणीविलासाच्या १० व्या श्लोकांतील 'अहंकृति,' व ययातीचे आख्यानाच्या २३ व्या आर्येंतील 'दक्षकरें' हे पाठ, तीं तीं प्रकरणें नवीन आवृत्ति तयार करितेवेळीं सर्वसंग्रहाशीं ताडून पहात असतां, त्यांत सांपडले तसेच घेतले आहेत. सर्वसंग्रह हा ग्रंथ परशुरामपंत तात्यांनींच तपासलेला असून त्यांत कवींचे मूळचे पाठ कायम राखण्याविषयीं जितका प्रयत्न करवला तितका त्यांनीं केला, असा आमचा समज आहे. आतां त्यांनीं काढिलेल्या नवनीताच्या आवृत्तींमध्यें सर्वसंग्रहाच्या संबंधानें पाठभेद कां झाले असतील ते असोत, परंतु नवीन आवृत्तींत बहुतेक प्रसंगीं वर सांगितल्याप्रमाणें सर्वसंग्रहांतले पाठ घेतलेले असल्यामुळें अर्थातच ते तात्यांच्या आवृत्तींच्या संबंधानें पाठभेद दिसतात.

'दक्षकरें' ह्या पाठाविषयीं आणखी असें सुचवावयाचें आहे कीं, तात्यांच्या सन १८६४ व १८७३ ह्या सालींच्या आवृत्ति आमच्या पहाण्यांत आल्या, त्यांमध्यें जरी 'रक्षकरें' असा पाठ आहे, तरी त्या दोन्ही आवृत्तींच्या कोशांमध्यें 'दक्षकरें' हाच शब्द लिहिलेला असून तेथें त्याचा अर्थ 'उजव्या हातानें' असा दिला आहे; व तो शब्द त्या आवृत्तींत इतर कोणत्याहि प्रकरणांत आलेला आढळत नाहीं. ह्यावरून तात्यांचाहि उद्देश 'दक्षकरें' हाच पाठ कायम ठेवण्याचा असून 'द' आणि 'र' ह्या अक्षरांच्या रूपांमध्यें फार सादृश्य असल्यामुळें

कदाचित् छापणारांच्या हातून हा पाठभेद झाला असेल, असें ह्मणण्यास चिंता नाहीं. ह्याखेरीज 'दक्षकरें' हाच मूळचा पाठ असावा, हें अनुमान भारताच्या आदिपर्वांतील ७८ व्या अध्यायाच्या ( एष मे दक्षिणो राजन् पाणिस्ताम्रनखांगुलिः । समुद्धर गृहीत्वा मां कुलीनस्त्वं हि मे मतः ॥ ) ह्या २० व्या श्लोकावरूनहि होतें.

भीष्मपर्वाच्या २३ व्या आर्यैतील 'हा' ह्या पाठभेदाविषयीं सदर्हू पत्रकारानें जें लिहिलें आहे तें निराधार आहे. कारण सर्वसंग्रह आणि वर सांगितलेल्या तात्यांच्या आवृत्ति ह्या सर्वांमध्यें 'हा' असाच पाठ आहे.

लोपामुद्रासंवादाच्या १२ व्या श्लोकामध्यें 'मृदुसुपथिहुनी' आणि ययातीचे आख्यानांतील ३० व्या आर्येमध्यें 'विश्वसृष्टिपति' ह्या दोन स्थलीं मात्र इतर ग्रंथांच्या आधारावांचून पाठभेद केलेला आहे खरा. ह्यापैकीं पहिल्याच्या ठिकाणीं 'सुमृदुपतिहुनी' असा तात्यांच्या आवृत्तींत पाठ होता, व सर्वसंग्रहांत 'मृदुसुपतिहुनी' असा पाठ आहे, परंतु त्याचा अर्थ सरस लागत नाहीं, ह्मणून 'ति' च्या ठिकाणीं 'थि' घालून 'मृदुसुपथिहुनी' असें पाठांतर केलें आहे. दुसरें पाठांतर 'विश्वसृष्टिपति' ह्याचे ठिकाणीं तात्यांच्या आवृत्तींत 'विश्वदृष्टिपति' असा पाठ होता. परंतु पंतांनीं आपल्या आर्यैत हा शब्द भारतांतल्या ज्या श्लोकाच्या आधारानें घातला असावा असें दिसतें तो ( आदिपर्व—अध्याय ७८ वा श्लोक २९ 'यच्च किंचित्सर्वगतं भूमौ वा यदि वा दिवि । तस्याहमीश्वरो नित्यं तुष्टेनोक्तः स्वयंभुवा' ॥ ) हा आहे. ह्या श्लोकामध्यें विश्वदृष्टिपतित्वाचा कांहींच संबंध दिसत नाहीं. ह्याखेरीज 'सृ' ह्या अक्षराचें पूर्वार्ध शाई उडणें इत्यादि कारणांनीं नाहींसें झालें तर त्याची आकृति बहुतेक 'दृ' ह्या अक्षराच्या आकृतीसारखीच होते, ह्यामुळें लेखकादिकांच्याच प्रमादानें कदाचित् 'सृष्टि' ह्याचे ठिकाणीं 'दृष्टि' लिहिलें गेलें असावें. अशा समजुतीनें हा पाठभेद केलेला आहे.

सारांश, सन १८७८ सालाच्या आवृत्तींतले बहुतेक पाठभेद, तीं तीं प्रकरणें सर्वसंग्रहाशीं व इतर ग्रंथांशीं ताडून पहात असतां कवीचे मूळचे पाठ कोणते असावे हें ठरवून ते कायम राखण्याच्या उद्देशानेंच

केले आहेत. व थोडेसे पाठभेद नजरचुकीनेंहि झाले आहेत. योग्यकारणावांचून व आधारावांचून पाठभेद करणें हें अगदीं अप्रशस्त होय असें आमचेंहि पूर्ण मत आहे; परंतु अनेक पाठांपैकीं कवीचा मूळचा पाठ अमुकच आहे हें ठरविणें किती कठीण आहे व त्यामुळें त्या कामांत चुका होण्याचा संभव किती आहे, हें तें काम करणारांसच समजतें. असो, हल्लींच्या आवृत्तीमध्यें जे नवीन वेंचे घेतले आहेत त्यांमध्यें व स्थलविशेषीं जुन्या वेंच्यांतहि जेथें जेथें शंका आल्या तेथें तेथें जुन्या हस्तलिखित पुस्तकांवरून मूळचे पाठ ठरविण्याविषयीं व निरनिराळ्या प्रतींमध्यें निरनिराळे पाठ दृष्टीस पडून त्यांपैकीं मूळचा कोणता हें समजत नसल्यास संदर्भावरून त्यांतला योग्य कोणता दिसतो हें ठरविण्याविषयीं, करवला तितका यत्न केला आहे.

( १९ ) आतां शेवटीं इतकेंच सुचवितों कीं, ही आवृत्ति तयार करण्यामध्यें जरी वर सांगितल्या प्रकारचा पुष्कळ यत्न केला आहे, तरी तीमध्यें कदाचित् अनेक प्रकारचे अनेक दोष राहिले असतील; ह्याकरितां निबंधमालेंतील पत्रकारांसारिख्या पंडित, मार्मिक व लोकहितेच्छु गृहस्थांनीं व त्यांत विशेषेंकरून मोठमोठ्या शाळांतील मराठीभाषेच्या अध्यापकांनीं ह्या आवृत्तींतले जे दोष त्यांस दिसतील ते कृपा करून अगत्य कळवावे; ह्मणजे त्यांचा योग्यायोग्य विचार होऊन पुढच्या आवृत्तींत ते दुरुस्त होतील, व त्यांनीं तसें केल्यास शाळाखात्यांत नवनीताचें अध्ययन व अध्यापन करणाऱ्यांवरच केवळ नव्हत तर इतर सर्व मराठीभाषा जाणणाऱ्या लोकांवर त्यांचे मोठे उपकार होतील.

ही आवृत्ति तयार करण्याचे कामीं पूना ट्रेनिंग कालेजांतील संस्कृत व मराठी ह्या भाषांचे अध्यापक रा० रा० नारायण शास्त्री साठे ह्यांनीं पुष्कळ योग्य सूचना केल्या त्यांबद्दल त्यांचे आह्मी मोठे आभार मानितों.

मु० पुणें,<br>ता० ११ माहे जानेवारी,<br>सन १८८२.

रावजी शास्त्री गोडबोले.

# दुसऱ्या (नवीन) आवृत्तीची सूचना.

१. ही आवृत्ति तयार होऊन छापण्यास सुरवात झाली असतां मे० दैरेक्तर साहेब ह्यांजकडून पत्र आलें, त्यांत त्यांनीं असा सक्त हुकूम दिला कीं, नवनीतामध्यें जीं ग्राम्यधर्मसूचक पद्यें असतील तीं सर्व काढून टाकावीं. त्या हुकुमाअन्वयें मुक्तेश्वराचें दुष्यंतशकुंतलाख्यान, व मोरोपंताच्या काव्यांपैकीं ययातीचें आख्यान व दुष्यंतशकुंतलाख्यान हीं तर ह्या आवृत्तींतून मुळींच गाळून टाकावीं लागलीं. त्याचप्रमाणें प्रायशः प्रत्येक कवींच्या वेंच्यांतून कांहीं कांहीं पद्यें गाळावीं लागलीं; व तीं पद्यें गाळल्यामुळें जेथें जेथें पूर्वापर संबंध सुटतो असें वाटलें तेथें तेथें तो दर्शविण्यासाठीं गद्यरूपानें संक्षेपतः कथाभाग घातला आहे. त्याचप्रमाणें कांहीं कांहीं वेंचे विशेष सुरस वाटले नाहींत तेहि गाळून टाकिले आहेत.

२. ह्या आवृत्तींत मुक्तेश्वराचें हरिश्चंद्राख्यान, मोरोपंताचें अंबरीषाख्यान व कर्णपर्वातील कर्णार्जुनयुद्ध आणि कांहीं कवींचीं पदें असे सुरस व उपदेशपर वेंचे नवीन घातले आहेत.

३. सन १८७८ व सन १८८२ ह्या सालीं तयार झालेल्या नवनीताच्या आवृत्तींमध्यें पूर्वींच्या आवृत्तींतली ज्ञानेश्वराची कविता सारीच गाळून टाकिली होती. ती गाळण्याचें कारण त्या त्या सालीं छापलेल्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत दर्शविलें आहे. आतां कित्येक एज्युकेशनल इन्स्पेक्तर ह्यांचें मत असें पडलें कीं, ती गाळून टाकिली हें चांगलें झालें नाहीं. त्यावरून ती कविता ह्या आवृत्तींत घालण्याविषयीं मे० दैरेक्तर साहेब ह्यांचा हुकूम आला; परंतु त्या वेळीं ही आवृत्ति सुमारें अर्धी अधिक छापून तयार झाली होती ह्मणून ज्ञानेश्वरींतील वेंचे ( अध्याय १२ व १३ ) ह्या आवृत्तीमध्यें शेवटीं घालावे लागले.

४. पूर्वींच्या आवृत्तींतल्या चुका हल्लीं दुरुस्त केल्या आहेत. नवीन घातलेलीं प्रकरणें व त्यांत विशेषेंकरून ज्ञानेश्वरीचे अध्याय ह्यांतील

दुर्बोध स्थलें ह्यांवर पुष्कळ टिपा दिल्या आहेत. त्यांच्या साहाय्यानें वाचणाराला तीं प्रकरणें समजण्यास बहुधा अडचण पडणार नाहीं, असें वाटतें. ज्ञानेश्वरीच्या वेंच्यांतील शब्दांचीं जीं रूपें अगदीं जुन्या पुस्तकांत आढळलीं तींच एथें घातलीं आहेत; तेराव्या अध्यायांतील वेंच्यांपैकीं कांहीं फार गहन किंवा अश्लील वाटल्यावरून ते काढून टाकून संदर्भ जुळण्यासाठीं नवीन सुमारें २९ ओंव्या ज्यास्त घातल्या आहेत.

पुणें,
ता० ६ माहे सप्तेंबर,
सन १८८६.

**रावजी शास्त्री गोडबोले.**

---

## तिसऱ्या (नवीन) आवृत्तीची सूचना.

ही आवृत्ति तयार करित असतां, पूर्वींच्या आवृत्तींतल्या ज्या ज्या पद्यांमध्यें अश्लील किंवा असभ्य शब्द चुकून राहिलेले आढळले, तीं सारीं पद्यें काढून टाकिलीं आहेत. तसेंच ज्यांपासून वाचकांस विशेष सदुपदेश किंवा ज्ञान प्राप्त होण्यासारखें नाहीं, जीं विशेष मनोरंजक नाहींत, किंवा जीं विशेष पंथास अनुलक्षून आहेत, अशीं प्रकरणें, अभंग, श्लोक, कटाव इत्यादिक काढून टाकून त्यांचे ऐवजीं बोधपर, ज्ञानप्रद, रसभरित आणि विशेष पंथास अनुलक्षून नसणारीं अशीं प्रकरणें वगैरे घातलीं आहेत. ह्या आवृत्तीमध्यें केलेले मुख्य फेरफार एणेंप्रमाणें:—

१. मागील आवृत्तीच्या सूचनेमध्यें लिहिलेल्या अडचणीमुळें ज्ञानेश्वर हा कवि मागच्या आवृत्तींत शेवटीं घातला होता, तो ह्या आवृत्तीमध्यें कालानुक्रमाप्रमाणें प्रथम घातला आहे.

२. रामदासाच्या कवितेंत शेवटीं आणखी दहा अभंग व दोन करुणाष्टकें घातलीं आहेत.

३. आनंदतनयाचें मार्कंडेयाख्यान फारसें सरस नसून विशेष पंथास अनुसरून असल्यामुळें तें काढून टाकिलें; आणि त्याच्याऐवजीं ( का-

ऐतिहासिकसंग्रहामध्यें थोड्या दिवसांपूर्वी प्रसिद्ध झालेल्या ) नरहरिकृत 'गंगारत्नमाळा' नामक काव्यांतील वेंचे घातले आहेत. हें काव्य सुरस व प्रसादगुणप्रधान आहे; त्यांत गंगेच्या उगमापासून मुखापर्यंत जीं पुण्यक्षेत्रें व प्रख्यात ठिकाणें आहेत, त्यांचें वर्णन सुरस रीतीनें केलेलें आहे. तें वर्णन जरी पौराणिक रीतीचें आहे, तरी त्यापासून वाचकांचें मनोरंजन होऊन त्यांला नवीन माहितीहि पुष्कळ होण्याजोगी आहे. ह्या काव्यांतले जे वेंचे एथें घेतले आहेत, ते सुरस असून इतिहासदृष्ट्या संगतवार असे घेतले आहेत.

४. 'उमारमासंवाद' ह्या एकाच विषयावर आनंदतनयाचें एक व प्रभाकराचें एक अशीं दोन काव्यें मागच्या आवृत्तींत होतीं, ह्मणून त्यांपैकीं प्रभाकराचें ( कांहीं बरें असल्यामुळें तें ) कायम ठेवून आनंदतनयाचें काढून टाकिलें आहे.

५. 'सुदामचरित्र' व 'द्रौपदीवस्त्रहरण' ह्यांवर मोरोपंत व अमृतराय ह्या दोन कवींचीं काव्यें मागच्या आवृत्तीमध्यें होतीं; त्यांपैकीं पंतांचीं काव्यें विशेष ग्राह्य, ह्मणून तीं ठेवून अमृतरायाचे कटाव काढून टाकिले आहेत.

६. पुष्कळ आख्यानें नवनीतांतून वेळोवेळीं काढिलीं; परंतु त्यांतील शब्द कोशामध्यें तसेच राहून गेले होते, त्यांपैकीं आढळले ते हल्लीं काढून टाकिले आहेत; जे शब्द नवीन घालणें आवश्यक वाटलें, तें कोशांत घातले आहेत; आणि कित्येक शब्दांचे अर्थ अपुरे वाटल्यावरून ते पुरे केले आहेत.

७. एकंदर ग्रंथांतील टिपांमध्यें जेथें फेरफार करणें जरूर वाटलें, तेथें तो करून, आवश्यक वाटलें तेथें नवीन टिपाहि घातल्या आहेत.

हा सारा फेरफार करित असतां ग्रंथ उगीच मोठा न व्हावा ह्याविषयींहि सावधगिरी ठेविली आहे.

पुणें,
ता० ३१ माहे जुलै,
सन १८८९.

रावजी शास्त्री गोडबोले.

# चालू ( चौथ्या नवीन ) आवृत्तीची प्रस्तावना.

या आवृत्तींत ज्या आख्यानांस पूर्वीं अवतरणें दिलेलीं नव्हतीं त्यांस नवीन अवतरणें दिलीं आहेत. सर्व आख्यानें कोठून घेतलीं आहेत अशाबद्दल शोध करून ती माहिती दिली आहे. उदाहरणार्थ 'अंगद-शिष्टाई' एकनाथकृत 'भावार्थरामायण' या ग्रंथांतून घेतलें आहे इतकेंच पूर्वीं ठाऊक होतें परंतु युद्धकांड अध्याय १-८ मधून तें आख्यान घेतलें आहे ही माहिती नवीन आहे. तसेंच 'हरिश्चंद्राख्यान' हें मुक्तेश्वरकृत वनपर्वांतलें काव्येतिहाससंग्रहांतून घेतलें आहे. परंतु महाभारतांत वनपर्वांत या आख्यानाचें नांवहि कोठें सांपडलें नाहीं. सुभद्राहरण आर्या या आदिपर्वांतील ह्मणून मोरोपंताच्या कवितांत लिहिलें होतें त्यावर टिपेंत आह्मी या आर्या मोरोपंतकृत आहेत किंवा नाहींत अशा बद्दल संशय दाखविला आहे ( पृ० २२७ टीप ४ पहा ). परंतु शोधा अंतीं या आर्या मोरोपंतकृत तर खऱ्या परंतु त्या महाभारतांतील आदिपर्वांतील नसून **श्रीमद्भागवत** दशमस्कंधांतील आहेत असें मागाहून कळलें. दशमस्कंधाचे पूर्वार्ध व उत्तरार्ध असे दोन भाग आहेत. त्याला **बृहद्दशम** असें नांव मोरोपंतांनीं दिलेलें आहे. त्याचेंच दुसरें नांव **कृष्णविजय** असेंहि आहे. त्यापैकीं उत्तरार्धांतील ८६ व्या अध्यायांतील या आर्या आहेत असें रा० रा० **बा० दा० ओककृत काव्यसंग्रहा**वरून समजतें. अमुक एक केकेचा अर्थ कोणास पाहण्याची इच्छा उत्पन्न झाली तर सटीक केकावलीच्या पुस्तकांत ती केका कोठें पहावी हें कळावें याकरितां मोरोपंताच्या केकांपुढें कंसांत अंक दिले आहेत. या शिवाय टिपांत व मूळांत किर-

---

१ **लघुदशम** पंतांच्या **मंत्रभागवतांत** आहे असें रा० रा० ओक यांनीं काव्यसंग्रहांत छापलेल्या 'कृष्णविजय' याजवरील टिपेंत ह्मटलें आहे. (अंक १).

कोळ फेरफार पुष्कळ ठिकाणीं केलेले आहेत ते सूक्ष्मपणें वाचणाऱ्याच्या सहज ध्यानात येतील. कोशांतहि नवीन शब्द बरेच घातले आहेत. आज ही आवृत्ति सुमारें ६ वर्षांनीं निघत आहे तर त्यांत माझ्या अल्पमतीप्रमाणें जे शोध करावेसे वाटले तेवढे करून ही आवृत्ति छापिली आहे; तरी तींत कोठें कमी ज्यास्ती असेल तें कोणी कळविल्यास पुढील आवृत्ति निघेल तेव्हां त्या त्या स्थलांचा विचार अवश्य केला जाईल.

पुणें ट्रेनिंग कॉलेज,<br>
तारीख २० माहे<br>
दिजंबर, सन १८९४.

**ना० बा० गोडबोले,**<br>
व्हाइस प्रिन्सिपाल.

# अनुक्रमणिका.

## ६ रामदास.



## ७ मुक्तेश्वर.



## ८ मोरोपंत.

## ९ श्रीधर.



## १० अमृतराय.

# अनुक्रमणिका.

# ज्ञानदेव.

ह्याचा जन्म शके ११९७ श्रावण वद्य ८ स आळंदी एथें झाला. ह्याच्या आईचें नांव रखमाबाई व बापाचें नांव विठ्ठलपंत. विठ्ठलपंत हा पैठणाजवळील आपेगांवच्या गोविंदपंत नांवाच्या कुळकर्ण्याचा मुलगा, व रखमाबाई ही आळंदी एथील सिद्धोपंत कुळकर्ण्याची मुलगी. विठ्ठलपंतानें काशींतील रामानंद स्वामीकडून संन्यास घेतला होता; पण पुढें रखमाबाईच्या विनवणीवरून त्याच स्वामींनीं विठ्ठलपंताकडून पुनः गृहस्थाश्रम घेवविला. विठ्ठलपंत आळंदीस आपल्या सासरवाडीसच रहात असे. तेथें त्यास निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव व मुक्ताबाई अशीं चार मुलें झालीं. तीं सर्व बाळपणापासूनच विरक्त, विठ्ठलभक्त, व ज्ञानी अशीं होतीं. ही संन्याशाची संतति म्हणून ब्राह्मणांनीं त्या तिघां मुलांच्या मुंजी न करितां त्या सर्वांस वाळींत टाकिलें होतें. पुढें ज्ञानेश्वरानें पैठणास कांहीं अद्भुत चमत्कार केल्यामुळें तेथील ब्राह्मणांनीं हीं मुलें सामान्य नव्हेत, देवांश आहेत, असें समजून त्यांस शुद्धिपत्र दिलें व त्यांची क्षमा मागितली.

ज्ञानेश्वरानें ज्ञानेश्वरी*, अमृतानुभव, व पांसष्टी असे मुख्यत्वें ओंवीबद्ध ग्रंथ, व भक्तिपर, वैराग्यपर, व ज्ञानपर असे बहुत उत्कृष्ट अभंग केले आहेत. ह्याची वाणी सुरस असून उपमा, रूपकें, व दृष्टांत इत्यादिक अलंकारांनीं अशी परिपूर्ण आहे कीं, वाचकास वर्ण्य अर्थ जसा कांहीं प्रत्यक्ष डोळ्यांसमोर उभा राहतो. हा कवि आळंदी एथें शके १२१८ कार्तिक वद्य ८ स समाधिस्थ झाला.

निवृत्तिनाथ, सोपानदेव व मुक्ताबाई ह्यांचें जन्मस्थान, जन्मशकदिवस व हे समाधिस्थ झाल्याचीं स्थानें, मरणशक व दिवस खालीं लिहिल्याप्रमाणें आहेतः—

| कवीचें नांव. | जन्मशक व दिवस. | जन्मस्थान. |
|---|---|---|
| निवृत्तिनाथ | —शके ११९५ माघ वद्य १— | आळंदी. |
| सोपानदेव | —शके ११९९ कार्तिक शुद्ध १५— | ,, |
| मुक्ताबाई | —शके १२०१ आश्विन शुद्ध १— | ,, |

* या ग्रंथाचें नांव 'भावार्थदीपिका' असेंहि आहे.

| कवीचें नांव. | मरणशक व दिवस. | समाधिस्थान. |
| --- | --- | --- |
| निवृत्तिनाथ— | शके १२२० पौष वद्य ११— | त्र्यंबकेश्वर. |
| सोपानदेव— | शके १२१९ वैशाख शुद्ध ११— | सासवड. |
| मुक्ताबाई— | शके १२२० वैशाख वद्य ११— | तापीनदीच्या कांठीं. |

---

# ज्ञानेश्वरी.

## अध्याय १२ वा.

### ओंव्या.

जो सर्व भूतांचे ठायीं ॥ द्वेषातें नेणेचि कंहीं[1] ॥ आपे[2]-परु नाहीं ॥ चैतन्या[3] जैसें ॥ १ ॥ उत्तमातें धरिजे ॥ अधमातें अव्हेरिजे ॥ हें कांहींचि नेणिजे ॥ वसुधा जेवीं ॥ २ ॥ कां[4] रायाचें देह चाळूं[5] ॥ रंका परौतें[6] गाळूं[7] ॥ हें न ह्मणेचि कृपाळू ॥ प्राण पैं गा ॥ ३ ॥ गाईची तृषा हरूं ॥ व्याघ्रा विष होऊनि मारूं ॥ ऐसें नेणेचि कां करूं ॥ तोय जैसें ॥ ४ ॥ तैसी अघवियाचि[8] भूतमात्रीं ॥ एकपणें जया मैत्री ॥ कृपेसी धात्री[9] ॥ आपण जो ॥ ५ ॥ आणि मी हे भाष[10] नेणे ॥ माझें कांहींचि न ह्मणे ॥ सुख दुःख जाणणें ॥ नाहीं जया ॥ ६ ॥ वोर्षिये[11]-वीण सागरु ॥ जैसा जळें निर्भरु[12] ॥ तैसा निरुपचारु[13] ॥ संतोषी जो ॥७॥ हे[14] नौ, तो आवडे ॥ मज जीवाचेनि पाडें[15] ॥ हेंही एथ थोकडें[16] ॥ रूप करणें[17] ॥ ८ ॥ व्यापक[18] आणि उदास[19] ॥ जैसें कां आकाश ॥ तैसें जयाचें मानस ॥ सर्वत्र गा ॥ ९ ॥ संसार-व्यथे फिटला[20] ॥ जो नैराश्यें[21] विनटला[22] ॥ व्याधा हातोनि सुटला ॥ विहंगमु जैसा ॥ १० ॥ जो आत्मलाभासारिखें[23] ॥ गोमटें[24] कांहींचि न देखे ॥ ह्मणोनि भोग[25]-विशेखें ॥ हरिखेना जो ॥ ११ ॥ पैं आपुलें जें साचें ॥ तें कल्पांतींही न वेचे[26] ॥

---

१ कधीं. २ स्वकीय परकीय. ३ चिच्छक्तीला—चलनवलनादिक व्यापार जिच्या योगानें चालतात ती जीवनकला ज्याप्रमाणें सर्व जीवांमध्यें सारख्या भावानें राहते त्याप्रमाणें. ४ अथवा. ५ हालवूं, चालवूं. ६ एकीकडे, दूर. ७ टाकूं. ८ अवघ्या, सर्व. ९ पृथ्वी (आधार). १० बोलणें. ११ पर्जन्यवृष्टीवांचून. १२ पूर्ण भरलेला. १३ साधनावांचून. १४ इतकेंच नाहीं. १५ सारखेपणानें, प्रमाणें. १६ उणें, थोडकें. १७ दृष्टांत देऊन सांगणें. १८ सर्व भरून राहणारें. १९ निरपेक्ष, अलिप्त. २० मुकला, सुटला. २१ आशारहित असल्यामुळें. २२ शोभला; (पाठान्तर) निवटला: २३ आत्मज्ञानाच्या प्राप्तीसारखें. २४ चांगलें. २५ विशेष प्रकारच्या विषयांच्या उपभोगानें. २६ जात नाहीं.

हें जाणोनि गेताचें[1] ॥ न शोची जो ॥ १२ ॥ बोखटें[2] का गोमटें[3] ॥ हें कांहींचि तया नुमटे[4] ॥ रात्रि-दिवस न घटे[5] ॥ सूर्यासि जेवीं ॥ १३ ॥ ऐसा बोधुचि केवळु ॥ जो होऊनि असे निष्कळु[6] ॥ त्याहीवरी भजन-शीळु ॥ माझ्याठायीं ॥ १४ ॥ तरि तया ऐसें दुसरें ॥ आह्मां पैंढियंतें[7] सोयरें[8] ॥ नाहीं गा साचोकारें[9] ॥ तुझी आण पांडवा[10] ॥ १५ ॥ पैं र्था जयाचिया ठायीं ॥ वैषम्याची[11] वार्ता नाहीं ॥ रिपु-मित्रां दोहीं ॥ सरिसा[12] पैंडु[13] ॥ १६ ॥ कां घरींचिया उजियेड करावा ॥ पैरखियां[14] आंधार पाडावा ॥ हें नेणेचि गा पांडवा ॥ दीप जैसा ॥ १७ ॥ जो खांडावया घाव घाली ॥ कां लावणी जयानें केली ॥ दोघां एकचि साउली ॥ वृक्षु जैसा ॥ १८ ॥ नातरी इक्षुदंडु ॥ पाळितया[15] गोडु ॥ गाळितया कडु ॥ नोहेचि जेवीं ॥ १९ ॥ अरि-मित्रीं तैसा ॥ अर्जुना जया भाव ऐसा ॥ मानापमानीं सरिसा ॥ होत जाय ॥ २० ॥ तिहीं ऋतूं[16] समान ॥ जैसें कां गगन ॥ तैसा एकचि मान ॥ शीतोष्णीं जया ॥ २१ ॥ दक्षिण उत्तर मारुता ॥ मेरु जैसा पांडु-सुता ॥ तैसा सुखें-दुःख-प्राप्तां[17] ॥ मध्यस्थु जो ॥२२॥ माधुर्यें[18] चंद्रिका ॥ सरिशी राया रंका ॥ तैसा जो सकळिकां ॥ भूतां समु ॥ २३ ॥ अवघिया जगा एक ॥ सेव्य जैसें उदक ॥ तैसे जयातें तिन्ही[19] लोक ॥ आकां-क्षिती[20] ॥ २४ ॥ जो निंदेतें ने घे ॥ स्तुतीतें न श्लाघे ॥ आकाशा न लगे ॥ लेपु[21] जैसा ॥ २५ ॥ तैसें निंदे आणि स्तुति ॥ मान करूनि एके[22] पंक्ती ॥ विचरे प्रांण-वृत्ती[23] ॥ जनीं वनीं ॥ २६ ॥ जो यथा-लाभें संतोखे ॥ अलाभें नें[24] पाँखे[25] ॥ पाऊसेंवीण न सुके ॥ समुद्र जैसा ॥२७॥ आणि वायूसि एके ठायीं ॥ बिढार[25] जैसें नाहीं ॥ तैसा न धरीच कहीं[26] ॥ आश्रय जो ॥ २८ ॥ हें विश्वचि माझें घर ॥ ऐशी मती जयाची स्थिर ॥ किंबहुना चराचर ॥ आपण जाहला ॥ २९ ॥ मग यावरी ही पार्था ॥ माझ्या भजनीं आस्था ॥ तरी तयातें मी माथां ॥ मुकुट करीं ॥ ३० ॥

---

१ गेलेल्याविषयीं. २ वाईट. ३ सुंदर, चांगलें. ४ उमटत नाहीं, भासत नाहीं. ५ घडे. ६ एकरूप, कलंकरहित, शुद्ध. ७ आवडतें. ८ जिवलग. ९ खरोखर. १० अर्जुना. ११ भेदबुद्धीची. १२ सारखी योग्यता. १३ परक्यांना. १४ राखणाराला. १५ चरकांत घालून रस काढणाराला. १६ ऋतूंत. १७ सुखदुःखें प्राप्त झालीं असतां. १८ आल्हादकप-णानें. १९ शत्रु, मित्र, उदासीन हे तीन किंवा स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ. २० इच्छितात. २१ कशाचाहि लेप. २२ ओळीला. २३ प्राण राहतील अशा प्रकारानें. २४ रुसत नाहीं, दुःखी होत नाहीं. २५ राहणें, वस्ती. २६ कोठें.

## अध्याय १३ वा.

### ओंव्या.

अ-मानित्व ॥ तरि केवणेही [2]विषींचें ॥ [3]सौम्य होणें न रुचे ॥ सं-भावितपणाचें ॥ वोझें जया ॥ १ ॥ ओथिलेचि गुण वानितां ॥ मान्य-पणें मानितां ॥ योग्यतेचें येतां ॥ अंगा रूप ॥ २ ॥ तैं [4]गजबजों लागे कैसा ॥ व्याधें [5]रुंधला मृगु जैसा ॥ कां [6]बाहीं तरतां [7]वेंळसा ॥ [8]दाटला जेवीं ॥ ३ ॥ पार्था तेणें पाडें ॥ सन्मानें जो [9]सांकडे ॥ गरिमेतें अंगाकडे ॥ येवोंच नेदी ॥ ४ ॥ पूज्यता डोळां न देखावी ॥ स्व-कीर्ति कानीं नायकावी ॥ हा अमुका ऐसी [10]नोहांवी ॥ [11]सेचि लोकां ॥ ५ ॥ तेथ सत्काराची [12]कें गोंठी ॥ [12]कें [13]ओंदरा देईल भेटी ॥ [14]मैरणेसीं सौंटी ॥ न-मस्कारितां ॥ ६ ॥ वाचस्पतीचेनि पाडें ॥ सर्वज्ञता तरी जोडे ॥ परि वेडिवेमाजि दडे ॥ महिमे भेणें ॥ ७ ॥ चातुर्य लपवी ॥ महत्त्व हारवी ॥ पिसेपण मिरवी ॥ आवडोनी ॥ ८ ॥ लौकिकाचा [15]उद्वेगु ॥ शास्त्रांवरी [16]उबगु ॥ [17]उगेपणीं चांगू ॥ आथी भेरू ॥ ९ ॥ जगें अव-ज्ञाचि करावी ॥ संबंधीं [18]सोयरें न धरावी ॥ ऐसी ऐसी जीवीं ॥ चाड बहु ॥ १० ॥ माझें असतेपण लोपो ॥ नामरूप हारपो ॥ मज झणें [19]वोसिपो ॥ भूत-जात ॥ ११ ॥ [20]अ-दंभित्व ॥ तरि अ-दंभित्व ऐसें ॥ लोभियाचें मन जैसें ॥ जिवु जावो परि [21]नुमसे ॥ ठेविला [22]ठोंवो ॥ १२ ॥ तयापरी किरीटी ॥ पाडिलाही प्राण-संकटीं ॥ परि सु-कृत ना प्रकटी ॥ [23]अंगें बोलें ॥ १३ ॥ [24]नाना क्षीरवळु आपुलें ॥ [25]पांघुरवी पेरिलें ॥ तैसें झांकी निपजलें ॥ दान-पुण्य ॥ १४ ॥ [26]वैरिवरी देह न पूंजी ॥

---

१ आपल्या गुणांच्या स्तुतीविषयीं निरिच्छा. २ कोणत्याहि गोष्टींत हा अमुकाच्या बरोबरीचा आहे असें ह्मणणें ज्याला आवडत नाहीं. ३ आहेत तेच. ४ घाबरूं लागतो. ५ अडविला. ६ हातांनी पोहून जात असतां. ७ भोंवऱ्यांत. ८ सांपडला. ९ संकटांत पडलो. १० न व्हावी. ११ स्मरण. १२ कोठची, कसली. १३ आदराला. १४ मरणाची संगाते झाली असें वाटतें ह्मणजे मरणप्राय वाटतें. १५ कंटाळा, भीति. १६ उपेक्षा, कंटाळा. १७ कांहीं न करितां स्वस्थ बसण्यांत ज्याचा भर आहे. १८ संबंध्यांशीं मिळून राहत नाहीं. १९ प्राणिमात्र मला कदाचित् भितील ते न भिओत. २० आंत एक व बाहेर एक असें न वागणें–किंवा लोकांकरितांच क्रिया करण्याचा स्वभाव नसणें. २१ उघड करित नाहीं. २२ ठेव. २३ आपण स्वत: बोलून दाखवून. २४ अथवा. २५ आच्छादी, लपवून ठेवी. २६ बाहेरून थाटमाट करित नाहीं.

लोकातें ने रंजी ॥ स्वधर्म वाग्व्जीं ॥ बांधों नेणे ॥ १५ ॥ परोप-
कार न बोले ॥ न मिरवी अभ्यासिलें ॥ न शके विकूं जोडिलें ॥
कीतीसाठीं ॥ १६ ॥ शरीर-भोगाकडे ॥ पाहतां कृपण आवडे ॥
येऱ्हवीं धर्म-विषयीं थोडें ॥ बहु न ह्मणे ॥ १७ ॥ किंबहुना स्वधर्मीं
थोरु ॥ अवसरीं उदारु ॥ आत्म-चर्चे चतुरु ॥ येऱ्हवीं वेडा ॥ १८ ॥
पैं गा अ-दंभपण ॥ ह्मणितलें तें हें जाण ॥ आतां आईक खुण ॥ अ-
हिंसेची ॥ १९ ॥ अ-हिंसा ॥ तरि अ-हिंसा बहुतीं परी ॥ बोलिली असे
अवधारीं ॥ आपुलालिया मतांतरीं ॥ निरूपिली ॥ २० ॥ परि ते
ऐसी देखा ॥ जैशा खांडूनियां शाखा ॥ मग तयाचिया बुडुखा ॥
कुंपु कीजे ॥ २१ ॥ कां बाहु तोडोनि पचविजे ॥ मग भुकेची पीडा
राखिजे ॥ नाना देऊळ मोडोनि कीजे ॥ पौळि देवा ॥ २२ ॥ तैसी
हिंसाचि करूनि अ-हिंसा ॥ निपजविजे हा ऐसा ॥ पैं पूर्व-मीमांसा ॥
निर्णयो केला ॥ २३ ॥ जे अ-वृष्टीचेनि उपद्रवें ॥ गोंदलें विश्व आघवें ॥
ह्मणोनि पर्जन्येष्टी करावे ॥ नाना याग ॥ २४ ॥ तंव तिये इष्टीचिया
बुडीं ॥ पशु-हिंसा तंव रोकडी ॥ मग अ-हिंसेची थडी ॥ कैंची दिसे ॥२५॥
पेरिजे नुसुधी हिंसा ॥ तेथ उगवेल काय अ-हिंसा ॥ परि नवल बापा
धिंवेसा ॥ या याज्ञिकांचा ॥ २६ ॥ आणि आयुर्वेदु आघवा ॥ तो
याचि मोहेंरा पांडवा ॥ जो जीवाकारणें करावा ॥ जीव-घातु ॥ २७ ॥
नाना-रोगें आंहाळ्लीं ॥ लोळ्तीं भूतें देखिलीं ॥ ते हिंसा निवारावया
केली ॥ चिकित्सा पैं ॥ २८ ॥ तंव ते चिकित्से पैहिले ॥ एकाचे
कंद खाणविले ॥ आणि एका उपडविलें ॥ स-मूळीं स-पत्रीं ॥ २९ ॥
एकें ओडेमोडविलीं ॥ अ-जंगमाची खोल काढविली ॥ एकें गर्भिणी
उकडविलीं ॥ पुटांमाजी ॥ ३० ॥ अहो वसतीं धवळारें ॥ मोडूनि

१ रंजवित नाहीं. २ आपलें सदाचरण आपण बोलून दाखवित नाहीं. ३ प्रतिष्ठेसाठीं आपण संपादिलेलें खर्चीं घालित नाहीं. ४ दिसे, वाटे. ५ आत्मज्ञानाच्या वाटाघाटीविषयीं. ६ ऐक. ७ कुंपण. ८ आवार. ९ कर्मकांडसंबंधीं शंकांचें ज्यांत निवारण केलें आहे असा जैमिनीनें केलेला ग्रंथ त्यांत. १० निर्णय. ११ पीडलेलें. १२ यज्ञयागादिकर्म त्याच्या. १३ नुसती. १४ फार इच्छा, उत्साह. १५ वैद्यशास्त्र. १६ मार्गीचा, दिशेकडे. १७ पीडलीं, पोळलीं. १८ प्राणी. १९ रोगाचा प्रतीकार. २० आरंभीं. २१ तोडून साफ केलीं. २२ वृक्षाची साल. २३ विंचू वगैरे प्राणी सगर्भ असतां तळून त्यांची औषधांत योजना करितात त्यास अनुलक्षून हें लिहिलें आहे. २४ पुटपाक करून. २५ राहण्याचीं घरें, मंदिरें.

केलीं देव्हारें ॥ नागऊनि वेव्हारें ॥ गवांदी घातली ॥ २१ ॥ मस्तक पांघुरविलें ॥ तंव तळवटीं उघडें पडिलें ॥ घर मोडोनि केले ॥ मांडव पुढें ॥ २२ ॥ नाना पांचरुणें ॥ जाळूनि जैसें तापणें ॥ कां जालें आंगधुणें ॥ कुंजराचें ॥ २३ ॥ नातरी बैल विकूनि गोठा ॥ पुंस लावोनि बांधिजे गांठा ॥ इया करणीं कीं चेष्टा ॥ काइ हंसों ॥ २४ ॥ एकीं धर्माचिया वाहणी ॥ गाळूं आदरिलें पाणी ॥ तंव गाळितया ओहाळणी ॥ जीव मेले ॥ २५ ॥ एक न पचवितीचि केण ॥ इये हिं-[11]सेचें भेणें ॥ तेथ केंदर्थले[12] प्राण ॥ तेचि हिंसा ॥ २६ ॥ ऐसी हे अ-वधारीं ॥ निरूपिती परी ॥ आतां ययावरी ॥ मुख्य जें गा ॥ २७ ॥ तें स्व-मत बोलिजेल ॥ अ-हिंसे रूप किजेल ॥ जियें[13] उठलिया आं-तुल[14] ॥ ज्ञान दिसे ॥ २८ ॥ परि ते अधिष्ठिलेनि[15] अंगें ॥ जाणिजे आचरतेनि[16] बागें ॥ जैसी कसवटीचि सांगे ॥ वानियातें[17] ॥ २९ ॥ तैसें ज्ञानमनाचिये भेटी ॥ सरिसेंचि अ-हिंसेचें बिंबें[18] उठी ॥ तेंचि ऐसें कि-रीटी ॥ परिस आतां ॥ ४० ॥ तरि तरंगु नोलांडितु[19] ॥ लहरी पाये न फोडितु ॥ सांचलु[20] न मोडतु ॥ पाणियाचा ॥ ४१ ॥ वेगें आणि लेसों[21] ॥ दिठी घालूनि आंविसों[22] ॥ जळीं बकु जैसा ॥ पाउल सुये ॥ ४२ ॥ कां कमळावरी भ्रमर ॥ पाय ठेविती हळुवार[24] ॥ कुंचंबेल[25] केसर ॥ इया शंका ॥ ४३ ॥ तैसे परमाणुपांगुंतले[26] ॥ जाणूनि जीव सानुले[27] ॥ तेथ कारुण्यामाजि पाउलें ॥ लंपवूनि चालिले[28] ॥ ४४ ॥ ते वाट कृपेची करितु ॥ ते दिशाचि स्नेहभरितु ॥ जीवां तळीं आंथरितु ॥ आपुला जीवु ॥ ४५ ॥ ऐसिया जतना ॥ चालणें जया अर्जुना ॥ हें अनिर्वाच्य, परिमोणा ॥ पुरिजेना[29] ॥ ४६ ॥ पैं मोहेंचेनि[30] सांगडें ॥

१ व्यापारी. २ अन्नसत्र. ३ शेकत बसणें. ४ पोपट. ५ हाकून लावून. ६ पिंजरा. ७ त्या कर्तव्यगोष्टी किंवा थट्टा. ८ संप्रदायाप्रमाणें. ९ गाळण्याच्या वस्त्राच्या. १० त्रासानें. ११ कणामध्यें जीवनशक्ति आहे तिचा नाश होईल त्या भीतीनें. १२ त्रासले. १३ जी अहिंसा उत्पन्न झाली असतां. १४ आंतलें. १५ ती अहिंसा अंगीं बाणली असतां. १६ आचरणाच्या मार्गानें. १७ कसाला. १८ स्वरूप दिसूं लागतें. १९ न ओलांडतां. २० स्थिरता. २१ फार जपून. २२ आमिषाकडे. २३ ठेवितो. २४ फार हळू. २५ चिरडेल. २६ परमाणूंनीं आच्छादिलेले. २७ अतिशय लहान. २८ फार जपून चालतो. २९ त्याचें ममताळूपणाचें वर्तन बोलून दाखवितां येत नाहीं व तें किती आहे हें मापतां येत नाहीं म्हणजे किती मोठें आहे हें कळत नाहीं. ३० लोभानें, प्रीतीनें.

लेसी पिलीं धरी तोंडें ॥ तेथ दांतांचे आगरडे ॥ लागती जैसे ॥ ४७ ॥ कां स्नेहाळू माये ॥ तान्हयाची वास पाहे ॥ तिये [4]दिठी आहे ॥ हळूवार जें ॥ ४८ ॥ तैसेनि मार्दवें पाय ॥ भूमिवरी न्यसीतु जाय ॥ लागती तेथ होय ॥ जीवां सुख ॥ ४९ ॥ ऐसिया लेंचिमा चालतां ॥ कृमि कीटक पांडु-सुता ॥ देखे, तरि माघुता ॥ हळूचि निघे ॥ ५० ॥ मुंगिये मेरु नोलांडवे ॥ मशका सिंधु न तरवे ॥ तैसें भेटलिया न करवे ॥ अति-क्रम ॥ ५१ ॥ पुढां स्नेह पाझरे ॥ माघां चालती अक्षरें ॥ शब्द पाठीं अवतरे ॥ कृपा आधीं ॥ ५२ ॥ तंव बोलणेंचि नाहीं ॥ बोलों ह्मणे जरी कांहीं ॥ तरि बोलूं कोणाही ॥ खुपेल कां ॥ ५३ ॥ बोलतां अधिकुहि निघे ॥ तरि कोणाही वर्मीं न लगे ॥ आणि कवणासि न रिघे ॥ शंका मनीं ॥ ५४ ॥ तैसें साच आणि मवाळ ॥ मितलें आणि रसाळ ॥ शब्द जैसे कल्लोळ ॥ अमृताचे ॥ ५५ ॥ अवयव आणि शरीर ॥ हे वेगळाले काय कीरें ॥ कीं रस आणि नीर ॥ सिनोंनीं आथी ॥ ५६ ॥ ह्मणोनि हे जे सर्व ॥ सांगीतले बोह्य-भाव ॥ तें मनचि गा सावयव ॥ ऐसें जाण ॥ ५७ ॥ जें भुई बीज खोविलें ॥ तेंचि वरी रुंख जाहलें ॥ तैसें इंद्रिय-द्वारा फांकलें ॥ अंतरचि कीं ॥ ५८ ॥ पैं मानसींचि जरी ॥ अ-हिंसेची अवसरी ॥ तरि कैंचीं बाहेरी ॥ वोसंडेलें ॥ ५९ ॥ वांचूनि मनींचि नाहीं ॥ तें वाचेसि उमटेल काई ॥ बीजेंवीण भुई ॥ अंकुर असे ॥ ६० ॥ ह्मणोनि मनपण जैं मोडे ॥ तैं इंद्रिया आधींचि उबडें ॥ सूत्रधारेंवीण सोइरवडें ॥ बांवो जैसें ॥ ६१ ॥ उगमींचि वाळूनि जाये ॥ तें वोघीं कैचें वाहे ॥ जीवो गेलिया आहे ॥ चेष्टा देहीं ॥ ६२ ॥ तैसें मन हेतु पांडवा ॥ मूळ यया इंद्रिय-भावा ॥ हेंचि रोहटे आघवा ॥ द्वारीं इहीं ॥ ६३ ॥ परि जिये वेळीं जैसें ॥ जें होऊनि आंत असे ॥ बाहेरि ये तैसें ॥ व्यापार-

१ मांजरी. २ अणकुच्या, अग्रें, टोंकें. ३ वाट. ४ तिच्या दृष्टीमध्यें जसें कारुण्य दिसून येतें तसें हें कारुण्य. ५ ठेवित चालतो. ६ हळूहळू. ७ अनादर, उल्लंघन. ८ सत्य व मृदु. ९ मोजकें, परिमित. १० निश्चयानें. ११ वेगळे वेगळे. १२ बाहेरील वागणुकीचे प्रकार. १३ पेरिलें. १४ वृक्ष, झाड. १५ प्रतिबंध, हरकत (पाठा०) अनवसरी. १६ बाहेर कशी येईल! १७ शिवाय. १८ रिकामें, व्यर्थ. १९ कळसूत्री बाहुलें. २० व्यर्थ २१ कारण. २२ व्यापार करितें.

रूपें ॥ ६४ ॥ यालागीं साचोकारें ॥ मनीं अ-हिंसा थांवे थोरें ॥ जैसी पिकेली द्रुती औंदरें ॥ बोभांत निघे ॥ ६५ ॥ तैसें दयालुत्व आपुलें ॥ मनें हेंताथायां ओंणिलें ॥ मग तेथ उपजविलें ॥ अ-हिंसेतें ॥ ६६ ॥ याकारणें किरीटी ॥ इंद्रियांचिया गोठी ॥ मनाचि येचि राहाटी ॥ रूप केलें ॥ ६७ ॥ ऐसा मनें देहें वाचा ॥ सर्व संन्यास दंडांचा ॥ जाहाला ठायीं जयाचा ॥ देखशील ॥ ६८ ॥ तो जाण वेल्हाळ ॥ ज्ञानाचें वेळांउळ ॥ हें असो निखळें ॥ ज्ञानचि तो ॥ ६९ ॥ क्षांति ॥ क्षोणे उन्मेष-सु-लोचना ॥ सावध होई अर्जुना ॥ करूं तुज ज्ञाना ॥ वोळखी आतां ॥ ७० ॥ तरि ज्ञान गा तें एथें ॥ वोळख तूं निरुतें ॥ ऑक्रोशेंवीण जेथें ॥ क्षमा असे ॥ ७१ ॥ अ-गाध सरोवरीं ॥ कमळिणी जियापरी ॥ कां सदैवांचिया घरीं ॥ संपत्ति जैसी ॥ ७२ ॥ पार्था तेणें पाडें ॥ क्षमा जयातें वाढे ॥ तोही लक्षे तें फुडें ॥ लक्षण सांगों ॥ ७३ ॥ तरि पढियंतें लेणें ॥ अंगीं भावें जेणें ॥ धरिजे, तेविं साहणें ॥ सर्वचि जया ॥ ७४ ॥ त्रिविध मुख्य आघवे ॥ उपद्रवांचे मेळावे ॥ वरि पडलिया नव्हे ॥ वांकडा जो ॥ ७५ ॥ अपेक्षित पावे ॥ तें जेणें तोषें मानावें ॥ अनपेक्षिताहि करवे ॥ मान तोचि ॥ ७६ ॥ जो मानापमानातें साहे ॥ सुख-दुःख जेथ सामाये ॥ निंदास्तुती नोहे ॥ दुखंडु जो ॥ ७७ ॥ उन्हाळेनि जो न तापे ॥ हिमवंतीं न कांपे ॥ कायसेनिही न वोसिपे ॥ पातलेया ॥ ७८ ॥ स्व-शिखरांचा भारु ॥ नेणे जैसा मेरु ॥ कीं धरा यज्ञ-सूकरु ॥ वोझें न ह्मणे ॥ ७९ ॥ नाना चराचरीं भूतीं ॥ दाटणी नव्हे क्षिती ॥ तैसा नाना द्वंद्वप्राप्ती ॥ घामेजेना ॥ ८० ॥ घेऊनि जळाचे लोट्ट ॥ आलिया नदी-नदांचे संघाटु ॥ करी वाँड पोटु ॥ समुद्र

१ पूर्ण स्थिरावते. २ पिकलेल्या फळांचा वगैरे. ३ सुवास. ४ आपण होऊन. ५ बोभाट करित. ६ त्यास आकार दिला. ७ त्रिदंडी संन्यास. ८ विस्तृत, आवडतें. ९ घर. १० सर्व. ११ ह्याचा अध्याहृत कर्ता 'कृष्ण.' १२ ज्ञानदृष्टि आहे ज्याला अशा. १३ खरें. १४ दुःखावांचून. १५ अनाक्रोश क्षमायुक्त पुरुष पूर्ण मनांत येईल तें लक्षण स्पष्ट सांगतों. १६ ज्या आवडीनें. १७ आधिदैविक–(देवतेच्या क्षोभापासून होणारा ताप–जसा वीज पडणें, सांत येणें, इ०); आध्यात्मिक–(मनाच्या क्षोभापासून किंवा शारीररोगापासून होणारा ताप इ०); आणि आधिभौतिक–(पृथिव्यादि पंचमहाभूतांच्या क्षोभापासून होणारा ताप–धरणीकंप इ०); असे त्रिविध ताप. १८ सामावलें जातें. १९ दुभंगलेला. २० हिंवाळ्यांत. २१ कशानेंहि. २२ भीत नाहीं. २३ प्राप्त झालेल्यास. २४ वराह अवतार. २५ सुखदुःखादिद्वंद्वांच्या प्राप्तीनें. २६ समुदाय. २७ मोठें.

जेवीं ॥ ८१ ॥ तैसें जयाचिया ठायीं ॥ न साहणें कांहींचि नाहीं ॥ आणि [1]साहतु ऐसेंही ॥ स्मरण नुरे ॥ ८२ ॥ शरीरा जें पातलें ॥ तें करूनि घाली आपुलें ॥ तेथ [2]साहतेनि नेवलें ॥ [3]घेपिंजेना ॥ ८३ ॥ हे अनाक्रोश क्षेमा ॥ जेथ आथी प्रियोत्तमा ॥ जाण तेणें महिमा ॥ ज्ञानासि गा ॥ ८४ ॥ तो पुरुष पांडवा ॥ ज्ञानाचा ओलावा ॥ आतां परिस आर्जवा ॥ रूप करूं ॥ ८५ ॥ [4]आर्जव ॥ तरि आर्जव तें ऐसें ॥ प्राणाचें [5]सौजन्य जैसें ॥ आवडतयाहि [6]दोषें ॥ एकचि पैं गा ॥ ८६ ॥ कां तोंड पाहूनि प्रकाशु ॥ न करी जेवीं चंडांशु ॥ जगा एक अवकाशु ॥ आकाश जैसें ॥ ८७ ॥ तैसें जयाचें मन ॥ माणुसाप्रति [7]आन आन ॥ नोहे, आणि वर्तन ॥ ऐसें पैं तें ॥ ८८ ॥ जें जगचि [8]सनोळख ॥ जगेंसीं जुनाट सोयरिक ॥ आप पर हे [9]भाखं ॥ जाणणें नाहीं ॥ ८९ ॥ भलतेणेंसीं [10]मेळें ॥ पाणिया ऐसा [11]ढोळु ॥ कवणे विखीं [12]आंडळु ॥ ने घे चित्त ॥ ९० ॥ [13]वारियाची धांव ॥ तैसे सरळ भाव ॥ शंका आणि [14]हांव ॥ नाहीं जया ॥ ९१ ॥ मायेपुढें बाळका ॥ रिगतां नाहीं शंका ॥ तैसें मन देतां लोकां ॥ [15]नालोची जो ॥ ९२ ॥ [16]फांकल्यिा इंदीवरा ॥ [17]पारिखर नाहीं धनुर्धरा ॥ तैसा कोन-कोपरा ॥ नेणेचि जो ॥ ९३ ॥ चो[18]खोळपण रत्नाचें ॥ रत्नावरी किरणाचें ॥ तैसें पुढां मन जयाचें ॥ करणें पाठी ॥ ९४ ॥ दिठी नोहे [19]मिणघी ॥ बोलणें नाहीं [20]संदिग्धी ॥ कवणेंसीं [21]हीनबुद्धी ॥ राहाटों नेणे ॥ ९५ ॥ दाहाही इंद्रियें [22]प्रांजळें ॥ [23]निःप्रपंचें निर्मळें ॥ [24]पांचही पालव मोकळे ॥ आठही [25]पाहर ॥ ९६ ॥ अमृताची धार ॥ तैसें उजू अंतर ॥ किंबहुना जो माहेर ॥ या चिन्हाचें ॥ ९७ ॥ तो पुरुष सुभटा ॥ आर्जवाचा [26]आंगवटा ॥ जाण तेथेंचि [27]घरटा ॥ ज्ञानें केला ॥ ९८ ॥ **गुरु-भक्ति** ॥ आतां ययावरी ॥

---

१ सहन करितों. २ सहन केल्याबद्दलच्या आश्चर्यानें गुंडाळला जात नाहीं. ह्मणजे ज्याला सहन केल्याबद्दल आश्चर्य वाटत नाहीं. ३ दुःखावांचून शांति. ४ कापट्यराहित्य, सरळपणा. ५ प्रीति. ६ उद्देशानें. ७ निरनिराळें. ८ ओळखीचें. ९ बोलणें. १० संगति. ११ रीत. १२ अडथळा. १३ वाऱ्याची. १४ इच्छा. १५ विचार करित नाहीं. १६ फुलल्लेल्या. १७ गुप्त ठिकाण. १८ प्रकाशितपणा. १९ ओशाळलेली. २० संशयात्मक. २१ हा नीच आहे अशा समजुतीनें. २२ सरळ. २३ विषयाविषयीं विमुख. २४ अंतःकरणपंचक—अंतःकरण, मन, चित्त, बुद्धि, अहंकार २५ प्रहर. २६ स्वरूप किंवा मूर्ति. २७ ठिकाण.

गुरु-भक्तीची परी ॥ सांगों गा अवधारीं ॥ चतुर-नाथा ॥ ९९ ॥ तैसें संबाह्य आपुलें ॥ जेणें गुरु-कुळीं वोपिलें ॥ आपण पैं केलें ॥ भक्तीचें घर ॥ १०० ॥ तिये कडोनि येतसे वारा ॥ देखोनी धांवे सामोरा ॥ [2]आडपडे ह्मणे घरा ॥ [3]बीजें कीजो ॥ १०१ ॥ परि गुरु-आज्ञा धरिलें ॥ देह गांवीं असें एकलें ॥ [4]वांसरुवा लाविलें ॥ दांवें जैसें ॥ १०२ ॥ ह्मणे कैं हें बिरडें [6]फिटेल ॥ कैं तो स्वामी भेटेल ॥ युगाहूनि वडिल ॥ निमिष मानी ॥ १०३ ॥ ऐसे या गुरु-ग्रामीचें आलें ॥ कां स्वयें गुरु-नींचि धाडिलें ॥ तरि गतायुष्या जोडलें ॥ आयुष्य जैसें ॥ १०४ ॥ कां सुकतया अंकुरा ॥ वरि पडिलिया पीयूष-धारा ॥ नाना अल्पोदकींचा सागरा ॥ आला मासा ॥ १०५ ॥ नातरी रंकें निधान देखिलें ॥ कां आंधळिया डोळे उघडले ॥ भणंगाचिया आंगा आलें ॥ इंद्र-पद ॥ १०६ ॥ तैसा गुरु-कुळींचेनि नांवें ॥ महा-सुखें अती थोरावे ॥ जे कोडें हंन पोटीं-ळवे ॥ आकाश कां ॥ १०७ ॥ पैं गुरु-कुळीं ऐसी ॥ आवडी जया देखसी ॥ जाण ज्ञान तयापाशीं ॥ पोंइकी करी ॥ १०८ ॥ **अर्चन** ॥ कां [12]चैतन्याचिये पोवळी ॥ माजि आनंदाचिया राउळीं ॥ [13]श्री-गुरु-लिंगा [14]ढाळी ॥ [15]ध्यानामृत ॥ १०९ ॥ उदयिजतां बोधार्का ॥ [16]बुद्धीची डाळ सात्विका ॥ भरोनिया त्र्यंबका ॥ लाखोली वाहे ॥ ११० ॥ कौळ-शुद्धी [17]त्रि-काळीं ॥ [18]जीवदशा धूप जाळी ॥ ज्ञान-दीपें वोवाळी ॥ निरंतर ॥ १११ ॥ [19]सामरस्याची [20]रससोय ॥ अखंड अर्पित जाय ॥ आपण [21]भराडा होय ॥ गुरु तो लिंग ॥ ११२ ॥ **सख्य** ॥ एकाधिये वेळे ॥ गुरु माय करी भाव-बळें ॥ मग [22]स्तन्य-सुखें लोळे ॥ अंकावरी ॥ ११३ ॥ नातरी गा किरिटी ॥ चैतन्य-तरु-तळवटीं ॥ गुरु धेनु आपण पोटीं ॥ वत्स होय ॥ ११४ ॥ गुरु-कृपा-स्नेह-सलिलीं ॥ आपण होय मासोळी ॥ कोणे एके वेळीं ॥ हेंचि भावी ॥ ११५ ॥ गुरु-कृपामृताचें [23]वेंडप ॥ आपण सेवा-वृ-

---

१ अंतर्बाह्य ( शरीर व मन ). २ नमस्कार घालितो. ३ आगमन. ४ वासराला. ५ पेंडें. ६ सुटेल. ७ मोठें. ८ भिकाऱ्याच्या. ९ पादपूरणार्थक अव्यय. १० आलिंगवे. ११ चाकरी. १२ ज्ञानाच्या. १३ श्रीगुरुरूप लिंग ( महादेवाचें ) त्यास. १४ घाली. १५ ध्यानरूप अमृत ( उदक ). १६ शुद्धसत्वगुण जी बुद्धि हीच डाळ. १७ तिन्ही शुद्ध काळीं. १८ जीवत्वरूप. १९ ऐक्याची. २० पाक किंवा पक्वान्न. २१ गोसावी, पुजारी. २२ स्तनांतील दूध पिण्याच्या सुखानें. २३ वृष्टि.

तीचें होय रोप ॥ ऐसेसे संकल्प ॥ विये मन ॥ ११६ ॥ चक्षु-पक्षेंवीण ॥ पिलूं होय आपण ॥ कैसें पैं अपारपण ॥ आवडीचें ॥ ११७ ॥ गुरुतें पक्षिणी करी ॥ चारा घे चोंचूवरी ॥ गुरु तारू, धरी ॥ आपण कास ॥ ११८ ॥ ऐसे प्रेमाचेनि थावें ॥ ध्यानचि ध्यानें प्रसवे ॥ पूर्ण-सिंधू हेलावे ॥ फुटती जैसे ॥ ११९ ॥ किंबहुना यापरी ॥ श्रीगुरु-मूर्ती अंतरीं ॥ भोगी, आतां अवधारीं ॥ बाह्य सेवा ॥ १२० ॥ दास्य ॥ तरि जीवीं ऐसे आवांके ॥ ह्मणे दास्य करीन निकें ॥ जैसेनि गुरु कौतुकें ॥ माग ह्मणती ॥ १२१ ॥ तैसिया साच्या उपास्ती ॥ गोसावी प्रसन्न होती ॥ तेथ मी विनंती ॥ ऐशी करीन ॥ १२२ ॥ ह्मणेन तुमचा देवा ॥ परिवार जो आघवा ॥ तेतुलीं रूपें होआवा ॥ मीचि एक ॥ १२३ ॥ आणि उपकरतीं आपुलीं ॥ उपकरणें आथी जेतुलीं ॥ माझीं रूपें तेतुलीं ॥ होआवीं स्वामी ॥ १२४ ॥ ऐसा मागेन वरु ॥ तेथ हो ह्मणती श्री-गुरु ॥ मग तो परिवारु ॥ मीचि होईन ॥ १२५ ॥ उपकरण-जात सकळिक ॥ तें मीचि होईन एकैक ॥ तेव्हां उपास्तीचें कौतुक ॥ देखिजेल ॥ १२६ ॥ आपुलिया गुणांचीं लेणीं ॥ करिन गुरु-सेवे स्वामिणी ॥ हें असो, होईन गेवसणी ॥ गुरु-भक्तीसी ॥ १२७ ॥ गुरु-स्नेहाचिये वृष्टी ॥ मी पृथ्वी होईन तळवटीं ॥ ऐसिया मनोरथांचिया सृष्टी ॥ अनंता रची ॥ १२८ ॥ ह्मणे श्री-गुरुचें भुवन ॥ आपण मी होईन ॥ आणि दास होऊनि करीन ॥ दास्य तेथिंचें ॥ १२९ ॥ नाट मी काढीन ॥ शेज मी झाडीन ॥ चरण-संवाहन ॥ मीचि करीन ॥ १३० ॥ जंव देह हें असेल ॥ तंव वोळगी ऐसी कीजेल ॥ मग देहांतीं नवल ॥ बुद्धि आहे ॥ १३१ ॥ परि जीत मेला न संडीं ॥ निमेष लोकां न धाडीं ॥ ऐसेनि गणावया कोडी ॥ कल्पांचिया ॥ १३२ ॥ जो गुरु-दास्यें कृशु ॥ जो गुरु-प्रेमें संपोषु ॥ जो गुरु-आज्ञे निवासु ॥ आपणचि ॥ १३३ ॥ गुरु-सं-

---

१ चोंचीनें. २ पूर्णत्वानें, बळानें. ३ पुष्कळ ध्यानें. ४ लाटा. ५ हुरूप धरतो. ६ भक्तीनें. ७ गुरु. ८ व्हावा. ९ उपयोगाचीं. १० आच्छादन, पिशवी. ११ पाय रगडणें. १२ सेवा. १३ देहावसान झालें तरी गुरूची सेवा करण्याची त्याची बुद्धि तशीच राहते ह्यांत नवल काय? १४ कोट्यवधि कल्पपर्यंत जरी लोक ह्याच्या गुरुसेवेचा काळ मोजूं लागले तरी तेवढ्या काळांत एक निमेषभरहि तो व्यर्थ जाऊं देत नाहीं हें तात्पर्य. १५ पुष्ट.

प्रदाय-धर्म ॥ तेचि जयाचे वर्णाश्रम ॥ गुरु-परिचर्या[1] नित्य-कर्म ॥ जयाचें गा ॥ १३४ ॥ गुरु क्षेत्र गुरु देवता ॥ गुरु माता गुरु पिता ॥ जो गुरु-सेवेपरता ॥ मार्ग नेणे ॥ १३५ ॥ जयाचें वक्त्र ॥ वाहे गुरु-नामाचे मंत्र ॥ गुरु-वाक्यावांचूनि शास्त्र ॥ हातीं न शिवे ॥ १३६ ॥ जया इये भक्तीची चाड ॥ जया इये विषयींचें कोड ॥ जो हे सेवेवांचूनि गोड ॥ न मनी कांहीं ॥ १३७ ॥ तो तत्त्व-ज्ञानाचा ठावो ॥ ज्ञाना तेणेंचि आवो[2] ॥ हें असो, तो देवो ॥ ज्ञान भक्त ॥ १३८ ॥ शुचित्व ॥ ह्मणे शुचित्व गा ऐसें ॥ जयापाशीं दिसे ॥ आगमन[3] जैसें ॥ कापुराचें ॥ १३९ ॥ का रत्नाचें दैंळवाडें[4] ॥ जैसें सबाह्य चोखडें ॥ आंत बाहेरि एके पाडें ॥ सूर्य जैसा ॥ १४० ॥ बाहेरि कर्में क्षाळला ॥ भीतरीं ज्ञानें उजळला ॥ इहीं दोहीं परी आला ॥ पोखाळा[5] एका ॥ १४१ ॥ किंबहुना यिया परी ॥ बाह्य चोख अवधारीं ॥ आणि ज्ञान-दीप अंतरीं ॥ ह्मणोनि शुद्ध ॥ १४२ ॥ येऱ्हवीं तरी पांडु-सुता ॥ अंतर शुद्ध नसतां ॥ बाहेरि कर्म तों सर्वथा ॥ विटंबु गा ॥ १४३ ॥ मृत जैसा शृंगारिला ॥ गाढव तीर्थीं न्हाणिला ॥ कडु-दुधिया माखिला ॥ गुळें जैसा ॥ १४४ ॥ तैसें कर्मी[6] वैरिचिलेकडां ॥ न सरे थोरें मोलें कुडां[7] ॥ नव्हे मदिरेचा घडा ॥ पवित्र गंगे[8] ॥ १४५ ॥ ह्मणोनि अंतरीं ज्ञान व्हावें ॥ मग बाह्य लाभे स्वभावें ॥ वरि ज्ञान कर्में संभवे ॥ ऐसें कें[9] जोडे ॥ १४६ ॥ यालागीं बाह्य भाग ॥ कर्में धूतला चांग ॥ ज्ञानें फिटला[10] वंग ॥ अंतरींचा ॥ १४७ ॥ तेथ अंतर-बाह्य गेलें ॥ निर्मळत्व एक जाहलें ॥ किंबहुना उरलें ॥ शुचित्वाचि ॥ १४८ ॥ पाणियें हिरा न भिजे ॥ आधणीं हरळ[11] न शिजे ॥ तैशी विकल्प-जातीं न लिंपिजे ॥ मनोवृत्ति ॥ १४९ ॥ तया नांव शुचित्वपण ॥ पार्था गा संपूर्ण ॥ हें देखसी तेथ जाण ॥ ज्ञान असे ॥ १५० ॥ स्थैर्य ॥ आणि स्थिरता साचें ॥ घर रिघाली जयाचें ॥ तो पुरुष ज्ञानाचें ॥ आयुष्य गा ॥ १५१ ॥ देह तरी वैरिचिलीकडे ॥ आपुलिया परी हिंडे ॥ परी बैसेका[12] न मोडे ॥ मानसींची ॥ १५२ ॥ कां लोभियें[13] दूर जाये ॥ परी

१ गुरूची सेवा. २ तकवा, डौल. ३ प्राप्ति (पा०) आंग मन. ४ घनवटपणा, भरीवपणा. ५ निर्मळपणास, स्वच्छतेस. ६ बाह्यात्कारीं. ७ हीन पदार्थ (कुडा) मोठ्या मोलानें जात नाहीं. ८ गंगेमध्यें. ९ कोठें मिळे? १० कलंक. ११ खडा, दगड. १२ आत्मस्वरूपीं पडलेली बैठक. १३ लोभी पुरुष.

जीव ठेवों ठांये ॥ तैसा देह चालतां न होय ॥ चळु चित्ता ॥ १९३ ॥ जातया अभ्रांसवें ॥ जैसें आकाश न धांवे ॥ [2]भ्रमण-चक्रीं न [3]भवे ॥ ध्रुव जैसा ॥ १९४ ॥ [4]पांथिकांचिया येरझारा ॥ सवें पंथ न चले धनुर्धरा ॥ कां नाहीं जेविं तरु-वरां ॥ येणें जाणें ॥ १९५ ॥ तैसा चळण-वळणात्मकीं ॥ असोनि ये [5]पांच-भौतिकीं ॥ [6]भूतोर्मीं एकीं ॥ चळीजेना ॥ १९६ ॥ वाहुटोळीचेनि बळें ॥ पृथ्वी जैशी न ढळे ॥ तैसा [7]उपद्रव-उमाळें ॥ न लोटे जो ॥ १९७ ॥ दैन्य-दुःखीं न तपे ॥ भय-शोकीं न कंपे ॥ देह-मृ[8]त्यु न वासिपे ॥ पातलेनी ॥ १९८ ॥ आकाश हें वों-सरो ॥ पृथ्वी [9]वरि विरो ॥ परि नेणें [10]मोहरों ॥ चित्त-वृत्ति ॥ १९९ ॥ क्षीरार्णवाचिया कल्लोळीं ॥ कंप नाहीं मंदराचळीं ॥ आकाश न जळे जाळीं ॥ वणवियाच्या ॥ १६० ॥ तैशा आल्या गेल्या उर्मी ॥ नव्हे गजबज मनोधर्मी ॥ किंबहुना [11]धैर्य-क्षमीं ॥ कल्पांतींही ॥ १६१ ॥ हें स्थैर्य [12]निधडें ॥ जेथ अंगें जीवें जोडे ॥ तें ज्ञानाचें उघडें ॥ निधान साचें ॥१६२ ॥ **आत्म-निग्रह** ॥ आणि ईसाळु जैसा घरा ॥ कां [14]दं-दिया हतियेरा ॥ न विसंबे भांडारा ॥ लुब्धकु जैसा ॥ १६३ ॥ कां [15]एकलौतिया बाळका ॥ [16]वॅरिपडौनि ठाके अंबिका ॥ मधुविषीं मधु-मक्षिका ॥ लोभिणी जैशी ॥ १६४ ॥ अर्जुना जो यापरी ॥ अंतःकरण जतन करी ॥ नेदी उभे ठाकों द्वारीं ॥ इंद्रियांच्या ॥ १६५ ॥ अगा अंतःकरण-निग्रहो जो ॥ तो हा हें जाणिजो ॥ हा आथी तेथ विजयो ॥ ज्ञानाचा पैं ॥ १६६ ॥ **विषय-वैराग्य** ॥ आणि [17]विषयांविखीं ॥ वैराग्याची निकी ॥ [18]पुरवणी मानसीं कीं ॥ [19]जिती आथी ॥ १६७ ॥ वमिलिया अन्ना ॥ लाळ न घोंटी जेवीं रसना ॥ अंग [20]नें [21]सूये आलिंगना ॥ प्रेताचिया ॥ १६८ ॥ विष खाणें नोंगवे ॥ जळत घरीं न रिघवे ॥ व्याघ्र-विवरा न [22]वेंचवे ॥ [23]वस्ती जेवीं ॥ १६९ ॥ [24]धेंडाडीत लोह-रसीं ॥ उडी न घालवे

---

१ ठेंव्याजवळ गुंतून राहतो. २ फिरणाऱ्या नक्षत्रमंडळांत. ३ फिरे. ४ वाटसराच्या. ५ ह्या पंचमहाभूतात्मक सृष्टींत. ६ पंचमहाभूतांच्या एकाहि विकारानें. ७ उपद्रवांच्या लोटानें. ८ नाश पावो. ९ अथवा, शिवाय, आणखी. १० मागें फिरण्यास. ११ धैर्य आणि क्षमा ह्यांनीं युक्त. १२ बळकट. १३ ब्रह्मराक्षस. १४ योद्धा. १५ एकुलत्या. १६ जवळ होऊन. १७ विषयांविषयीं. १८ पुरवटा. १९ जिवंत. २० घालित नाहीं. २१ न रुचे (पाठा०) नांगवे. २२ जांववे. २३ राहण्यास. २४ रसरशीत.

जैशी ॥ न करवे उशी ॥ अजगराची ॥ १७० ॥ अर्जुना तेणें पाडें ॥ जयाशीं विषय-वार्ता नावडे ॥ नेदी इंद्रियांचेनि तोंडें ॥ कांहींचि जावों ॥ १७१ ॥ बहु योगाभ्यासीं हांव ॥ विजनाकडे धांव ॥ न साहे जो नांव ॥ संघाताचें ॥ १७२ ॥ नाराचांचीं आंथरुणें ॥ पूय-पंकीं लोळणें ॥ तैसें लेखी भोगणें ॥ ऐहिकीचें ॥ १७३ ॥ आणि स्वर्गातें मानसें ॥ ऐकोनि मानी ऐसे ॥ कुहिलें पिशित जैसें ॥ श्वानाचें गा ॥ १७४ ॥ तें हें विषय-वैराग्य ॥ आत्म-लाभाचें भाग्य ॥ एणें ब्रह्मानंदा योग्य ॥ होती जीव ॥ १७५ ॥ ऐसा उभय भोगीं त्रासु ॥ देखसी जेथ बहुवसु ॥ जाण तेथें रहिवासु ॥ ज्ञानाचा तूं ॥ १७६ ॥ **सम-चित्तत्व** ॥ महा-सिंधु जैसें ॥ ग्रीष्म-वर्षं सारिसें ॥ इष्टानिष्ट तैसें ॥ जयाच्या ठायीं ॥ १७७ ॥ कां तिन्ही काळ होतां ॥ त्रिधा नव्हे सविता ॥ तैसा सुख-दुःखीं चित्ता ॥ भेदु नाहीं ॥ १७८ ॥ जेथ नभाचेनि पाडें ॥ समत्वा न्यून न पडे ॥ तेथ ज्ञान रोकडें ॥ ओळख तूं ॥ १७९ ॥

## नामदेव.

**नामदेव** जातीचा शिंपी, **पंढरपुर**चा राहणारा होता. त्याच्या बापाचें नांव **दामाशेटी** आणि आईचें नांव **गोणाई**. असें सांगतात कीं, दामाशेटीस फार दिवस मूल नव्हतें. एका दिवशीं **भीमा**नदीच्या कांठीं त्याला एक बारा दिवसांचा मुलगा *सांपडला. तो त्यानें घरीं आणून वाढविला, आणि त्याचें नांव नामा असें ठेविलें. हा **उद्धवा**चा अवतार होता असें ह्मणतात.

नामदेवानें पुष्कळ अभंग केले; परंतु त्यांपैकीं फार थोडे आतां प्रसिद्ध आहेत. त्याचा संपूर्ण असा कोणताहि ग्रंथ सांपडत नाहीं. त्याची **जनी** ह्मणून एक दासी होती, तिनेंहि बरेच अभंग केले आहेत.

नामदेव कधीं जन्मला व वारला ह्याचा अजून †शोध लागला नाहीं; तथापि तो ज्ञानदेवाच्या पाठीमागून कांहीं वर्षांनीं वारला असावा ह्यांत संशय नाहीं.

१ बाणांचीं. २ पुवाच्या चिखलांत. ३ इहलोकींचें. ४ कुजलेलें. ५ मांस. ६ उन्हाळा व पावसाळा(पाठा०)ग्रीष्मवर्षी. *परंतु अलीकडे (इ०स०१८९२) रा०रा०माधवराव अप्पाजी मुळे यांनीं प्रसिद्ध केलेल्या 'श्री नामदेव चरित्र' नांवाच्या ग्रंथांत नामदेव हा अयोनिसंभव नव्हता असें प्रतिपादन केलें आहे (पृ०२६-२७). † नामदेव हा शके ११९२ कार्तिक शुद्ध ११ स जन्मला व शके १२७२ आषाढ वद्य १३ स समाधिस्थ झाला असें सदर ग्रंथावरून समजतें (पृ०२७,२८२).

## स्फुट अभंग.

सर्व सावधान होउनी विचारा ॥ सोडवण करा संसाराची ॥ १ ॥
अवघें आयुष्य सरोनी जाईल ॥ कोण तें होईल साह्य आह्मां ॥ २ ॥
सकल संसार जाणोनि लटिका ॥ शरण जा एका विठोबासी ॥ ३ ॥
सर्व-काळ वाचे ह्मणा नारायण ॥ वायां एक क्षण जावों नेदीं ॥ ४ ॥
**नामा** ह्मणे सर्व सुखची होईल ॥ मन हें ठेवाल हरी-पायीं ॥ ५ ॥

( २ )

झणी दृष्टि लागे तुज केशव-राजा ॥ जेणें मना माझ्या बोध केला ॥ १ ॥
अनंत जन्मींचें विसरलों दुःख ॥ पाहतां श्री-मुख केशवाचें ॥ २ ॥
योगीयाचे ध्यानीं ध्यातां नातुडशी ॥ तो तूं आह्मांपाशीं मागें पुढें ॥ ३ ॥
**नामा** ह्मणे करूं जिवें [१]निंबलोण ॥ विठ्ठल-चरण वोंवाळीन ॥ ४ ॥

( ३ )

माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा ॥ केशवा माधवा नारायणा ॥ १ ॥
नाहीं नाहीं मज आणीक सोयरा ॥ न करीं आव्हेरा पांडुरंगा ॥ २ ॥
अ-नाथाचा नाथ होसी तूं दयाळ ॥ किती वेळोवेळ प्रार्थूं आतां ॥ ३ ॥
**नामा** ह्मणे जीव होतो कासावीस ॥ केली तुझी आस आतां तरी ॥ ४ ॥

( ४ )

पाहें पर-दारा जननी-समान ॥ द्रव्य ही पाषाण-सम मानीं ॥ १ ॥
पराव्याकारणें प्राण वेंचीं आतां ॥ जाणें पर-व्यथा अंतरींची ॥ २ ॥
विहित संतोष धरीं वा मानसीं ॥ कीं पर-लोकासी जाणें आहे ॥ ३ ॥
सर्व काळ प्रीति संतांचीया संगें ॥ गावें अनुरागें हरी-नाम ॥ ४ ॥
सर्वां भूतीं सम ठेवूनीयां बुद्धी ॥ सांडावी ऊपाधी प्रपंचाची ॥ ५ ॥
सर्व परमात्मा सर्व काळीं देशीं ॥ भाव अहर्निशीं दृढ धरीं ॥ ६ ॥
संत-समुदाय मिळतील जेथें ॥ लोटांगणें तेथें जावें आधीं ॥ ७ ॥
चिंता नको **नाम्या** तरसी तूं जाण ॥ सांगीतली खूण मनें माझ्या ॥ ८ ॥

( ५ )

[२]कलि-युगाचे मुळें ॥ झालें धर्माचें वाटोळें ॥ १ ॥
पलंगीं बैसवूनी राणी ॥ माते हातीं अणवी पाणी ॥ २ ॥

१ दृष्टीचा अगर भूतबाधेचा विकार न व्हावा ह्मणून मीठ, मोहऱ्या व कडूनिंबाचीं पानें हीं ओवाळून टाकणें, ह्या कृत्याला "निंबलोण करणें" ह्मणतात. २ तारी असा मूळचा पाठ नसेलना?

विद्या अमती कांहीं ॥ तरी पडतों अपायीं ॥ २ ॥
सेवा चुकतों संतांची ॥ नागवण हे फुकाची ॥ ३ ॥
गर्वें होतां ताठा ॥ जातों यम-पंथें वाटा ॥ ४ ॥
**तुका** ह्मणे थोरपणें ॥ नरक होती अभि-मानें ॥ ५ ॥

( १६० )

भुंकोनियां सुणें लागे हस्ती-पाठीं ॥ होऊनी हिंपुटी दुःख पावे ॥ १ ॥
काय त्या मशकें तयाचें करावें ॥ अपुल्या स्व-भावें पीडतसे ॥ २ ॥
मातलें बोकड विटवी पंचानना ॥ घेतलें मरणा धरणें तेणें ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे संता पीडितील खळ ॥ घेती तोंड काळें करूनियां ॥ ४ ॥

( १६१ )

दुबळें सदेवा ॥ ह्मणे नागवेल केव्हां ॥ १ ॥
आपणासारिखें त्या पाहे ॥ स्व-भावासी करील काये ॥ २ ॥
मूढ सभेआंत ॥ इच्छि पंडीतांचा घात ॥ ३ ॥
गांढें देखुनी शूरा ॥ उगें करितें बुरबुरा ॥ ४ ॥
आणिकांचा हेवा ॥ न करीं शरण जाई देवा ॥ ५ ॥
**तुका** ह्मणे किती ॥ करूं दुष्टांची फजिती ॥ ६ ॥

( १६२ )

माकडा दिसती कवटी नारळा ॥ भोक्ता तो निराळा वरील सारी ॥ १ ॥
एका रस एका तोंडीं पडे माती ॥ आपुलाले नेती विभाग ते ॥ २ ॥
सुनियांसि क्षीर वाढिल्या ओकवी ॥ भोगल्या पोसवी धणीवरी ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे भार वागविती मूर्ख ॥ नेतील ते सार परीक्षक ॥ ४ ॥

( १६३ )

तुह्मीं माझा देवा करिजे अंगीकार ॥ हा नाहीं विचार मजपाशीं ॥ १ ॥
आतां दोहीं पक्षीं लागलें लांछन ॥ देव-भक्तपण लाजविलें ॥ २ ॥
एकांतीं एकलें न राहे निश्चळ ॥ न राहे चपळ मन ठायीं ॥ ३ ॥
पायीं महत्त्वाची पडली शृंखला ॥ बांधवीला गळा स्नेहा हातीं ॥ ४ ॥
शरीर सोकलें देखिलीया सुखा ॥ कदान्न हें मुखा मान्य नाहीं ॥ ५ ॥
**तुका** ह्मणे जाला अवगुणाचा थारा ॥ वाढली हे निद्रा अळस बहु ॥ ६ ॥

( १६४ )

सकळ गुणें संपन्न ॥ एक देवाचें लक्षण ॥ १ ॥

वरकड कोठें कांहीं ॥ एक आहे एक नाहीं ॥ २ ॥
षड्गुण-ऐश्वर्य-संपन्न ॥ एक भगवंतीं जाण ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे जें जें बोला ॥ तें तें साजे ह्या विठ्ठला ॥ ४ ॥

( १६५ )

दर्पणासी बुजे ॥ नखटें तोंड पळवी लाजे ॥ १ ॥
गुण ज्याचे जो अंतरीं ॥ तोचि त्यासी पीडा करी ॥ २ ॥
चोरा रुचे निशी ॥ देखोनियां विटे शशी ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे जन ॥ देवा असे भाग्य-हीन ॥ ४ ॥

( १६६ )

कोणी एकाचिया पोरें केली आळी ॥ ठावी नाहीं पोळी मागे देखी ॥ १ ॥
बुझाविलें हातीं देउनी खापर ॥ छंद करकर वारियेली ॥ २ ॥
तैसें नको करूं मज कृपावंता ॥ काय नाहीं सत्ता तुझे हातीं ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे माय-बापांचें उचित ॥ करावें हें हित बाळकांचें ॥ ४ ॥

( १६७ )

भगवें तरी श्वान सहज वेष त्याचा ॥ तेथें अनु-भवाचा काय पंथ ॥ १ ॥
वाढवुनी जटा फिरे दाही दिशा ॥ तरी जंबु-वेषा सहज स्थिती ॥ २ ॥
कोरोनियां भूमि करिती मधीं वास ॥ तरी उंदरास काय वाणी ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे ऐसें कासया करावें ॥ देहासि दंडावें वाउगेंचि ॥ ४ ॥

( १६८ )

आपणा लागे काम वाण्या घरीं गुळ ॥ त्याचें याति कुळ काय कीजे ॥ १ ॥
उकरड्यावरी वाढली तुळसी ॥ टाकावी ते कैसी ठाया गुणें ॥ २ ॥
गाईचा जो भक्ष अ-मंगळ खाय ॥ तीचें दुग्ध काय सेवूं नये ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे काय सलपटासी काज ॥ फणसांतील बीज काढुनि घ्यावें ॥ ४ ॥

( १६९ )

वांझेनें दाविलें गऱ्हवार-लक्षण ॥ चिरगुटें घालून वोथयाला ॥ १ ॥
तेविं शब्द-ज्ञानी करिती चावटी ॥ ज्ञान पोटासाठीं विकूनियां ॥ २ ॥
बोलाचीच कढी बोलाचाचि भात ॥ जेवुनियां तृप्त कोण जाला ॥ ३ ॥
कागदीं लिहितां नामाची साखर ॥ चाटितां मधुर गोडी नेदी ॥ ४ ॥
**तुका** ह्मणे जळो जळो ते महंती ॥ नाहीं लाज चित्तीं आठवण ॥ ५ ॥

---

१ पोटाला.

( १७० )

जुंआयाच्या गोष्टी ऐकतांचि सुख ॥ करितां हें दुःख थोर आहे ॥ १ ॥
तैसी हरि-भक्ति सुळावरिल पोळी ॥ निवडे तो बळी विरळा शूर ॥ २ ॥
पिंड पोसलिया विषयांचा पाईक ॥ वैकुंठ-नायक कैचा तेथें ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे व्हावें देहासी उदार ॥ रखुमा-देवी-वर जोडावया ॥ ४ ॥

( १७१ )

क्षुधार्थी अन्नें दुष्काळें पीडिलें ॥ मिष्टान्न देखिलें तेणें जैसें ॥ १ ॥
तैसें तुझे पायीं लाचावलें मन ॥ झुरे माझा प्राण भेटावया ॥ २ ॥
मांजरें देखिला लोणियाचा गोळा ॥ लावुनियां डोळा बैसलेंसे ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे आतां झडी घालूं पाहे ॥ पांडुरंगे माये तुझे पायीं ॥ ४ ॥

( १७२ )

आयुष्य वेंचूनि कुटुंब पोशिलें ॥ काय हित केलें सांग बापा ॥ १ ॥
फुकाचा चाकर जालासि काबाडी ॥ नाहीं सुख घडी भोगावया ॥ २ ॥
दुर्लभ मनुष्य-जन्म कष्टें पावलासी ॥ दिल्हा कुटुंबासी काम-भोग ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे ऐसें आयुष्य नासिलें ॥ पाप तें सांचिलें पतनासि ॥ ४ ॥

( १७३ )

अर्थेविण पाठांतर कासया करावें ॥ व्यर्थचि मरावें घोकुनियां ॥ १ ॥
घोकुनियां काय वेगीं अर्थ पाहें ॥ अर्थरूप राहें होऊनियां ॥ २ ॥
**तुका** ह्मणे ज्याला अर्थी आहे भेटी ॥ नाहीं तरी गोष्टी बोलूं नका ॥ ३ ॥

( १७४ )

वसतां चोरापाशीं तैसी होय बुद्धि ॥ देखतांची चिंधी मन धांवे ॥ १ ॥
प्रपंचाचा छंद टाकुनियां गोंवा ॥ धरावें केशवा हृदयांत ॥ २ ॥
सांडूनियां देईं संसाराची बेडी ॥ कीर्तनाची गोडी धरावी गा ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे तुला सांगतों मी एक ॥ रुक्मिणी-नायक मुखीं गावा ॥ ४ ॥

( १७५ )

क्षमा शस्त्र जया नराचिया हातीं ॥ दुष्ट तयाप्रति काय करी ॥ १ ॥
तृण नाहीं तेथें पडिला दावाग्नि ॥ जाय तो विझोनी आपसया ॥ २ ॥
**तुका** ह्मणे क्षमा सर्वांचें स्व-हित ॥ धरा अ-खंडित सुखरूप ॥ ३ ॥

( १७६ )

मृगाचिये अंगीं कस्तूरीचा वास ॥ असे ज्याचा त्यास नसे ठावा ॥ १ ॥

भाग्यवंत घेती वेंचोनियां मोलें ॥ भार-वाही मेले वाहतां वोझें ॥ २ ॥
चंद्रामृतें तृप्ति पारणें चकोरा ॥ भ्रमरासी चारा सु-गंधाचा ॥ ३ ॥
अधिकारी एथें घेती हतवटी ॥ परिक्षवंता दृष्टि रत्न जैसें ॥ ४ ॥
**तुका** ह्मणे काय अंधळिया हातीं ॥ दिलें जैसें मोतीं वायां जाय ॥ ५ ॥

( १७७ )

कोणी वंदा कोणी निंदा ॥ आह्मां स्व-हिताचा धंदा ॥ १ ॥
काय तुह्मांसी गरज ॥ आह्मी भजूं पंढरी-राज ॥ २ ॥
तुह्मांसारिखें चालावें ॥ तेव्हां स्व-हिता मुकावें ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे हो कां कांहीं ॥ गळ दिला विठ्ठल-पायीं ॥ ४ ॥

( १७८ )

बोले तैसा चाले ॥ त्याचीं वंदीन पाउलें ॥ १ ॥
अंगें झाडीन अंगण ॥ त्याचें दासत्व करीन ॥ २ ॥
त्याचा होईन किंकर ॥ उभा ठाकेन जोडोनि कर ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे देव ॥ त्याचे चरणीं माझा भाव ॥ ४ ॥

( १७९ )

भक्ति ऋण घेतलें माझें ॥ चरण गहाण आहेत तुझे ॥ १ ॥
प्रेम व्याज देई हरी ॥ माझा हिशेब लौकर करीं ॥ २ ॥
माझें मी न सोडीं धन ॥ नित्य करितों कीर्तन ॥ ३ ॥
तुझें नाम आहे खत ॥ सुखें करीं पंचाईत ॥ ४ ॥
**तुका** ह्मणे गरुड-ध्वजा ॥ यासी साक्ष श्री-गुरु-राजा ॥ ५ ॥

( १८० )

किडा अन्नाचें माणूस ॥ त्याचा ह्मणविल्या दास ॥ १ ॥
तें ही त्यासी उपेक्षीना ॥ बोल आपुला सांडीना ॥ २ ॥
तो तूं नराचा नरेंद्र ॥ तुजपासूनि इंद्र चंद्र ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे विश्वं-भर ॥ तुज वर्णी फणी-वर ॥ ४ ॥

( १८१ )

पाया जाला नारू ॥ तेथें बांधला कापूरू ॥ १ ॥
तेथें बिबव्याचें काम ॥ अधमासि तों अधम ॥ २ ॥
रुसला गुलाम ॥ धणी करितो सलाम ॥ ३ ॥
**तेथें चाकराचें काम ॥ अधमासि तों अधम ॥ ४ ॥**

रुसली घरचीं दासी ॥ धणी समजावी तियेसी ॥ ५ ॥
तेथें बटकीचें काम ॥ अधमासि तों अधम ॥ ६ ॥
देव्हाऱ्यावरि विंचू आला ॥ देव-पूजा नावडे त्याला ॥ ७ ॥
तेथें पैजारेचें काम ॥ अधमासि तों अधम ॥ ८ ॥
**तुका** ह्मणे जाती ॥ जातीसाठीं खाती माती ॥ ९ ॥

( १८२ )

काम-क्रोध आड पडले पर्वत ॥ राहिला अनंत पलीकडे ॥ १ ॥
नुलंघवे मज न सांपडे वाट ॥ दुस्तर हा घाट वैरियांचा ॥ २ ॥
आतां कैचा मज सखा नारायण ॥ गेला अंतरून पांडुरंग ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे व्यर्थ मोलाचें शरीर ॥ गेलें हा विचार कळों आला ॥ ४ ॥

( १८३ )

तुझें ह्मणों आह्मां ॥ मग उणें पुरुषोत्तमा ॥ १ ॥
ऐसा धर्म काय ॥ अमृतानें मृत्यु होय ॥ २ ॥
कल्प-वृक्षा तळीं ॥ गांठीं बांधिलिया झोळी ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे परीस ॥ सांपडल्या उप-वास ॥ ४ ॥

( १८४ )

रासभ धुतला महा-तीर्थामाजी ॥ नव्हे जैसा तेजी श्याम-कर्ण ॥ १ ॥
तेवीं खळा काय केला उप-देश ॥ नव्हेचि मानस शुद्ध त्याचें ॥ २ ॥
सर्पासी पाजीलें शर्करा-पीयूष ॥ अंतरींचें विष जाऊं नेणे ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे श्वाना क्षीरीचें भोजन ॥ सवेंचि वमन जेवीं तया ॥ ४ ॥

( १८५ )

तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं ॥ दुजा कोणी तीहीं त्रि-भुवनीं ॥ १ ॥
सहस्र-मुखें शेष सिणला बापुडा ॥ चिरलिया धडा जिव्हा त्याच्या ॥ २ ॥
अ-व्यक्ता अ-लक्षा अ-पारा अनंता ॥ निर्गुणा सच्चिदा नारायणा ॥ ३ ॥
रूप नाम घेसी आपुल्या स्व-इच्छा ॥ होसी भाव तैसा त्याकारणें ॥ ४ ॥
**तुका** ह्मणे जरी दाविसी आपणा ॥ तरिच नारायणा कळों येसी ॥ ५ ॥

( १८६ )

देव भक्तालागीं करूं नेदी संसार ॥ अंगें वारावार करूनि ठेवी ॥ १ ॥
भाग्य द्यावें तरी अंगीं भरे ताठा ॥ ह्मणूनी करंटा करूनी ठेवी ॥ २ ॥

स्त्री द्यावी गुणवंती नसती गुंते आशा ॥ यालागीं कर्कशा पाठी लावी ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज प्रचित आली देखा ॥ आणिक ह्या लोकां काय सांगूं ॥ ४ ॥

( १८७ )

वाघें उपदेशिला कोल्हा ॥ सुखें खाऊं द्यावें मला ॥ १ ॥
अंतीं मरसी तें न चुके ॥ मजही मारीतोसी भुके ॥ २ ॥
येरु ह्मणे भला भला ॥ निवाड तुझ्या तोंडें झाला ॥ ३ ॥
देह तंव जाणार ॥ घडेल पर-उपकार ॥ ४ ॥
येरू ह्मणे मनीं ॥ ऐसें जावें समजोनी ॥ ५ ॥
गांठी पडली ठका ठका ॥ त्यांचा धर्म बोले तुका ॥ ६ ॥

( १८८ )

नको नको मना गुंतूं माया-जाळीं ॥ काळ आला जवळी ग्रासावया ॥ १ ॥
काळाची हे उडी पडेल बा जेव्हां ॥ सोडवीना तेव्हां माय-बाप ॥ २ ॥
सोडवीना राजा देशींचा चौधरी ॥ आणीक सोइरीं भलीं भलीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे तुला सोडवीना कोणी ॥ एका चक्र-पाणीवांचूनीयां ॥ ४ ॥

( १८९ )

जिव्हा जाणे फिकें मधुर कीं क्षार ॥ येर मांस पर हाता न कळे ॥ १ ॥
देखावें नेत्रीं बोलावें मुखें ॥ चित्ता सुख-दुःखें कळों येती ॥ २ ॥
परिमळासि घ्राण ऐकती श्रवण ॥ एकाचें कारण एका नव्हे ॥ ३ ॥
एक देहीं भिन्न ठेवियेल्या कळा ॥ नाचवी पुतळा सूत्र-धारी ॥ ४ ॥
तुका ह्मणे ऐशी जयाची ते सत्ता ॥ कां तया अनंता विसरलेती ॥ ५ ॥

---

## तुकारामाची स्त्री तुकारामास रागानें बोलली ते अभंग.

( १९० )

मजचि भोंवता केला येणें जोग ॥ काय याचा भोग अंतरला ॥ १ ॥ ध्रु०॥
चालोनियां घरा सर्व सुखें येती ॥ माझी तों फजिती चुके चि ना ॥ छ. ॥
कोणाची बाईल होऊनीयां वोढूं ॥ संसारा काढूं आपदा किती ॥ २ ॥
काय तरी देऊं तोंडितील पोरें ॥ मरतीं तरी बरें होतें आतां ॥ ३ ॥

---

१ काम.

कांहीं नेदी वांचों धोवियेलें घर ॥ सारवाया ढोर-शेण नाहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे रांड न करितां विचार ॥ वाहुनियां भार कुंथे माथां ॥ ५ ॥

( १९१ )

आतां पोरा काय खासी ॥ गोहो जाला देवेल्सी[1] ॥ १ ॥ध्रु०॥
डोजकें चिंधी घातल्या माळा ॥ उदमाचा सांडी चाळा ॥ छ. ॥
आपल्या पोटा केली थार ॥ आमचा नाहीं येसेपार ॥ २ ॥
हातीं टाळ तोंड वासी ॥ जाय देउळीं देवापासीं ॥ ३ ॥
आतां आह्मी करूं काय ॥ न बसे घरीं राणा जाय ॥ ४ ॥
तुका ह्मणे धीर धरी ॥ अझुनि काय जालें तरी ॥ ५ ॥

( १९२ )

न करवे धंदा ॥ आइता तोंडीं पडे लोंदा ॥ १ ॥ध्रु० ॥
उठितो तो कुटितो टाळ ॥ अवघा मांडिला कोल्हाळ ॥ छ. ॥
जीवंतचि मेले ॥ लाजा वाटूनियां प्याले ॥ २ ॥
संसाराकडे ॥ न पाहाती ओस पडे ॥ ३ ॥
तळमळती यांच्या रांडा ॥ वाळिती जीवा नांवें धोंडा ॥ ४ ॥
तुका ह्मणे बरें जालें ॥ ये गे बाईले लीहिलें ॥ ५ ॥

( १९३ )

कोण घरा येतें अमुच्या कशाला ॥ काय ज्याचा त्याला धंदा थोडा ॥ १ ॥ ध्रु० ॥
देवासाठीं झालें ब्रह्मांड सोईरें ॥ कोमळ्या उत्तरें काय वेंचे ॥ छ. ॥
मानें पाचारितां नव्हे औराणुक[2] ॥ आपें येती लोक प्रीतिसाठीं[3] ॥ २ ॥
तुका ह्मणे रांडे नावडे भूषण ॥ कांतेलेंसें[4] श्वान लागे पाठी ॥ ३ ॥

( १९४ )

भाव धरी तया तारील पाषाण ॥ दुर्जना सज्जन काय करी ॥ १ ॥ध्रु०॥
करितां नव्हे नीट श्वानाचें हें पुच्छ ॥ खापरा परीस काय करी ॥ छ. ॥
काय करिल तया साखरेचें आळें ॥ बीज तैसीं फळें[5] येती तया ॥ २ ॥
तुका ह्मणे वज्र भंगे एक वेळ ॥ कठीण हा खळ तयाहूनी ॥ ३ ॥

---

१ देवपिसा. २ अगत्य. ३ सुख किंवा शांति. ४ कांतावलेलें ( पिसाळलेलें ).
५ कारलें, कडुवृंदावन वगैरे वनस्पतींस.

## शिवाजी राजानें कारकुनाबरोबर पत्र, अबदागीर वगैरे देऊन तुकारामास बोलावणें पाठविलें, तेव्हां त्यानें उत्तर पाठविलें ते अभंग.

( १९५ )

दिवट्या छत्री घोडे ॥ हें तो बर्‍यांत न पडे ॥ १ ॥ध्रु०॥
आतां एथें पंढरि-राया ॥ मज गोंविसी कासया ॥ छ ॥
मान दंभ चेष्टा ॥ हे तो शूकराची विष्ठा ॥ २ ॥
तुका ह्मणे देवा ॥ माझे सोडवणे[१] धांवा ॥ ३ ॥

( १९६ )

नावडे जें चित्ता ॥ तेंचि होसी पुरविता ॥ १ ॥
न करावा संग ॥ वाटे दुरावावें जग ॥ २ ॥
सेवावा एकांत ॥ वाटे न बोलावी मात ॥ ३ ॥
जन धन तन ॥ वाटे लेखावें वमन ॥ ४ ॥
तुका ह्मणे सत्ता ॥ हातीं तुझ्या पंढरि-नाथा ॥ ५ ॥

( १९७ )

विरिंचीनें केलें ब्रह्मांड सकळ ॥ तयामाजी खेळ नाना युक्ति ॥ १ ॥ध्रु०॥
युक्तीचा चाळक ब्रह्म-निष्ठ ज्ञानी ॥ गुरु-भक्ति मनीं विश्वासेंसी ॥ छ. ॥
ऐसा तुझा प्रेमा कळला हा एक ॥ पाहूनियां लेख पत्रिकींचें ॥ २ ॥
शिव तुझें नाम ठेविलें पवित्र ॥ छत्र-पति सूत्र विश्वाचें कीं ॥ ३ ॥
व्रत नेम तप ध्यान योग केला ॥ करूनि मोकळा जालासी तूं ॥ ४ ॥
हेत हा लागला आमुचिये भेटी ॥ पत्रामाजी गोष्टी हेचि थोर ॥ ५ ॥
याचें हें उत्तर ऐकें गा भू-पती ॥ लिहिली विनती हेताची हे ॥ ६ ॥
अरण्य-वासी आह्मी फिरूं उदासीन ॥ दर्शन हें हीन अ-मंगळ ॥ ७ ॥
वस्त्राविण काया जालीसे मळीन ॥ अन्नाविणें जीण फळाहारी ॥ ८ ॥
रोड हात पाय दिसे अवकळा[२] ॥ काय तो सोहळा दर्शनाचा ॥ ९ ॥
तुका ह्मणे माझी विनंती सलगीची ॥ वार्ता हे भेटीची करूं नका ॥ १० ॥

( १९८ )

ऐसी माझी वाणी दीनरूप वाहे ॥ करुणा त्या आहे हृदयस्थाची ॥ १ ॥ध्रु०॥

---

१ मला सोडविण्याकरितां. २ निस्तेज.

नहों कीविलवाण नहों आह्मी दीन ॥ सर्वदा शरण पांडुरंगीं ॥ ध्रु. ॥
पांडुरंग आह्मां पाळिता पोसिता ॥ आणिकांची कथा काय तेथें ॥ २ ॥
तुझी भेट घेणें काय हो मागणें ॥ आशेचें हें शून्य केलें तेणें ॥ ३ ॥
निराशेचा गांव दिधला आह्मांसी ॥ [1]प्रवृति-भागासी सांडियेलें ॥ ४ ॥
पतिव्रता-मन पतिशींच भेटो ॥ तैसे आह्मी विठोमाजी नांदों ॥ ५ ॥
विश्व हें विठ्ठल नाहीं दुजें कांहीं ॥ देखणें तुझें ही तयामाजी ॥ ६ ॥
तुम्हीं विठ्ठल हवा ऐसा वाटे ॥ परि ऐक गोष्टी आवडीची ॥ ७ ॥
सद्गुरु-श्री-राम-दासाचें भाषण ॥ तेथें घालीं मन चळों नको ॥ ८ ॥
बहुतांठायीं वृत्ति चावळली जेव्हां ॥ राम-दास्य तेव्हां घडे कैसें ॥ ९ ॥
तुका ह्मणे बापा चातुर्य-सागरा ॥ भक्ति-भाव थारा भाविकांसी ॥ १० ॥

( १९९ )

तुह्मांपासीं आह्मीं येऊनियां काय ॥ वृथा सीण आहे चालण्याचा ॥ १ ॥ ध्रु० ॥
मागावें हें अन्न तरी भिक्षा थोर ॥ वस्त्रासी हे थार चिंध्या बिंदीं ॥ ध्रु. ॥
निद्रेसी आसन उत्तम पाषाण ॥ वरी हें प्रावर्ण आकाशाचें ॥ २ ॥
तेथें काय करणें कोणाची ही आस ॥ वायां होय नाश आयुष्याचा ॥ ३ ॥
राज-गृहा यावें मानाचिये आसे ॥ तेथें काय वसे समाधान ॥ ४ ॥
राजाचिये घरीं भाग्यवंता मान ॥ इतरां सन्मान नाहीं तेथें ॥ ५ ॥
देखोनियां वस्त्रा-भूषणांचे जन ॥ तात्काळ मरण येतें आह्मां ॥ ६ ॥
ऐकोनियां मानाल उदासता जरी ॥ तरी आह्मां हरी उपेक्षीना ॥ ७ ॥
आतां हेंचि तुह्मां सांगणें कौतुक ॥ भिक्षेऐसें सुख नाहीं नाहीं ॥ ८ ॥
तप-व्रत-योगें महा भले जन ॥ आशा-बद्ध लीन वर्ततातीं ॥ ९ ॥
तुका ह्मणे तुह्मी श्री-मंत मानाचे ॥ पूर्वील देहाचे हरी-भक्त ॥ १० ॥

( २०० )

आतां एक योग साधावा हा नीट ॥ भल्याचा तो वीट मानूं नये ॥ १ ॥ध्रु० ॥
जेणें योगें तुह्मां लागूं पाहे दोष ॥ ऐसा हा सायास करूं नये ॥ ध्रु. ॥
निंदक दुर्जन [2]संग्रहीं असती ॥ त्यांची युक्ति चित्तीं आणूं नये ॥ २ ॥
परीक्षावे कोण राज्याचे रक्षक ॥ [3]विवेकाविवेक पाहोनियां ॥ ३ ॥
सांगणें नलगे सर्वज्ञ तूं राजा ॥ अ-नाथाच्या काजा साह्य व्हावें ॥ ४ ॥
हेंचि ऐकोनियां पावें समाधान ॥ आतां या दर्शना काज नाहीं ॥ ५ ॥

---

१ संसारमार्गास. २ मार्गात. ३ सारासारविचार.

घेवोनियां भेटी कोण हा संतोष ॥ आयुष्याचे दिस गेले गेले ॥ ६ ॥
तुका ह्मणे राया धन्य जन्म क्षिती ॥ त्रैलोकीं हे ख्याति कीर्ति तुझी ॥७॥

( २०१ )

आतां हे विनंती प्रधान-अष्टका ॥ प्र-भूसी विवेक ऐसा सांगा ॥१॥ ध्रु०॥
प्रति-निधि मान-रक्षक चतुर ॥ सात्विकाचें घर तुह्मांपाशीं ॥ छ० ॥
मुजुमीचे धनी लेखन-कारक ॥ पत्रींचा विवेक समजाववा ॥ २ ॥
पेशवे सुरनिस चिटनिस डबीर ॥ राजाज्ञा सुमंत सेना-पति ॥ ३ ॥
भूषण पंडित-राय विद्या-धन ॥ वैद्य-राजा नमन माझें असो ॥ ४ ॥
पत्रिंचा हा अर्थ अंतरीं जाणोनि ॥ विवंचोनि श्रवणीं घाला राया ॥ ५ ॥
सात्विक प्रेमळ दृष्टांताच्या मतें ॥ बोलिलों बहुत कळावया ॥ ६ ॥
यथास्थित निरोप सांगणें हा राया ॥ अर्थ पाहा वांयां जाऊं न द्या ॥ ७ ॥
भिडेसाठीं बोलाल गाळुनि अर्थातें ॥ अनर्थकारी तुमतें होईल तेणें ॥ ८ ॥
तुका ह्मणे तुह्मां नमन अधिकाऱ्यां ॥ सांगणें हें राया पत्र माझें ॥ ९ ॥

---

# वामनपंडित.

**वामनपंडित** हा **साताराजिल्ह्यांतील कोरेगांव कुमठें** एथला जोशी होता. हा जातीचा ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण. ह्याच्या बायकोचें नांव गिरीबाई. ह्यानें **काशीस** शास्त्राध्ययन केलें, व वादविवाद करून पुष्कळ पंडितांस जिंकिलें. प्रथम ह्यानें संस्कृत कविता बरीच केली; पण पुढें ह्मास पश्चात्ताप होऊन **रामदासस्वामीच्या** सांगण्यावरून ह्यानें लोकोपयोगी मराठी ग्रंथ करण्यास आरंभ केला.

वामनाची कविता गंभीर आणि रसभरित आहे. ह्याचे कवितेंत यमकें फार ह्मणून ह्यास रामदास "यमक्या वामन" ह्मणत असे. वामनपंडित **कृष्णातीरीं वाईक्षेत्राजवळ पांडववाडी** ह्मणून एक गांव आहे तेथें वारला. त्याच्या शिष्यमंडळीनें त्याच्या पादुका अद्यापि सांभाळून ठेविल्या आहेत; व त्यांची ते पूजा करित असतात, असें ऐकण्यांत आहे. वामनाचे वंशज अद्यापि **काशीस** आहेत.

मरणशक १५९५ ( वैशाख शुद्ध ६ ).

## वामनानें केलेले ग्रंथ.

१. यथार्थ-दीपिका ( गीतेवर टीका ) ओंवीबद्ध.
२. निगमसार-श्लोकबद्ध—सुमारें ४० प्रकरणें आहेत.

# वेंचे, वामनी श्लोक.

## मंगलाचरण.

शिख॰ नसे ठावा ब्रह्मा, न शिव, अथवा श्री-पति हरी ॥
हेरी जो तापातें उचलुनि कृपा-सिंधु-लहरी ॥
हेरी वेंटे काळा केरिस, वि-पेती मृत्यु-भुजगा ॥
जगाचा तूं ऐसा धणि कवण तो पाव मज गा ॥ १ ॥

## वेंचे, नामसुधेंतील.

अमृताप्रमाणें मधुर व भक्तीनें उच्चारिलें असतां जन्ममरणप्रवाहांतून सोडविणारें असें जें भगवंताचें नाम, त्याचा महिमा ह्या प्रकरणांत वर्णिला आहे; ह्मणून ह्यास **नामसुधा** असें नांव दिलें आहे.

मालिनी. हरि-पण हरि-नामें धातु-मूर्तीस आलें ॥
हरि-मय हरि-नामें विश्व संतांसि जालें ॥
भव-भय हरि-नामें साधकांचें पळालें ॥
वद वद वद जिव्हे राम-नामें रसालें ॥ १ ॥

व॰ति॰ आकाश-अंत न कळूनिहि अंतरिक्षीं ॥
आकाश आक्रमिति शक्त्यनुसार पक्षी ॥
नाम-प्रतापहि यथामति याच रीती ॥
सीमा न पावति तथापि मुनींद्र गाती ॥ २ ॥

१ नदीच्या लाटा ज्याप्रमाणें दाह शांत करितात त्याप्रमाणें जो परमेश्वर आपल्या कृपेच्या योगानें लोकांचें दुःख निवारितो. २ यमरूप हत्तीस हरि ह्मणजे सिंहच. ३ मृत्युरूप सर्पास विपति ह्मणजे पक्ष्यांचा नायक गरुडच. ४ मोक्षप्राप्तीकरितां यत्न करणारांचें. ५ हा सामासिक शब्द असून एथें कवीनें संधि केला नाहीं. वामनाच्या कवितेंत अशीं उदाहरणें पुष्कळ आढळतात.

द्रु०वि० न कळतां पद अग्निवरी पडे ॥ न करि दाह असें न कधीं घडे ॥
अ-जित¹-नाम वदो भलत्या मिसें ॥ सकळ पातक भस्म करीतसे ॥ ३ ॥

भु०प्र० न जाणे शिशू अग्निची शक्ति कांहीं ॥
जळो तूळ इच्छा अशी ज्यास नाहीं ॥
तरी घालितां अग्नि कार्पास²-राशी ॥
जळे; ये रिती नामही पाप नाशी ॥ ४ ॥

व०ति० एथें³ ह्मणाल जळती जरि सर्व पापें ॥
मूळें⁴ न कां जळति नाम महा-प्रतापें ॥
नेणोनि नाम ह्मणतां दुरितासि जैसें ॥
जाळी न कीं सकळ पातक-मूळ तैसें ॥ ५ ॥

,, धातूवरी अनळ नेणत बाळ घाली ॥
तो अग्नि धातु-मळ तो अति-शीघ्र जाळी ॥
ताम्रादि भस्महि तया अनळेंचि जेव्हां ॥
कर्ता अभि-ज्ञ बहु जाळिल धातु तेव्हां ॥ ६ ॥

पृथ्वी. न जाणतहि ये मुखा हरि तथापि पापें हरी ॥
स्मरोनि महिमा स्मरे वदनिं तींच नामें जरी ॥
प्रवृत्तिविषयीं⁵ जरी असति त्या जनांचीं मनें ॥
वि-रक्त करितो हरी स्व-गुण-नाम-सं-कीर्तनें⁶ ॥ ७ ॥

व०ति० अत्यंत शुद्धि हरि-कीर्तन भक्ति-भावें ॥
होतां खरें, परि न जाणत ही स्व-भावें ॥
नारायण-स्मरण-कीर्तनमात्र कांहीं ॥
ज्याला घडेल तरि पातक त्यास नाहीं ॥ ८ ॥

मालिनी. कडुवट हरि-नामें वाटती पापियाला ॥
परि दवडुनि पापें गोड होतीं तयाला ॥
मग विषय-सुखाची नाठवे त्यास वार्ता ॥
ह्मणउनि न पुन्हा तो होय अ-न्याय-कर्ता ॥ ९ ॥

१ परमेश्वराचें नांव. २ कापसाचा ढीग. ३ ह्यावर अशी शंका घ्याल कीं. ४ पापाचें मूळ जी वासना ती. ५ संसाराविषयीं. ६ आपले गुण व नाम ह्यांच्या संकीर्तनानें लोकांच्या मनांत प्रपंचाविषयीं वैराग्य उत्पन्न करितो. ७ 'होते' ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता. ८ सहजगत्या. ९ त्याचें पातक नाहींसें होतें.

शा०वि० आयासाविण ही कथा परिसतां गोडी हरीच्या गुणीं ॥
ज्या चित्तीं उपजे निघे सहज तो त्याच्या पदीं तत्क्षणीं ॥
ऐसे ये रिति अर्पिती सहज ही जे एकदा त्यां मना ॥
ते स्वप्नीं नयनीं न देखति यमा कैच्या तयां यातना ॥ १० ॥

मालिनी. सकळहि अघ-बीजें नाशती अंतरींचीं ॥
अति अघ-हर नामें ह्यास्तव श्री-हरीचीं ॥
हरि विषय मतीचा कीर्तनें होय जेव्हां ॥
कर-तळ-गत त्याला चार[२] ही मोक्ष तेव्हां ॥ ११ ॥

शा०वि० नामोच्चारण मात्र ज्यांस घडलें ते पावले सद्गती ॥
सामर्थ्यें हरिचीं अशीं घडिघडी जे वर्णिती ऐकती ॥
त्यांना जे उपजेल भक्ति हरिची अत्यंत ते शुद्धता ॥
तैशी तीर्थ-तपोव्रतें न करिती हें जाण तूं सु-व्रता[३] ॥ १२ ॥

„ हस्तीतें धुतलें जळीं बसविलें मालिन्यही नाशिलें ॥
तेणें तें पहिलें स्व-कर्म वहिलें तीरींच आरंभिलें ॥
शुंडाग्रें धरिलें धुळीस भरिलें सर्वांग ही आपलें ॥
प्रायश्चित्त दिलें तथापि न भलें ज्याचें मन क्षोभलें ॥ १३ ॥

स्वागता. शर्व-कंठ-विष-गर्व हराया[४] ॥ शक्त नामचि तुझें रघु-राया ॥
सेतु सागर कपी उतराया[५] ॥ नाम-सेतु भव-सिंधु तराया ॥ १४ ॥

व०ति० प्राण-प्रयाण-समयीं[६] यम-दूत जेव्हां ॥
येती घडे किमपिही हरि-दास्य तेव्हां ॥
आ-जन्म-पातक[७] जळे मग त्या पवित्रा ॥
होतील दुर्गति[८] कशा वि-विधा वि-चित्रा ॥ १५ ॥

---

१ हरांला. २ सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्यता असे मुक्तीचे चार प्रकार. ३ उत्तम आचरणाच्या हे परीक्षिति राजा. ४ देवदैत्य समुद्रमंथन करित असतां त्यांतून हालाहल नांवाचें अतिप्रखर विष उत्पन्न होऊन साऱ्या जगतास जाळूं लागलें, तेव्हां देवादिकांच्या प्रार्थनेवरून तें सांबानें भक्षिलें. तें त्याच्या कंठास फार जाळूं लागलें. ती पीडा शांत व्हावी ह्मणून त्यानें मस्तकीं गंगा व चंद्र धारण करणें इत्यादि अनेक उपाय केले, तथापि पीडा शांत होईना. शेवटीं त्यानें रामनामाचा जप चालविला, तेव्हां तें विष शांत झालें. अशी कथा आहे. ५ सागर उतराया कपींना जसा सेतु तसा इ०. ६ प्राण जाण्याच्या वेळीं. ७ उपजल्यापासून मरेपर्यंत केलेलें पाप. ८ नरकयातना.

## वेंचे, वनसुधेंतील.

**कृष्णानें** कुंजवनांत गोपाळांसहवर्तमान जी क्रीडा केली ती सुधेसारिखी गोड आहे आणि ती ह्या प्रकरणांत वर्णिली आहे, ह्मणून ह्यास **वनसुधा** असें नांव दिलें आहे.

व०ति० बोले मुलांप्रति हरी पहिले दिशीं कीं ॥
रात्रींच सिद्ध करणें अशनादि[1] शिंकीं ॥
जाऊं समस्तहि उद्यां वन-भोजनातें ॥
पोटांत भाव वधणें अघ-दुर्जनातें[2] ॥ १ ॥
एके दिनीं मनिं धरूनि असें हरी तो ॥
चाले प्रभात-समयीं खळ जो हरीतो[3] ॥
शृंगी-रवेंचि[4] करि जागृत मित्र-सेना ॥
देणार जागृतिस[5] ज्याविण हो असे ना ॥ २ ॥

द्रु०वि० खडबडोनि समस्तहि धांवले ॥ सहित-वत्स हरीप्रति पावले ॥
सकळ खेळति सोडुनि वासुरां[6] ॥ परम कौतुक जें गगनीं सुरां ॥३॥

भुं०प्र० वनीं खेळती बाळ ते बल्लवांचे ॥ तुरे खोविती मस्तकीं पल्लवांचे ॥
फुलांचे गळां घालिती दिव्य हार ॥ स्व-नाथा-सवें ते करीती विहार ॥४॥
स्व-कौशल्य ज्या गुंज-माळांत नाना ॥ गळां घालिती ते करीती तनाना[7]॥
शिरीं बांधिती मोर-पत्रें[8] वि-चित्रें ॥ शरीरावरी रेखिती दिव्य चित्रें॥५॥

इं०व० पक्ष्यांचिया साउलिच्याच संगें ॥ ते धांवती हास्य-रस-प्र-संगें ॥
हंसाचिया दाखविती गतीतें ॥ जे लाधले हंस-गुरू-गतीतें[9] ॥ ६ ॥

उ०जा० धांवोनि लावी पहिलें करातें ॥ श्रेष्ठत्व दे त्या अजि लेंकरातें ॥
जो तो ह्मणे लाविन मीच पाणी ॥ धरीन आधीं प्रभु चक्र-पाणी ॥ ७ ॥
परोपरी खेळति जी वनांत ॥ अर्पूनि चित्तें जग-जीवनांत ॥
धरूनियां मर्कट-पुच्छ हातीं ॥ तयांसवें वृक्ष उडों पहाती ॥ ८ ॥

---

१ खाण्याचे वगैरे पदार्थ. २ दुष्ट अघासुरातें; (कृष्णास मारण्याकारितां हा पूतनेचा भाऊ कंसानें पाठविला होता. त्यानें कपटानें अजगराचें रूप धरिलें होतें, त्याला कृष्णानें मारिलें). ३ नाशितो. ४ लहान शिंगाच्या शब्दानें. ५ अज्ञाननिद्रेपासून सुटका-ज्ञान. ६ गवळ्यांचे. ७ ताना किंवा गाण्याचे आलाप घेती. ८ मोरांचीं पिसें (संस्कृत व प्राकृत शब्दांचा समास). ९ योगिजनांमध्यें जे श्रेष्ठ त्यांना प्राप्त होणाऱ्या गतीला.

भु० प्र० मुलें वामुनी लोचन-भ्रू-तटातें ॥ उभारूनियां वांकुल्या मर्कटांतें ॥
अहो दाविती शब्द तैसे करीती ॥ असे खेळती बाळ निःशंक-रीती ॥९॥
,, वनीं देखुनी मेघे-नीळास मोर ॥ प्रे-मोदें करी नृत्य-लीला समोर ॥
तयासारिखे नाचती तोकें सारे ॥ खुणावूनि अन्योन्य कीं तो कसारे ॥१०॥
,, जसे दांभिक ध्यान-मुद्रा धरीती ॥ जना दाविती ज्ञानही बोध-रीती ॥
तशी दाविती ते बकाभ्यास-मुद्रा ॥ गडी हांसवीती कृपेच्या समुद्रा ॥११॥
,, वदे कृष्ण गोपाळ-बाळां जनांतें ॥ बसूनी करूं ये स्थळीं भोजनातें ॥
वनीं वत्स सोडा चरायासि,पाणी ॥ तयां पाजुनीयां,ह्मणे चक्रपाणी॥१२॥
,, बरें कृष्णजी बोलसी तूं जसा रे ॥ तसें वर्ततों लक्षितों तूज सारे ॥
असें बोलुनी सोडिती वासुरांतें ॥ नभीं होय आश्चर्य सर्वां सुरांतें ॥१३॥
इं० व० संतोषतो नंद-कुमार साचा ॥ बाळांत तैशा परमा रसाचा ॥
पंक्तीस दे लाभ अजी वनांत ॥ बुद्धी जयांच्या जग-जीवनांत ॥१४॥

मालिनी. निज-मुख कवणाही आड दृष्टी असे ना ॥
रचुनि बसवि ऐसी भोंवतीं बाळ-सेना ॥
हरि-वदन पहाया सर्व-दृष्टी भुकेल्या ॥
ह्मणुन बहुत पंक्ती मंडळाकार केल्या ॥ १५ ॥

भु० प्र० हरी कर्णिकेच्या स्थळीं मध्य-भागीं ॥
मुलें भोंवतीं ऱ्हस्व-दीर्घे विभागीं ॥
लहानापुढें थोर अंभोज-पत्रें ॥
अशीं बैसवीलीं भवार्कातपत्रें ॥ १६ ॥

१ मेघासारिख्या निळ्या कृष्णास. २ अत्यानंदानें. ३ लहान मुलें. ४ ईश्वरचिंतन एकाग्रमनानें करित बसल्यासारिखी निश्चल स्थिति. ५ उपदेश करण्याच्या रीतीवरून. ६ माशांनीं आपणाजवळ निःशंकपणें यावें ह्मणून बगळा जसा ( ध्यानस्थ मुनीप्रमाणें ) स्तब्ध बसतो, तसें बसणें. ७ कृष्णाला. ८ अत्युत्कट आनंदाचा. ९ अहो. १० जगताला आधारभूत जो कृष्ण त्याचेठायीं. ह्या श्लोकाचा अन्वय—अजी, जयांच्या बुद्धि जगजीवनांत ( आहेत ) तैशा बाळांत (हि) नंदकुमार साचा संतोषतो, ( ह्मणून ) वनांत त्यांच्या पंक्तीस परमा रसाचा लाभ दे. ११ ठेंगणीं आणि उंच निराळीं करी. १२ कमळाच्या पांकळ्या. १३ ( भव + अर्क + आतप + त्र )—संसार हाच सूर्य त्याच्या संतापापासून रक्षणारा ह्यानें.

भु०प्र० असे कर्णिका अंबुजामाजि जेवीं ॥
मुलां मध्य-भागीं बसे कृष्ण जेवी ॥
मुखीं ग्रास स-प्रेम घालूनि हातीं ॥
दहीं-भात दे, देव लीला पहाती ॥ १७ ॥

शा०वि० वंशी नादे[२]-नटी, तिला कटि-तटीं खोवोनि पोटी-पैटीं ॥
कक्षे वाम-पुटीं स्व-शृंगें, निकटीं, वेताटिही गोमटी ॥
जेवी नीर-तटीं तरू-तळवटीं, श्री-श्याम-देहीं उटी ॥
दाटी व्योम-वटीं सुरां, सुख-लुटी घेती जटी धूर्जटी ॥१८॥

---

# वेंचे, वेणुसुधेंतील.

श्रीकृष्ण वनांत वेणु वाजवित असतां त्याचा अमृतासारखा गोड ध्वनि ऐकून सर्व प्राणी मोहित झाले; ही कथा ह्या प्रकरणांत वर्णिली आहे; ह्मणून ह्यास वेणुसुधा हें नांव दिलें आहे.

स्वागता. अंग वक्र अधरीं धरि पांवा ॥ गोप-वेष हरि तोचि जपावा ॥
वाम-बाहु वरि गालहि डावा ॥ तो ठसा स्व-हृदयांत पडावा ॥१॥

उ० जा० वेणु-ध्वनी तो सुर-गायकांनीं ॥ त्यांच्या विमानांतहि वायकांनीं ॥
आश्चर्य कानीं पडतांचि केलें॥ न तृप्त ज्यांचें मन हें भुकेलें ॥ २ ॥

स्वागता. मोहती व्रेज-पशू मृग-गाई ॥ आमुचें नवल काय अगाई ॥
स्तब्ध होति लिखितें जसिं चित्रें ॥ वेणुच्या ध्वनि-रसेंचि विचित्रें ॥३॥

उ० जा० मातृ-स्तनींचा रस आननांत ॥ तो होय वेणु-ध्वनि काननांत ॥
गळे गिळेना पय वासुरांतें ॥ आश्चर्य वाटे गगनीं सुरांतें ॥ ४ ॥

स्वागता. मल्ल-वेष रचिला अभि-राम ॥ श्री-धर प्रभु सवें बळ-राम ॥
मोर-पत्र-मुकुटीं तरु-पत्रें ॥ नेत्र सुंदर जसीं शत-पत्रें ॥ ५ ॥

---

१ (वेळूची केलेली ) मुरली किंवा पांवा. २ नादानें नटनारी ह्मणजे मंजूळ नादाची. ३ कंबरेस. ४ निऱ्या खोवण्याच्या ठिकाणीं. ५ डाव्या काखेमध्यें. ६ आपलें वाजविण्याचें शिंग. ७ यमुनेच्या कांठीं. ८ आकाशाच्या पोटांत. ९ ह्या शब्दाचा अर्थ शंकर असा आहे, परंतु एथें हा शब्द तपस्वी ह्या अर्थानें योजिला आहे असें दिसतें. १० गंधर्वांनीं. ११ गोकळांतील पशु.

उ० जा० सैये अशा म्यां हरि देखिला गे ॥ तो प्रेम-रंगीं मनिं रेखिलो गे ॥
पाचारितो वेणु-रवेंचि गाई ॥ आश्चर्य तेव्हां करितों अगाई ॥ ६ ॥

स्वागता. गो-धेनीं बहु पुढें नव जावें ॥ ठाव एकचि धरूनि थिजावें ॥
वाजवी ह्मणुनि जो निज पांवा ॥ कृष्ण तोचि हृदयांत जपावा ॥७॥

उ० जा० आं-पाद माळा प्रभु-कृष्णजीची ॥ सुधा पिती षट्-पद कृष्ण जीची ॥
प्र-दक्षिणा ते अवघे तिला हो ॥ करूनि गुंजारव घेति लाहो ॥८॥

व० ति० गुंजारवें भ्रमर गुंजति त्यांत देवें ॥
वेणु-ध्वनी मिसळिला मृदु वासुदेवें ॥
आ-पाद कंठ-वन-माळ अशी विराजे ॥
ते सेविती मधु-प होउनि देवें-राजे ॥ ९ ॥

भु० प्र० वनीं राजहंसीं पिकांनीं शुकांनीं॥ध्वनी गोड तो आयकोनी भुं-कानीं॥
त्वरें येउनी सेवियेलें हरीतें ॥ महा-पापही नाम ज्याचें हरीतें ॥१०॥

द्रु० वि० वदन लावुनि ते सकल क्षिती ॥ नयन झांकुनि अन्य न लक्षिती ॥
स्थिर-मनें करुनि स्थिर आसना॥करिति ते खग कृष्ण-उपासना॥११॥

भु०प्र० जगज्जीवन श्री-हरी आणि काळा॥करी तो जगीं जीवनाच्या सुकाळा ॥
असे मेघही, या निमित्तें सखा हो ॥सुहृद्भाव ऐसा नसे आणिकां हो॥१२॥

,, क्षणी उष्ण लागे सख्या केशवातें ॥ ह्मणूनी त्वरें येउनी लेशें-वातें ॥
मुकुंदावरी मेघ तो छत्र झाला॥करी स्वात्म-देहार्पण श्री-अं-जाला॥१३॥

द्रु० वि० हळुहळू घन गर्जतसे नभीं ॥ मुरलिहूनि चढेल ह्मणोन भी ॥
श्रवण-भक्ति-अतिक्रम वर्जतो॥करित कीर्तनही घन गर्जतो ॥१४॥

भु० प्र० यशोदे तुझा पुत्र वंशी-स्वरांनीं॥सुधा ओष्ठिंची वर्षतो या स्वें-रानीं॥
तईं भोंवते मोहती देव-जाती॥जयांचीं मनें उन्मनत्वास जाती॥१५॥

---

१ हे सखि. २ प्रेमरूप रंगांनीं. ३ तजबीर काढिली. ४ गाईंच्या समुदायांनीं. ५ न जावें. ६ थांबून रहावें. ७ पायघोळ. ८ काळे भुंगे. ९ कृष्णाच्या गळ्यांतील माळ. १० देवश्रेष्ठ. ११ कान देऊन. १२ भूमीकडे. १३ जगताच्या स्थितीला कारण. १४ वांचण्याच्या, पाण्याच्या. १५ होय. १६ वाऱ्याच्या झुळकीच्या योगानें. १७ आपलें मन व शरीर ह्यांचें अर्पण. १८ जन्मरहित जो परमेश्वर त्याला. १९ ह्याचा 'आपला ध्वनि' हा अध्याहृत कर्ता. २० आपल्या गर्जनेनें मुरलीचा शब्द लोपविला तर नवविध भक्तींतील श्रवणभक्तीचें उल्लंघन होईल ह्मणून तें टाळण्याकरितां हळू शब्द करितो, हा भाव. २१ टाळतो. २२ पांव्याच्या सुरांनीं. २३ आपल्या वनांत. २४ ज्या स्थितींत मनाचाहि लय होतो अशा ( उन्मनी ) स्थितीस.

## रुक्मिणी—पत्रिका.

**रुक्मिणी** ही **विदर्भ** देशाचा राजा **भीष्मक** याची कन्या होती. हिच्या बापानें आपला मुलगा **रुक्मी** याच्या आग्रहामुळें तीस **चेदि** देशाचा राजा **शिशुपाल** यास देऊं केलें. परंतु रुक्मिणीची निष्ठा कृष्णाच्या ठिकाणीं असल्यामुळें तिनें त्याजकडे **सुदेव** नांवाच्या ब्राह्मणास गुप्तपणें पाठवून अमुक दिवशीं येऊन मजला घेऊन जावें अशा आशयाचें त्याजबरोबर एक पत्र दिलें तें या आख्यानांत सांगितलें आहे.

व० ति० श्रोत्यांचिया श्रवण-रंध्रिं रिघोनि चित्तीं ॥
तूझे गुण त्रि-विध ताप हरी हरीती ॥
ऐकोनियां भुवन-सुंदर या गुणातें ॥
निर्लज्ज चित्त हरि हें तुजला वरीतें ॥ १ ॥

,, विद्या वय द्रविण रूप इहीं करोनी ॥
हा आत्म-तुल्य पति हेंचि मनीं धरोनी ॥
जे सर्व-लक्षण-विचक्षण सत्कुलीना ॥
ते कां नृ-सिंह नवरी तुजला वरीना ॥ २ ॥

,, जे सर्व-लक्षण-विचक्षण आणि धीरा ॥
तेही तुझे गुण असे जगदेक-वीरा ॥
ऐकोन कोण नवरी न वरील तूतें ॥
निर्लज्ज यास्तव ह्मणी ह्मणशील मातें ॥ ३ ॥

,, देहार्पणा करुनि तूं पति म्यां वरीला ॥
जाया करीं हरि तुं नेउनि शीघ्र माला ॥
सिंहांगनेसि मज नेइल अंबुजाक्षा ॥
जंबूक चैद्य जरि तूं करिशी उपेक्षा ॥ ४ ॥

,, म्यां तूज निश्चित मनें वरिलें अनंता ॥
येऊनियां करिं धरूनि करीं स्व-कांता ॥
सिंहांगनेसि मज जंबुक अंबुजाक्षा ॥
नेईल चैद्य जरि तूं करिशी उपेक्षा ॥ ५ ॥

---

१ सर्व लक्षणांनीं संपन्न. २ शिशुपाल.

व०ति० आराधिला जरि गदाग्रज[1] म्यां अ-गण्यें ॥
पूर्तेष्ट-दत्त-नियमादि[2] बहूत पुण्यें ॥
येऊनियां करिं धरीं मज चक्र-पाणी ॥
चैद्यादि[3] दुष्ट हरि हे न धरूत पाणी ॥ ६ ॥

,, सर्वेश्वरार्पण-विधी करुनी अ-गण्यें ॥
केलीं जरी असति कीं बहु-जन्म-पुण्यें ॥
येऊनियां मज करीं धरिं चक्र-पाणी ॥
हे नातळोत दमघोष[4]-सुतादि कोणी ॥ ७ ॥

,, लग्नाचिया पहिलिया दिवसांत यावें ॥
संगीं समग्र बळ यादव-सैन्य ल्यावें ॥
या चैद्य-मागध-बळांबुधितें[5] मथावें ॥
मातें निशाचर-विधी[6] करुनी हरावें ॥ ८ ॥

,, अंतःपुरांतुनि तुझे न वधूनि बंधू ॥
न्यावें कसें ह्मणसि तूं जरि सौख्य-सिंधू ॥
यांचे कुळीं हरि असे कुल-देवि-यात्रा ॥
तेथूनि तूं मजसि ने शत-पत्र-नेत्रा ॥ ९ ॥

,, शर्वादि सर्व तुझि इच्छिति पाय-धूळी ॥
तूझा प्रसाद नव्हतां मज याच काळीं ॥
जन्मा शतांत मरणें स्मरणें मुकुंदा ॥
अंतीं तुझ्याच धरणें चरणारविंदा ॥ १० ॥

---

१ गद ह्मणून वसुदेवाचा मुलगा होता तो आहे अग्रज ( वडील भाऊ ) ज्याचा, ú कृष्ण. २ (पूर्त + इष्ट + दत्त + नियम + आदि) पूर्त ( लोकोपयोगार्थ धर्मशाळा, विि वगैरे बांधणें), इष्ट (यजन), दत्त (दान), व नियम इत्यादि पुण्यकर्मांनें. ३ चेदिदेशा राजा शिशुपाल वगैरे. ४ दमघोष हें शिशुपालाच्या बापाचें नांव. ५ शिशुपाल व जर संध ह्यांच्या सैन्यरूप समुद्रास. ६ राक्षसविधि. विवाहाचे आठ प्रकार आहेत:—१ ब्राह सालंकृत कन्यादान. २ दैव—यज्ञाच्या शेवटीं ऋत्विजास सालंकृत कन्यादान. ३ आर्ष हीं दोघें (वर व वधू) मिळून धर्माचरण करोत, अशा बुद्धीनें कन्यादान. ४ प्राजापत्य वरापासून गोमिथुन ( गाई व बैल) घेऊन कन्यादान. ५ गांधर्व—वर व वधू ह्यांच ऐकमत्यानें होणारा. ६ आसुर—वरापासून पुष्कळ द्रव्य घेऊन कन्यादान. ७ राक्षस—कन्ये कडील लोकांस हाणमार करून त्यांच्या इच्छेविरुद्ध तिचें हरण. ८ पैशाच—कन्येकडी लोक निजले असतां किंवा दारू वगैरे पिऊन मत्त झाले असतां तिचें हरण.

लिनी. हरि-चरण-सरोजीं रुक्मिणीची शिराणी ॥
विशद लिखित-रूपें बोलिली जे पुराणीं ॥
मनु-ज-तनु-ज जैसा भू-तळीं चक्र-पाणी ॥
जगदव हरि भाषा-रूप हे व्यास-वाणी ॥ ११ ॥

वि० असि विदर्भ-मही-पति-पुत्रिका ॥
लिहि हरी-प्रति संस्कृत पात्रिका ॥
लिखित-भाव तिचा बरवा मनें ॥
उकलिला हृदयांतुनि वामनें ॥ १२ ॥

## वेंचे, भामाविलासांतील.

एकदा **नारदमुनीनें** श्रीकृष्णास स्वर्गांतील पारिजातक वृक्षाचें फूल णून दिलें तें त्यानें **रुक्मिणीला** देऊन टाकलें असें समजल्यावरून णाची दुसरी बायको **सत्यभामा** ही अतिशय रागावली तिची समजूत णानें केली हें या आख्यानांत वर्णिलें आहे.

ख० लता [1]सत्या अंकीं [2]खग-गमन [3]भक्तामर-तरू ॥
[4]तरू हातीं तो श्री-पति भव-नदी-पार उतरू ॥
धरी लक्ष्मी [5]पक्षी कर-तल-युगीं पाद-युगळा ॥
गळां रत्न ध्यावा द्रुम-गरुड-संयुक्त सगळा ॥ १ ॥

ति० कृष्णासि [6]कृष्ण-पद-भक्ति-विशारदानें ॥
जें स्वर्ग-पुष्प दिधलें मुनि-नारदानें ॥
तें रुक्मिणी-प्रति दिलें त्रि-जगन्निवासें ॥
जें द्वारका करि भरोनि सु-गंधि वासें ॥ २ ॥

प्र० असी गोष्टि दासी-जनीं [7]बायकांनीं ॥
विचारूनियां सांगतां जाय कानीं ॥
तईं सत्यभामा महा-क्रोध दावी ॥
[8]बुझावी हरी तेचि लीळा वदावी ॥ ३ ॥

---

१ सत्यभामा कृष्णाची स्त्री. २ गरुडावर बसून संचार करणारा. ३ भक्तांना कल्पसारखा. ४ पारिजातक. ५ गरुड, हा 'धरी', 'आणि' लक्ष्मी ह्यांचा कर्ता. ६ कृच्या पायांच्या भक्तीविषयीं प्रवीण. ७ लोकांच्या बायकांनीं फूल कोठून आणिलें विचारिल्यावरून रुक्मिणीच्या दासींनीं सांगितलें, तेव्हां ती गोष्ट सत्यभामेच्या कानीं . ८ समजूत करी.

द्रु० वि० गडबडां धरणीवरि लोळते ॥
वदवती न कवीसहि लोळ ते ॥
रडत मूर्छित होय घडी घडी ॥
पवन निश्चळ, नेत्र न ऊघडी ॥ ४ ॥

,, अलक हार गळ्यांतिल तोडिते ॥
कुरळ केश मुखावरि सोडिते ॥
कर-युगें उर मस्तक ताडिते ॥
वसन आणिक कंचुकि फाडिते ॥ ५ ॥

शिख० महा-उष्ण-श्वासें करुनि वदते शुष्क अधरा ॥
धरा-पृष्ठीं जोडा न शठ दुसरा या गिरि-धरा ॥
धराया माझा हा कर कपटि कैंचा जनमला ॥
मला जो निंदूनी कुसुम तिस देऊनि रमला ॥ ६ ॥

,, सख्या हो मेल्याही शवहि न शिवो हें यदु-पती ॥
पती नाना-स्त्रीचा पतित जन ही ज्यास जपती ॥
नका येऊं देऊं सदनिं सवतीच्या प्रियकरा ॥
करातें लावीना मज कपटि ऐसें तुह्मि करा ॥ ७ ॥

मालिनी- रडत रडत मूर्छेमाजि वृत्ती बुडाल्या ॥
परम विकळ; मी तूं या स्मृती ही उडाल्या ॥
उचलुनि सखियांहीं मंचकीं दिव्य सेजे ॥
निजविलि मृत-तुल्या सत्यभामा दिसे जे ॥ ८ ॥

स्वागता. ये अशांत सदनांत हरी तो ॥
जो अनादि भव-शोक हरीतो ॥
किंकरीं नमुनियां चरणांतें ॥
सांगती सकळ आचरणातें ॥ ९ ॥

भु० प्र० ह्मणे शोक कां प्राप्त झाला महा हा ॥
अशी कष्टली कां शुभांगी अहाहा ॥
न बोलेचि कां आमुशीं आज राणी ॥
जिच्या बोलण्याचीच आह्मां शिराणी ॥ १० ॥

---

१ श्वास बंद होई. २ जन्मास आला. ३ अंत:करणव्यापार. ४ आह्मापाशीं.

शिख० जयीं श्री-वेत्सांक प्रभु करि निजांक-स्थित शिरा ॥
शिरा-नाडी-प्राण प्रगटति न लावूनि उशिरा ॥
शिराणी शब्दांची पुरवि तरि डोळे न उघडी ॥
घडी जों मानाची विघडलि असे तोंवरि घडी ॥ ११ ॥

" बजागी ते जागी स्व-मनिं परि डोळे न उघडी ॥
घडी एक क्रोधीं मन बुडवि मानें अवघडीं ॥
घडी पूर्व-प्रेम स्थितिस बसतां तीस वि-घडी ॥
घडी स्त्री-जातीची घडविलि असे ख्याति सु-घडी ॥ १२ ॥

" सख्या दुःखी तूझ्या मजसहित कीं कान उगले ॥
गळे नेत्रीं पाणी न निघति मुखीं शब्द सगळे ॥
किती मी प्रार्थीतों धरुनि शिर अंकाच उपरी ॥
परी क्रोधाची हे अधिकचि दिसे अद्भुत परी ॥ १३ ॥

वदे भामा कोपें अति विकळ चावूनि अधरा ॥
धरा-पृष्ठीं नाहीं ठक तुज असा अंबु-ज-धरा ॥
धरावें या अंकीं शिर अजि तिचें पक्षि-गमना ॥
मना आलें देणें कुसुम जिस तें कंस-दमना ॥ १४ ॥

व० ति० जों नेत्र मोडुनि वदे ढकलूनि मांडी ॥
भ्रू-मंडलीं भ्रमण अंगुलि-भंग मांडी ॥
तों कृष्णजी करुनि हास्य ह्मणे अहाहा ॥
वेडे अनर्थ इतुक्यास्तव कां महा हा ॥ १५ ॥

स्वागता. अर्पितां मुनि-वरें सुमनातें ॥
वाटलें प्रथम हेंचि मनातें ॥
कीं असा तरु पुरींत असावा ॥
त्यांतही स्व-सदनींच वसावा ॥ १६ ॥

---

१ ज्याच्या उरःस्थलावर भृगूच्या लातेची श्रीवत्स नांवाची खूण आहे असा प्रभु (कृष्ण). २ आपल्या मांडीवर ठेवलेलें. ३ मस्तकास. ४ जों मानाची घडी विघडली असे, तोंवरि घडि (घटकाभर) डोळे न उघडी असा अन्वय. ५ दुर्वह. हें क्रोधाचें विशेषण. ६ स्त्रीजातीची सुघडी (चांगली) घडी घडविली (अशी) ख्याति असे—असा अन्वय. ७ हातांत कमल धरणाऱ्या कृष्णा. ८ भिंवया फिरविणें. ९ बोटें मोडणें.

व० ति० तत्रापि जे प्रिय बहू स्व-वधूचि माजी ॥
तो स्थापणें तरु तिच्या सदनाचिमाजी ॥
ते तूं प्रिया तुजचि देइन त्या द्रुमातें ॥
हें वाटलें प्रथम आण तुझीच मातें ॥ १७ ॥

स्वागता. फूल देउनि तिला उतराई ॥ होइं मी, समज हे चतुराई ॥
देतसें तरुचि तो तुजला गे ॥ खेद हा न करणें तुज लागे ॥ १८ ॥

भु० प्र० तुतें वृक्ष देणेंचि यालागिं आधीं ॥
फुलें नाशिला जो तिलो होय आधी ॥
न जाणोनि केले तुवां कष्ट भारी ॥
समाधान ऐसें करी कैटभारी ॥ १९ ॥

## वेंचे, रुक्मिणीविलासांतील.

एके समयीं रुक्मिणीस मी कृष्णाची अत्यंत प्रियकर आहें असा गर्व झाला होता तो तिचा गर्व कृष्णानें हरण केला ही कथा या आख्यानांत आहे.

मालिनी. करुनि नमन देवा रुक्मिणी-नायकातें ॥
निज पद हरि दे जो कीर्तिच्या गायकातें ॥
स्मरत पद तयाचें त्याचिया लोक-लीला ॥
कथिन हरिति गातां वर्णितां ज्या कलीला ॥ १ ॥

व० ति० चिच्छक्तिला सतत चिन्मय जेविं योग ॥
श्री-रुक्मिणीस न कधीं हरिसीं वि-योग ॥
मी यास्तव प्रियतमा परमा रमा ते ॥
मानी अहंकृति शिवे असि मार-माते ॥ २ ॥

मालिनी. ह्मणउनि खिजवीतो रुक्मिणीतें हरी तो ॥
परम करुण तीच्या मीपणाला हरीतो ॥
कथिन चरित तें जें वर्णिलें श्री-शुकानें ॥
मनिं धरुनि पहावें सज्जनीं हें सु-कानें ॥ ३ ॥

उ०जा० श्री-रुक्मिणीची बहु गोड वाणी ॥ ग्रंथास तेथें न करीन वाणी ॥
कीं कृष्ण जे शब्द अ-गाध वाचे ॥ वदेल ते वर्णिन मा-धवाचे ॥ ४ ॥

---

१ रुक्मिणीला. २ कैटभ दैत्य मारणारा. ३ मुक्ति. ४ अधर्मप्रवृत्तीला. ५ मायेला. ६ ज्ञानस्वरूप—ब्रह्म ( त्याशीं ). ७ मदनाची आई रुक्मिणी हिला. ८ कमताई. ९ आणि.

उ०जा० हा प्रेम-सं-वाद सुखी सु-जाणा ॥ करीतसे, नामहि तेंचि जाणा ॥
आतां शुकाचार्य परीक्षितीतें ॥ सांगे कथा धन्य करी क्षितीतें ॥५॥
भु० प्र० पलंगावरी रुक्मिणीच्या सु-सेजे ॥ बसे कृष्ण, ते त्यास सेवीतसे जे॥
उभी सुंदरी ढाळिते चामरातें ॥ मनीं जे शिवे मीपणा-पामरातें ॥६॥
द्रु० वि० कर मुद्या-वलयांसह चाळितां ॥ चवर माधवजीवरि ढाळितां ॥
ध्वनि उठे चरणीं मृदु भूषणीं ॥ हृदय लग्न जिचें यदु-भूषणीं ॥७॥
" चहुंकडूनिहि आनन शोभलें ॥ पदक खालुनि शोभतसे भलें ॥
श्रवणिंचे नग शोभति दोंकडे ॥ वरुनि चांचर केशहि वांकुडे ॥८॥
" गळसरी दुसरी न धरी गळां ॥ प्रति-भवीं न पती हरिवेगळा ॥
अव-तरे अव-तीर्ण जयीं पती ॥ स्व-अनुरूप परस्पर दंपती ॥ ९ ॥
" कसि असीस अहं-मति वाटते ॥ नरक-जन्म-मृतीसहि वाट ते ॥
ह्मणउनी खिजवूनि तितें हरी॥निपुण कृष्ण अहंकृति ते हरी ॥१०॥
शिख० वरावे ते राजे निजसम तुवां राज-तनये ॥
नये आह्मां ऐसा कँचिदपि वरूं वो सु-विर्णये ॥
दिलें बापें भावें त्यजुनि बरवे ते क्षिति-पती ॥
पती केला ज्याचे कुल-पति समुद्रांत लपती ॥ ११ ॥
स्वागता. घालिती नृपति येउनि वाले ॥ यानिमित्त जलधींत निघाले ॥
शत्रु ज्यास नृप दानव, [10]रीती॥ ऐशियास नवऱ्या न वरीती ॥१२॥
द्रु० वि० त्यजियेलें अजिहि स्व-नृपासना ॥ करिल त्याचि हि कोण उपासना॥
प्रगट गोष्टिहि हे जनिं हो असी॥कळत तूं ठकलीस अहा कसीं॥१३॥
व० ति० ऐश्वर्यवंत वय आकृति हीं समान ॥
स्वार्थार्थि[12] होतिल परस्पर त्यांस मान ॥
मैत्री विवाह न घडे अधमोत्तमातें ॥
तूं भोळलीस[13] नृप-नंदिनि काय मातें ॥ १४ ॥

---

१ सुज्ञास. २ ह्या प्रकरणाचें नांव ही 'प्रेमसंवाद' हेंच समजा. ३ अहंपणा ह्या नीचातें. ४ अंगठ्या व बांगड्या ह्यांसह. ५ कृष्णाच्या ठिकाणीं. ६ चंचल. ७ कधींहि. ८ सुशीले. ९ जरासंधाच्या भयानें कृष्णानें समुद्रांत द्वारका नगरी बांधून तींत आपले सर्व आप्त व इष्ट घेऊन तो राहिला, अशी कथा आहे, तीस लक्षून हें लिहिलें आहे. १० अशी चाल आहे. ११ ययातिराजाच्या आज्ञेनें यदुवंशास राज्याधिकार नव्हता, ह्यास उद्देशून हें ह्मटलें आहे. १२ एकमेकांच्या हितास कारण. १३ भोळेपणानें वश झालीस.

व०ति० एथें सु-जाणपण जाण तुझें बुडालें ॥
कीं दीर्घ-दृष्टिपण तें अवघें उडालें ॥
ज्याला न लेश गुण तो पति काय केला ॥
ज्याकारणें जन अ-किंचन तो भुकेला ॥ १५ ॥

मालिनी. अटन करित भिक्षा भक्षणें ज्या समाजीं ॥
गगन वसन, वारा सूत्र ही त्यास भाजीं ॥
अ-गुणपण जयाचें ऐसिया स्वादु लागे ॥
तुज नृपति-सुते तो कायसा दादुला गे ॥ १६ ॥

उ०जा० आतां तरी क्षत्रिय तूं भला गे ॥ वरीं जयाचा तुज लोभ लागे ॥
जेणें तुला साधति लोक दोनी ॥ आह्मीं वृथा काय बहू वदोनी ॥ १७ ॥

व०ति० झाली असें परिसतांचि अ-नाथ-वाणी ॥
ठावी नसे जिस कधीं असि नाथ-वाणी ॥
त्रैलोक्य-नाथ पति हा प्रिय आपणातें ॥
त्यागावया तिस गमे करितो पणातें ॥ १८ ॥

" दाटूनि कण्ठ पडली वदनास मुद्रा ॥
शोकें भरे जल जसें भरितें समुद्रा ॥
घेऊनि चामर चुडा सह मुद्रिकांहीं ॥
भूई पडे उरि नुरे तनुमाजि कांहीं ॥ १९ ॥

भु०प्र० पडे केळ जैसी महा-चंड-वातें ॥ असें देखतां ये कृपा मा-धवातें ॥
उडी शीघ्र टाकी पलंगा-वरूनी ॥ धरी उत्तरीयांबरा सांवरूनी ॥ २० ॥

मालिनी. मजविण न सुखाचा तूज तों हेतु कांहीं ॥
समजत तुझिया या पाहतों कौतुकांहीं ॥
निज-वचन विनोदें बोलिलों तूजला गे ॥
न कळत गति येंची खेद हा तूज लागे ॥ २१ ॥

---

१ ऐश्वर्यादि; पक्षीं सत्त्वरजस्तम हे तीन. २ भिकारी; पक्षीं विरक्त. ३ आकाश हेंच वस्त्र. ४ कमरेला. ५ गुणराहित्य ( मूर्खपणा; पक्षीं सत्त्वादि गुणांचा अभाव ). ६ दीनासारिखी. ७ बोलवेनासें झालें. ८ वाऱ्यानें. ९ पांघरलेल्या वस्त्राला. १० ह्या वचनाचा रोंख.

मालिनी. नयन-शर धनुष्यें भोवयांच्या प्र-तापें ॥
श्रवणवरिहि येती तांबडे कोप-तापें ॥
अधर थरथरीती रक्त-वर्ण स्व-भावें ॥
असिस तुज पहावें बोललों याचि भावें ॥ २२ ॥

,, जरि निपट दरिद्री जो न लाहेचि कांजी ॥
तरि अमृत मिळाल्या त्यास सोडील कां जी ॥
तसि बहुत उणी मी लभ्य झालास मातें ॥
ह्मणउनि वरिलें म्यां तूज सर्वोत्तमातें ॥ २३ ॥

उ० जा० राज्यादिकें टाकुनि निर्विकारी ॥
त्वदर्थ होतात असे भिकारी ॥
राज्यांत दुःखें, सुख तूजमाजीं ॥
ह्मणून तूं श्लाघ्य तया समाजीं ॥ २४ ॥

भु० प्र० सुधा मानुनीयां पितो एक कांजी ॥
सुधा-पान-कर्ता शिवे त्यास कां जी ॥
तसी टाकुनी मी तुला मंगळाला ॥
नृपाला तयां कां भजों वोंगळांला ॥ २५ ॥

---

# वेंचे, लोपामुद्रासंवादांतील.

**रावणाला** मारल्यानंतर **लंकेहून राम** सीतेला घेऊन अयोध्येकडे चालला असतां वाटेंत अगस्त्य ऋषीच्या आश्रमांत उतरला. तेथें अगस्त्य ऋषीची बायको लोपामुद्रा व सीता यांजमध्यें झालेला सेतुबंधाविषयींचा संवाद या आख्यानांत वर्णिला आहे.

शालिनी. वंदूनि श्री-राम [4]संसार-साक्षी ॥
ज्याचे अंकीं जानकी सारसाक्षी ॥
लोपामुद्रेशीं तिशीं शब्द-माला ॥
झाल्या अर्पूं त्याचि सर्वोत्तमाला ॥ १ ॥

---

१ कोपतापें तांबडे नयनशर ( कटाक्षरूप बाण ) भोवयांच्या धनुष्यें प्रतापें श्रवणवरिहि ( कर्णपर्यंत ) येती असा अन्वय ह्म० जी रागानें लाल झालेले डोळे भिवया चढवून आकर्ण फिरवित आहे अशीस. २ कामक्रोधादिविकाररहित. ३ कल्याणस्वरूपाला. ४ आपण अलिप्त राहून प्राण्यांचीं सदसत्कर्मे पाहणारा. ५ शब्दपरंपरारूप माला.

व॰ ति॰ मारूनि रावण [1]विदेह-सुता-श्रमातें ॥
नासूनि ये [2]कलश-संभव-आश्रमातें ॥
[3]तो सिंधु बिंदु करि हा मनिं गर्व वाहे ॥
त्याची वधू, विदितसे मति राघवा हे ॥ २ ॥

उ॰ जा॰ न तीपुढे सेतु-कथा वदावी ॥ ह्मणोनि सीतेप्रति भाव दावी ॥
बोलोनि ही सांवरिजे स्व-वाचा ॥ हा शब्द तो सूचवि [4]लाघवाचा ॥ ३ ॥

भु॰ प्र॰ विचारी मनीं सर्व-संसार-साक्षी ॥ जरी वारिली जानकी सारसाक्षी ॥
सदा सेतु-लीला-[5]निदिध्यास तीतें ॥ वदेल स्व-वाचे ऋषीचे सतीतें ॥ ४ ॥

व॰ ति॰ सर्वा कथा कथिं अगस्ति-वधूसि सीते ॥
[6]क्षाराब्धि-सेतु-रचना न कथीं सतीतें ॥
कीं चूळ जो जलधिची करि त्या मुनीची ॥
कांता वदेल तव वल्लभ-कीर्ति [7]नीची ॥ ५ ॥

उ॰ जा॰ प्रमाण आज्ञा ह्मणवूनि रामा ॥ वंदूनि जातां मुनि-वर्य-धामा ॥
[8]पुसे तिला क्षेम तया प्रसंगीं ॥ [9]सं-वाद हा राघव-विप्रसंगीं ॥ ६ ॥

स्वागता. राम तो [10]रमे-रत नित्य वि-रक्त ॥ हा नसेल तुजशीं अनु-रक्त ॥
कीं असेल सुख तें वद सीते ॥ सांग गोष्टि हि [11]सुख-प्रदसी ते ॥ ७ ॥

" काय बोलत असे अभि-राम ॥ श्रांत तूज अवलोकुनि राम ॥
सांग आणिकाहि वल्लभ-वार्ता ॥ ज्या कथा करिति सौख्य [12]भवार्ता ॥ ८ ॥

उ॰ जा॰ वि-रक्त बाई रघु-राज साचा ॥ भोक्ता नव्हे [13]राजस-तामसांचा ॥
न या बहू [14]कल्प-तरूपमा ते ॥ दे सोहळे [15]कल्पित-रूप माते ॥ ९ ॥

मालिनी. जसि बहु रवि-तप्ता साउली गोड वाटे ॥
तसि वनि पति-लाडें मानिनें कोड [16]वाटे ॥
[17]घरिंहुनि मज बाई सोहळे काननाचे ॥
[18]से-जल-जल-द-संगें मोर वो कां न नाचे ॥ १० ॥

---

१ जनकाची मुलगी सीता तिच्या दुःखातें. २ अगस्तिऋषीच्या पवित्र स्थानातें. ३ अगस्तिऋषि. ४ खुबीचा. ५ मोठा ध्यास. ६ क्षारसमुद्रावर सेतु बांधणें. ७ तुच्छ. ८ ह्याचा कर्ता लोपामुद्रा. ९ राम व अगस्ति हे एकीकडे असतां लोपामुद्रा व सीता ह्यांचा हा पुढील संवाद झाला. १० आपल्या स्वरूपीं रममाण. ११ सुखप्रद अशी. १२ संसार-दुःखानें पीडलेल्यास. १३ राजस व तामस ह्या विषयांचा. १४ कल्पतरूची उपमा. १५ जे जे मनांत आणावे ते. १६ मार्गांत. १७ घरांतल्यापेक्षां. १८ पाण्यानें भर-लेल्या मेघाच्या संगतीनें.

शिख० पथीं मार्गे मार्गे परम अनु-रागें रघु-पती ॥
उभा राहे पाहे गुणहि मुनि हे हेचि जपती ॥
कृपापांगें अंगें निववि कारि संसार-धिंवसा ॥
धरा माता, भ्राता शशिच सविता होय दिवसा ॥ ११ ॥
मालिनी. रघु-पतिसह शय्या भूमि हे माय वाटे ॥
मृदु सु-पथिहुनी ही मानितें पाय-वाटे ॥
श्वशुर दिन-मणी ही होय एणांक भाऊ ॥
न कळत जन ऐसें क्लेश निः-शेष भाऊ ॥ १२ ॥
भु० प्र० तिथें पावलों अत्रिच्या आश्रमातें ॥
तयाची वधू ते हरी वो श्रमातें ॥
तयीं हार हे गंध लावूनि घाली ॥
स्व-आतिथ्य-कौशल्य दावूं निघाली ॥ १३ ॥
व० ति० ये देखतां बहु कृपा मज दत्त-माते ॥
पूजूनि ये रिति वदे सति उत्तमा ते ॥
वेणी फणी करील वो तुज कोण वाटे ॥
वाईट हें मज ह्मणे मुलि फार वाटे ॥ १४ ॥
स्वागता. म्लानता कधिं न यो सुमनातें ॥
क्लेश केश न करोत मनातें ॥
गंध आर्द्रचि असो अनसूया ॥
दे असा वर न जीस असूया ॥ १५ ॥
मालिनी. कर-तल न दुखों दे फोड वो जेविं वोंणी ॥
वनिं धरि मन माझें ये रिती चाप-पाणी ॥
कनक-मृग ह्मणे, तों पाठिसी राम लागे ॥
दश-मुख हरि ऐशांमाजि मेला मला गे ॥ १६ ॥
भु० प्र० मृग प्राण सोडी तयीं दीनवाणी ॥
अरे लक्ष्मणा धांव ऐशी सु-वाणी ॥

१ कृपाकटाक्षानें. २ हौस. ३ दिवसा सविता भ्राता शशिच होय:—ह्मणजे रामाच्या बरोबर असल्यानें सूर्यही चंद्रासारखा थंड वाटला. ४ सूर्य हा सासरा असून भाऊ जो चंद्र ह्यासारखा वाटला. ५ अशी माझी स्थिति न समजणारे लोक मला सारे क्लेशच होतात असें (खुशाल) मानोत असा अर्थ. ६ दत्तात्रेयाची आई अनसूया तिला. ७ जसें. ८ धनुष्य धारण करणारा राम. ९ सोन्याचा हरिण. १० इतक्यांत.

वदे; तों मला राम-वाणीच वाटे ॥
ह्मणोनी बळें लोविलें त्याच वाटे ॥ १७ ॥

भु० प्र० न जातां, तया बोलिलें दुष्ट वाचा ॥
अरे घात तूं इच्छिसी राघवाचा ॥
तुला प्राप्त होणार कां देवरा मी ॥
धरीसी असा कां ह्मणें भाव रामीं ॥ १८ ॥

,, अशा शब्द-बाणीं सुमित्रात्मजाला ॥
अवो विंधितां तो मृत-प्राय जाला ॥
रडे जाय तो राघवा लोक-पाळा ॥
करूं काय आतां ह्मणे मी कपाळा ॥ १९ ॥

स्वागता. जाय तो रडत दाटत कंठ ॥ प्राप्त होय मजला दश-कंठ ॥
पद्मिनी उपडुनी गज हस्तीं॥ने तसा उचलुनी मज हस्तीं ॥२०॥

मालिनी. असि सकळ अनर्थी मूळ माझीच वाणी ॥
धरुनि मज पळे तैं होय मी दीनवाणी ॥
बहुत मज-निमित्तें राघवें शोक केला ॥
करुण ह्मणुनि, नें स्त्री-काम कामीं भुकेला ॥ २१ ॥

द्रु० वि० मज-निमित्त करी गडि वानरां ॥ सुलभ जो न सुरां अथवा नरां ॥
धरि मदर्थ असा व्यवसाय कीं ॥ दश-मुखा वधि राघव सायकीं॥२२॥

,, कारिं करी कमला कमला-पती ॥ मथुनि सिंधु असाचि मला पती ॥
जलधि-मध्य-पुरींत तिचा धणी॥वधुनि दे मज आत्म-सुखें धणी ॥२३॥

स्वागता. जे जळांत बुडणार तीव्र ते ॥ थोर पर्वत अवो पति-व्रते ॥
सागरीं तरति सेतु-वाट ते ॥ हे अ-तर्क्य करणीच वाटते ॥ २४ ॥

द्रु० वि० परततां जळधीवरि पाहतें ॥ तरति पर्वत, विस्मित राहतें ॥
जळ-तळावरि हो धरणी सये॥कारि, नसे तुळणा करणीस ये॥२५॥

---

१ त्याचें कर्म लक्ष्मणास (अध्याहृत). २ सुमित्रेचा मुलगा लक्ष्मण त्याला. ३ स्त्री-काम ह्म० स्त्रीलंपट, किंवा विषयासक्त असल्यामुळें त्यानें शोक केला असें नाहीं, तर त्याचें अंत:करण अत्यंत दयार्द्र होतें ह्मणून मज अबलेवर भयंकर प्रसंग गुदरलेला पाहून त्यानें शोक केला. ४ मारिता झाला. ५ समुद्रामध्यें असणाऱ्या पुरींत (लंकेंत). ६ रावण. ७ ह्या.

भु० प्र० समुद्रावरी सैन्य ये पाय-वाटे ॥ मनीं हें सदा जीस आश्चर्य वाटे ॥
कशी सेतुची गोष्ट तीच्या सु-वाचे ॥ न ये, वीसरे बोल ते राघवाचे॥२६॥
,, शरीरीं भरे वर्णितां राम-वारें ॥ उठाणें मनाचीं तयीं दुर्निवारें ॥
पतीचीं यशें जे निरोपीत जाते ॥ वदे गोष्टि हेही विदेहात्मजा ते ॥२७॥
,, विदेहात्मजा पावली वि-स्मृतीतें ॥ ह्मणे बांधिला सिंधु जों त्या सतीतें ॥
जसें हास्य ये, स्वामिच्या भारतीतें॥स्मरे, तों स्फुरे हा चमत्कार तीतें॥२८॥

व० ति० क्षाराब्धि-सेतु ह्मणि सांगसि तीस सीते ॥
जीचा पती जळ-धि चूळ करी तसी ते ॥
शब्दांत या रघु-पतीच खुणेस दावी ॥
कीं क्षार मूत्र अशि गोष्ट पुन्हा वदावी ॥ २९ ॥

शिख० ह्मणे लोपामुद्रा चुळभरि समुद्रा करि पती ॥
तया या आयासेंकरुनि उतरे कां रघु-पती ॥
द्विजाच्या हो मूत्रा शिवति अ-पवित्रा न कपि ते ॥
ह्मणे सीता नाहीं-तरि स-गिरि-सप्ताब्धिहि पिते ॥ ३० ॥

---

## वेंचे, वामनचरित्रांतील.

बळीनें इंद्रपद हरण केल्यानंतर तें पुन्हा इंद्रास द्यावें ह्मणून, विष्णूनें वामनाचा अवतार घेऊन बळी यज्ञ करित होता तेथें येऊन त्यापाशीं आपल्या पावलानें तीन पावलें जमीन मागितली. बळीनें घे ह्मटल्यावर वामनानें विश्वव्यापक रूप धरून दोन पावलांत भूलोक व स्वर्गलोक व्यापिले, आणि पूर्वीच्या वचनाप्रमाणें तो बळीपाशीं आणखी पाऊल-भर जमीन मागूं लागला, तेव्हां बळीनें आपलें बोलणें सत्य करण्यासाठीं आपल्या मस्तकावर तिसरें पाऊल ठेवावयास सांगितलें. मग वामनानें त्याच्या मस्तकावर पाय देऊन त्यास पाताळीं घातलें; अशी कथा ह्या आख्यानांत आहे.

---

१ आलें (लोपामुद्रेला). २ पर्वतांसहवर्तमान सात समुद्र.

शा०वि० इंद्राचें पद दैत्य-राज बळि तो [1]विप्र-प्रसादें हरी ॥
तेव्हां कश्यप-मंदिरीं अदितिच्या दिव्य-व्रतें श्री-हरी ॥
झाला वामन, मुंजि तेचि समयीं होतांच भिक्षा-छळें ॥
सर्व-स्व [2]त्रि-पदें हरी, स्मर मना त्याचीं पदें कोमळें ॥ १ ॥

भु०प्र० बळी याग तो नर्मदेच्या तटाकीं ॥ करी, आहुती शुक्र अग्नींत टाकी ॥
अकस्मात तों देखिलें वामनाला ॥ सुखाचा गमे पूर्ण ठेवा मनाला ॥ २ ॥

द्रु०वि० करिं कमंडलु दंड मृगाजिन ॥ त्रि-जग-माप करी बटु वामन ॥
सकल-वेद-विशारद चांगला ॥ कटि-तटीं अति सुंदर मेखला ॥ ३ ॥

शा०वि० तूं गा कोण? [3]अ-पूर्व; कोठ वससी? [4]हें विश्वं जी तत्त्वता; ॥
पाळी कोण तुतें? [5]अ-नाथ अजि मी त्राता न माता पिता; ॥
द्यावें काय तुतें? त्रि-पाद धरणी माझ्या पदें; फार वे; ॥
नेघें, वामन बोलिला बळिस कीं तृप्ति [6]त्रि-लोकीं रिघे ॥ ४ ॥

व०ति० पूजी बळी मग ह्मणे बटु वामनातें ॥
कीं माग जें तव अभीष्ट गमे मनातें ॥
देणार गा [7]ईतर मी मज काम नाहीं ॥
तूं माग जे पुरवितों तव कामना ही ॥ ५ ॥

भु०प्र० ह्मणे धन्य राया [8]स्व-वंशानुसारें ॥ प्रभू बोलसी तूं तुझा बोल [9]सारे ॥
रणीं आणि दानीं तुझीया कुळीं रे ॥ न दे पाठि कोणीच राया बळी रे ॥ ६ ॥

ई०व० राया मला एक असे अपेक्षा ॥ त्याविगळी सर्व जनीं उपेक्षा ॥
मोजूनि माझ्या त्रि-पदेंचि मातें ॥ दे भूमि [10]विप्र-प्रवरोत्तमातें ॥ ७ ॥

---

१ दैत्यांचे कुलगुरु जे भृगु त्यांच्या प्रसादानें.—इंद्राचा पराभव करण्याकरितां भृगूंनीं बळीच्या हातून विश्वजित् नांवाचा यज्ञ करविला; तेव्हां अग्नींतून दिव्यरथ व धनुष्यबाण वगैरे युद्धोपयोगी सामग्री उत्पन्न झाली. ती मिळाल्यावर बळीनें अजिंक्य रथांत बसून इंद्रावर स्वारी केली, आणि त्याचा पराजय करून इंद्रपद घेतलें; अशी कथा आहे. (भाग० स्कं० ८ अ० १५.). २ तीन पावलांनीं. ३ अपूर्व = (अनादि, पक्षीं; विलक्षण) नौखा. ४ विश्वव्यापक, पक्षीं; जगांत कोठें तरी राहणारा. ५ ज्याहून कोणी समर्थ नाहीं, पक्षीं; ज्याचें रक्षण करणारा कोणी नाहीं. ६ तीन पावलांनीं तिन्ही लोक व्यापले ह्मणजे अधिक कांहींच उरणार नाहीं, असा आशय. ७ हें कामाचें विशेषण. ८ आपल्या कुळाला शोभेल अशा रीतीनें. ९ साजे. १० ब्राह्मणांमध्यें अतिश्रेष्ठ जो मी त्या मला.

द्रु॰वि॰ बळि ह्मणे अति सादर वामना ॥ बहुत वाटसि गा बरवा मना ॥
मज अशा भुवन-त्रय-पाळका ॥ बहु न मागसि कां द्विज-बाळका॥८॥
रथोद्धता शब्द मी धरिन मस्तकावरी ॥ ब्राह्मणा अधिक भूमिका वरीं ॥
वाटसी बहुत नेटका मना ॥ जे असेल वद नीट कामना ॥ ९ ॥
द्रु॰वि॰ द्विज-सुता तुझिया वचनामृतें ॥ मज गमे उठतील शवें मृतें ॥
निपुण दीससि निर्मळ आरसा ॥ परि न मागसि अर्थचि फारसा ॥१०॥
,, हरि ह्मणे मजला इतुकें पुरे ॥ त्रि-भुवनात्मक होउनियां उरे ॥
त्रि-पदमात्रचि कार्य असें बरें ॥ अधिक इच्छिति लोक न ते बरे ॥ ११॥
रथो॰ शब्द-भाव बळिलाहि नाकळे ॥ शुक्र सन्निध तयासि तो कळे ॥
तो वदे भुज सभे उभारुनी ॥ त्या बळीप्रतिच हाक मारुनी ॥ १२ ॥
द्रु॰वि॰ अदितिच्या उदरीं हरि जन्मला ॥ ह्मणुनि ये समयीं कळलें मला ॥
वि-भव राज्य समस्त हरील रे ॥ यशहि होइल विस्तृत अस्त रे ॥ १३ ॥
,, ह्मणुनि सांगतसें तुज मी अगा ॥ बस तुं मौनपणें अथवा उगा ॥
ह्मणसि देइन यावरि ही जरी ॥ रिघसि दाटुनि पातक-पंजरीं ॥ १४ ॥
उ॰जा॰ संकल्प जो तूं करिशील बापा ॥ न देववे जाशिल सद्य पापा ॥
पद-द्वयीं विश्व पुरेचि जेव्हां ॥ जावें तुवां कीं नरकासि तेव्हां ॥ १५ ॥
,, करूनि संकल्प न दे द्विजा तो ॥ प्राणी स्व-पापें नरकासि जातो ॥
आधींच नेदीं ह्मणतां भला हो ॥ घेसी ह्मणी वैखरिमात्र लाहो॥ १६ ॥
द्रु॰वि॰ जरि विचारुनि गोंविसि वैखरी ॥ तरिच होईल जाण अगा खरी ॥
ह्मणुनि शुक्र अजी बहु बोलतो ॥ परि तयीं वदला बळि बोलें तो ॥१७॥
भु॰प्र॰ विचारूनि आचार्य-वाचा निदानीं ॥ बळी तो धरी बुद्धि सर्व-स्व-दानीं॥
ह्मणे बोलतां जी जरी सत्य वाणी ॥ द्विजा केविं वाचा वदों दैन्यवाणी ॥१८॥

१ ज्यास्त भूमि माग. २ तीन पावलें जागा दिली असतां ती त्रैलोक्याहूनहि ज्यास्त होईल असा उत्तानार्थ व तीन पावलें मापण्याला त्रैलोक्यहि पुरणार नाहीं असा गर्भितार्थ. ३ नाहींसें. ४ हे दोन्ही शब्द एकाच अर्थाचे आहेत—अशीं वामनाच्या कवितेंत पुष्कळ दुसरीं उदाहरणें आहेत. ५ 'पापा जाशील' ह्म॰ तुला पाप लागेल. ६ नाहीं तर मी देतों असें ह्मणण्याचा मात्र लाभ घेशील, वस्तुत: तुझ्यानें ह्मटल्याप्रमाणें करवणार नाहीं, हा भाव. ७ भाषण,—हें 'वदला' ह्याचें कर्म. ८ विचार करून. ९ दैत्यगुरु शुक्र त्याची वाणी.

मालिनी. [1]निगम-विधि-[?]धानें मांडुनी हे पसारे ॥
यजुनि विविध यागीं वंदिती ज्यासि सारे ॥
वर-द हरिच तो हा विप्र कोण्हीच हो जी ॥
किति तरि मज मागो भूमि देतों अहो जी ॥ १९ ॥

इं०व० सर्व-स्व-दानीं बळि सिद्ध झाला ॥ पूज्यासनीं बैसवि त्या द्विजाला ॥
प्रक्षाळि त्या श्री-पद-पंकजातें ॥ ध्याती [4]रमा-अब्ज-भवादि जातें ॥२०॥

व०ति० आली समीप यजमानिन पट्टराणी ॥
पाहे हरीस जिचि हो न पुरे शिराणी ॥
ओती करें कनक-पात्र धरूनि वारी ॥
सर्व-स्व दे पति तयास न जे निवारी ॥ २१ ॥

उ०जा० करूनि संकल्प करांत पाणी ॥ वाळू ह्मणे पूजुनि चक्र-पाणी ॥
निघे न झारींतुनि नीर-बिंदू ॥ म्लानत्व पावे बळिचा मुखेंदू ॥ २२ ॥

,, कीं शुक्र झारींत रिघोनि गोळा ॥ करूनि अंगें अ[?]नि होय बोळा ॥
फोडी हरी घालुनि दर्भ डोळा ॥ दिसे जना विप्र-कुमार भोळा ॥ २३ ॥

,, ऐशा रिती पूजुनि [5]दानवारी ॥ घाली करीं तें मग [6]दान-वारी ॥
ह्मणे स्व-पादीं अजि भूमि मोजीं ॥ जे अर्पिली; त्याचि पदा नमो जी ॥ २४ ॥

व०ति० संकल्प-युक्त पडतां स्व-करांत पाणी ॥
वाढे त्वरेंकरुनि वामन चक्र-पाणी ॥
पाताळिं पाद-तळ, मस्तक सत्य-लोकीं ॥
कर्णीं दिशा, दिन-मणी नयनावलोकीं ॥ २५ ॥

उ०जा० एका पदें भूमि भरोनि थोडी ॥ दुज्या पदें अंड-कटाह फोडी ॥
दे तीसरा पाद ह्मणे बळीला ॥ ह्मणोनि पाशीं दृढ आकळीला ॥ २६ ॥

,, याकारणें प्रार्थुनियां हरीची ॥ करी स्तुती प्रेम-रसें [?]विरिंची ॥
प्रल्हाद आजा बळि भू-पतीचा ॥ आला महा-भक्त रमा-[?]

,, ह्मणे तुवां हे दिधली त्रि-लोकी ॥ नेली तुवां पूर्ण-[?]
केला तुवां दंड कृतार्थ झाला ॥ प्रल्हाद इत्या[?]

---

१ वेदोक्त कर्ममार्गाप्रमाणें. २ खटपटी
४ लक्ष्मी, ब्रह्मा आदिकरून. ५ दानव+अ[?]
७ नमस्कार असो. ८ कटाह ह्म० क[?]

प्रार्थुनि ह्मणे उगी, हा स्वस्ति असो सर्व-विप्र-राय कवी ॥ १९ ॥
त्यावरि गुरु-कन्योक्तें पुष्पें आणावयासि जाय वना ॥
सांपडला त्या अ-सुरां कच जैसा वत्स [1]एकला यवना ॥ २० ॥
पुनरपि त्या पापांनीं सद्विप्र-कुमार चरचरा चिरिला ॥
भय न धरिलें तिळहि त्या पापाच्या जोडितां महा-गिरिला ॥२१॥
खंड तिळ-प्राय करुनि नेउनि केले नि-मग्न जळ-धींत ॥
नाहींच धर्म करुणा पाप-भय विचार-लेश [2]खळ-धींत ॥ २२ ॥
जो मुनि तयासि [3]कन्या-प्रिय-काम दयाळु काव्य तो तारी ॥
रज गोळा करुनि घडी शिष्याची मूर्ति जेविं [4]वोतारी ॥ २३ ॥
पुनरपि तो कच वधिला केला तद्देह दग्ध रुष्टांनीं ॥
शुक्रासि पाजिलें हो तद्भस्म [5]सुरा-रसांत दुष्टांनीं ॥ २४ ॥
कच न दिसतां रडे [6]सुर-यानी, तीतें पिता ह्मणे कां गे ॥
वत्से रडसी, ऐसें पुसतां तैसेंच ती पुन्हा सांगे ॥ २५ ॥
शुक्र ह्मणे वत्से मी वांचवितों परि पुनः पुन्हा मरतो ॥
आग्रह धरूनि ह्मणसी [7]प्रेत-गति-गतहि कच पुन्हा परतो ॥ २६ ॥
त्यज शोक, मत्प्रसादें तुज काय उणें, मुली नकोचि रडों ॥
दाटुनि माथां वाहुनि दुर्वह दुःखाद्रिला नको चिरडों ॥ २७ ॥
ती तातासि ह्मणे कच गुरु-भक्त कुलीन साधु-कार्य-कर ॥
जरि त्यासि सोडिलें जल तरि जल सोडूं मलाहि [8]आर्य-कर ॥२८॥
ब्रह्म-घ्नां शिष्यांची भीड धरुनि साधु शिष्य मोकलिला ॥
[9]ह्मणातिल न ऐकवे तें न स्व-हित कचीं असें गमो कलिला ॥ २९॥
स्व-मनिं ह्मणे [10]कवि-सत्तम मळवावें पंडितें न यश, हाणी ॥
प्राणाचीहि बरी परि न यशाची, सांगती नय शहाणी ॥ ३० ॥
मग मेळवी महात्मा एकत्र समस्त अ-सुर, कोपानें ॥
खवळे [11]प्रिय-पुत्र-भासित-मिश्रित-मधुच्याहि तज्ज्ञ तो पानें॥ ३१ ॥

१ सुखरूप. २ दुष्टांच्या मनांत. ३ मुलीची आवड पुरविण्याची ज्याची इच्छा आहे असा. ४ ओतकाम करणारा. ५ मद्यांत. ६ देवयानी. ७ प्रेताच्या अवस्थेस गेलेला ह्मणजे मेलेला. ८ आर्य ह्मणजे थोर जो तूं त्याचा हात. ९ कचापासून आपलें हित नाहीं असें दुसऱ्या वाटेल तर वाटो, परंतु आपणाला तसें न वाटावें. १० पंडितश्रेष्ठ. ११ आवडत्या पुत्रवत् मानलेल्या कचाची राख मिसळली आहे ज्यांत अशा मद्याच्या प्राशनानें.

अ-सुरांसि ह्मणे कां रे नेणा अद्यापि मत्तपा, मरतो- ॥
कीं वांचतो पतंग न भी जो ज्वलनासि मत्त पामर तो ॥ ३२ ॥
विप्र अ-वध्य ह्मणे श्रुति हाणोनि तिच्याहि लात हाकेला ॥
कच-हननें सुर-गुरुचा न तुह्मीं माझाचि घात हा केला ॥ ३३ ॥
ब्राह्मण जगन्मान्य पुरवितो तुमच्या नेत्रीं नसो सेवे केवढा ॥
युक्ताचि मरणारांला हित-परिणामाहि न सोसवे कवळा ॥ ३४ ॥
धिक्कारुनि अ-सुरांतें धर्मचि तो अमृतमय-कथा शिकवी ॥
बाहे कन्या-विद्या-दिव्य-तपस्या-बळें कचासि कवी ॥ ३५ ॥
जों गुरु वत्स कच ह्मणुनि एहि असे तो ह्मणारस्या योनी ॥
तों विद्या-सामर्थ्यें उपजूनि गुरूदरीं हाणे तो जी ॥ ३६ ॥
उदर-प्रवेश पुसता आला तो पुण्य-राशि शुक मुनी ॥
सांगुनि मठ-हाट ब्रंग एय वर्ता काळ हा शिशु ह्मुनी ॥ ३७ ॥
निर्भय वचन काळ करूनि पनिवोहरी अद्यापि मुनें ॥
न हित गुरूदर-दारण नियतां मज निर्दिनीय माझु गुणें ॥ ३८ ॥
शुक ह्मणे वत्से कच कुक्षि विदारुनि निघ बाहेर ॥
हा तरल्याचि परि तुझें या कु-व्यसनीं बुडेल माहेर ॥ ३९ ॥
सुरयानी त्यासि ह्मणे वदतां हें अ-शुभ काय हो तात ॥
व्हावे दोघेहि मला चिंता-मणि हेचि पाय होतात ॥ ४० ॥
तारुनि शिष्यासि तरो गुरु, ह्मणत्यें पात्र कैन्य कान्या या- ॥
नोहे वरासि वर-दा, जाणसि तूं सु-ज्ञ-नायका न्याया ॥ ४१ ॥
भींड मुतेची भारी विद्या संजीविनी कचा शिकवी ॥
गुरुव्याहि वांचवाया योग्य करी सज्जना कचासि कवी ॥ ४२ ॥
गुरु-कुक्षि विदारुनि कच बाहेर निघे परंतु बहु तो भी ॥
उठवुनि गुरु संकोचें नमुनि रडे, कुळ-ज-कीर्तिचा लोभी ॥ ४३ ॥
कच-घातकासुरांतें सुरयानीचा स्वयें जनक दापी ॥

१ माझ्या तपश्चर्येस. २ लागलीच काढतां. अथवा मत्ते ह्मणजे ही मत्य काढा ह्मणजे टाकून था. ३ अमृतासारख्या गोड वाणीचा. ४ यं. ५ शुक्र या पोटांत ६ ओ. ७ कच ह्मणाला. ८ गुरूचें पोट फोडणें. ९ ह्या तुझ्या दुष्ट नादानें मी मरेन, असा भाव. १० कन्येहून इतर ११ कच कुळीनाच्या कीर्तीचा लोभी होता म्हणून गुरूचें पोट फोडून निघाल्या वाचवी त्यास शरम वाटली असा भावार्थ. किंवा कुळज जो असतो तो कीर्तीचा लोभी असतो. १२ कचाला मारणाऱ्या दैत्यांतें.

कीं जो ब्रह्म-द्वेष्टा कुशल न पावेल तो जन कदापी ॥ ४४ ॥
समजा बरें जसा मी विप्र गुरु तसाचि हा कच, पळाला ॥
ब्रह्मांडांतुनि जरि रिपु वधिन न देतांचि हा क चपळाला ॥ ४५ ॥
अ-सुरांसि करुनि शिक्षा बाहु उभारुनि ह्मणे अहो कानीं- ॥
घ्यावें माझें हित-कर मर्यादा-वचन साधु लोकांनीं ॥ ४६ ॥
जो विप्र आजपासुनि मद्य-प्राशन करील तो पापी ॥
ब्रह्म-घ्ना-सम निश्चित असि मर्यादा स्वयें कवि स्थापी ॥ ४७ ॥
वर्षं सहस्र होता कच गुरु-सेवेंत, मग तया प्राज्ञा ॥
शुक्रें बहु संतोषें दिधली जाया पित्याकडे आज्ञा ॥ ४८ ॥
कच सिद्ध होय जों तों शुक्र-सुता त्या मनोहरा उचिता ॥
स्व-कर-ग्रहार्थ विनवी बहु आवडली सु-विद्यता शुचिता ॥ ४९ ॥
जें गुरुचें तेंच तिसीं पूज्यत्वाचें धरूनि कच नातें ॥
ठेवूनि दृष्टि धर्मीं तो न तिच्या मान्य होय वचनातें ॥ ५० ॥
पडतां गळां ह्मणे कच भगिनीला वरुनियां न भाउ तरे ॥
करितां अ-धर्म सद्यः स्व-पितृ सुहृज्जन-मुख-प्रभा उतरे ॥ ५१ ॥
सुख व्हावें तरि धर्माप्रति म्हण माथां वसें नसें दूर ॥
पूजा कैंची लोकीं जरि दगड शिरीं धरी न सेंदूर ॥ ५२ ॥
धर्म अनंत असो परि तो करितां कीर्तन स्वसे वेचे ॥
सांग प्रकार याहुनि दुसरे कांहीं मज स्व-सेवेचे ॥ ५३ ॥
ज्या उदरीं वास तुझा तेथें माझाहि हें असे नातें ॥
केवि कर-ग्रहण करूं सं-मत धर्मासि जें असेना तें ॥ ५४ ॥
बहु दिवसांची आशा तत्काळ च्छेदितां कचें, रुष्टा- ॥
शुक्र-सुता त्यासि म्हणे, ‘रे कपट-पटो भला भला दुष्टा ॥ ५५ ॥
‘एक कृत-घ्ना जरि मी उठवाचि मदर्थ या हता शत-दा’,
ऐसें गुरुस न ह्मणतें कैसा उठतास तूं हताश तदा ॥ ५६ ॥
तूं मलिन कुटिल नीरस जडहि पुनर्भवपणें हि केंचसा च ॥

१ नियमाचें भाषण. २ आपल्या पाणिग्रहणाकरितां ह्मणजे आपणाशीं लग्न लावण्यासाठीं. ३ कचाची विद्वत्ता व शुद्ध आचरण हीं तिला फार आवडलीं. आपले वडील व इष्टमित्र यांचें तोंड उतरतें. ५ नष्ट. ६ मळकट, पक्षीं पातकी. ७ कुरळे, पक्षीं कपटी. ८ शुष्क, पक्षीं प्रीतिरहित. ९ अचेतन, पक्षीं मूर्ख. १० वारंवार उत्पन्न होण्यानें, पक्षीं वारंवार मरून जीवंत होण्यानें. ११ केंसासारिखा.

धरिला शिरींहि न स्व-प्रकृति-गुण त्यजिसि नाम कच साच ॥ ५७ ॥
न करीं वि-फळ मदाशा आशा भंगूं नयेचि साधूंनीं ॥
जरि भंगिसील, विद्या सिद्ध नसो जीस नेसि साधूनी ॥ ५८ ॥
कचहि ह्मणे गुरु-वेदानुज्ञा नाहीं ह्मणोनि या कर्मा ॥
मान्य नसें, हूं शापीं कीर्ति-करचि शाप न चुकतां धर्मा ॥ ५९ ॥
पढवीन ज्यासि विद्या ही त्यासि फळेल, तूंहि घे शाप ॥
तुज कोणीही ऋषि-सुत न वरील, फळो तुझें तुला पाप ॥ ६० ॥
जातां स्वर्गीं मिरविति निज-गुरु-सुत-रत्न देव यानीं तें ॥
वर्णिति दैत्यांतें किति, किति कवितें, कितिक देवयानीतें ॥ ६१ ॥

---

## आर्या–आदिपर्वांतील सुभद्राहरणप्रकरणीं.

(म० भा० अ० २१९-२२०.)

**धर्म** व **द्रौपदी** हीं उभयतां एकांतीं असतां कांहीं कारणानें त्यांस पाहण्याचा दोष **अर्जुनाच्या** हातून घडला; त्याच्या निवृत्तीकरितां तो तीर्थाटनास गेला. तेव्हां फिरत फिरत पश्चिमादिशेस **द्वारकेजवळ प्रभासतीर्थीं** आल्यावर, त्यानें, कृष्णाची धाकटी बहीण **सुभद्रा** ही **बळरामानें दुर्योधनास** देण्याचा निश्चय केला आहे, हें वर्तमान ऐकिलें. तेव्हां ती आपणास प्राप्त व्हावी म्हणून कृष्णाच्या अनुमतानें त्यानें कपटसंन्यास घेतला, आणि संधि पाहून सुभद्रेचें हरण केलें. मग हा अर्जुन असें समजल्यावर बळरामानें त्यास मोठ्या आदरानें बोलावून आणून सुभद्रा दिली. ही कथा ह्यांत आहे.

तीर्थें हिंडत गेला धर्मानुज अर्जुन प्रभासाला ॥
आप्त-मुखें निज-मातुल-कुल-वृत्तांतासि ऐकता झाला ॥ १ ॥
कृष्णानुजा सुभद्रा लग्नाला योग्य जाहली आहे ॥

---

१ आपला स्वाभाविक गुण. २ ब्राह्मणाचा मुलगा. ३ आपल्या गुरूचा उत्तम पुत्र (कच). ४ ह्या आर्या आजपर्यंतच्या नवनीताच्या आवृत्तींत मोरोपंताच्या नांवाखालीं दिलेल्या आहेत. परंतु मोरोपंतकृत आदिपर्वांत ह्या आर्या नसून अर्जुनानें त्रिदंडी संन्यास घेतल्याबद्दल भारतांतहि आधार नाहीं. शिवाय भारतातील कथाभाग व मोरोपंतकृत आदिपर्वांतील कथाभाग अगदीं मिळते आहेत. याकरितां ह्या आर्या मोरोपंतकृत आहेत किंवा नाहींत याचा संशय वाटतो. ५ द्वारकेजवळील एका तीर्थाला. ६ आपल्या मामाचें (वसुदेवाचें) कुल, ह्मणजे यादवकुल, त्याच्या वृत्तांतास.

तीतें स्व-मतें हल-धर [1]धृतराष्ट्र-सुतासि द्यावया पाहे ॥ २ ॥
[2]तातादिक म्हणति मनीं सु-मति खळाला अ-चक्षुला रत्न ॥
शूद्रास श्रुति देतो राम, न चालेचि यापुढें [3]यत्न ॥ ३ ॥
ऐकुनि मनीं म्हणे मज [4]तीर्थ-स्नायीस जाहली शुद्धि ॥
या सु-कृतें ते व्हावी प्राप्त वि-रक्तास जेविं सद्बुद्धि ॥ ४ ॥
[5]निज-सुख-सिद्धि सुभद्रा साधाया होइन [6]त्रिदंडि यती ॥
प्रिय तीहूनि नसे मज; [7]ती कीं ही रीति गति, अहो नियती ॥ ५ ॥
पार्थ त्रिदंडि-वेष स्वीकारी हल-धरासि [8]वंचाया ॥
युक्तीनें [9]स्व-पर-वि-हित-हित करितां कपट-दोष कैंचा या ॥ ६ ॥
द्वारवतींत वसे तो यति [10]वार्षिक चौर मासपर्यंत ॥
[12]हें अंतः-करणासचि ठावा [13]तें योग जो [14]सं-पर्यंत ॥ ७ ॥
मौन, सदा एकांत-स्थिति, साधु-समाधि-योग, [15]सु-विरक्ती ॥
सक्ति न लोक-समाजीं; लागे पौरांसि पार्थ-यति-भक्ती ॥ ८ ॥
रामासहि कळलें कीं योगी मोठा असे ह्मणे पाहूं ॥
आहों ब्रह्मण्य तया आणूं भिक्षेसि शिर पदीं वाहूं ॥ ९ ॥
तो यति एके दिवशीं बळदेवें आणिला स्व-गेहास ॥
पूजुनि सु-श्रद्धेनें जेववितां माधवास ये हास ॥ १० ॥
यति-दर्शना सुभद्रा येउनि बैसे निजाग्रजाजवळ ॥
न बळ प्रेक्षी, परि यति-हस्तींचा [16]पाहतां गळे कवळ ॥ ११ ॥
कन्या-रत्न हराया अवसर पाहे जसा खरा चोर ॥
घोर-प्रताप परि मी भीमानुज, कीं [17]अनंत-बळ थोर ॥ १२ ॥
[18]दामोदर दासा दे अनु-मोदन ती हरावया नवरी ॥

---

१ दुर्योधनाला. २ वसुदेव आदिकरून. ३ ह्याचा कर्ता अर्जुन. ४ तीर्थांचीं स्नानें करणारा जो मी त्यास. ५ आपल्या सुखाची साक्षात् सिद्धिच. ६ तीन दंड धारण करणारा संन्यासी. ७ अन्वय-ती (सुभद्रा) कीं ही रीति (संन्यासी रहाणें) (हीच) गति (परिणाम), अहो नियति सुभद्रा प्राप्त होईल तर बरें; नाहीं तर संन्यासीच राहणें बरें. काय प्रारब्धीं असेल कोण जाणे. ८ फसवावयास. ९ आपलें व दुसऱ्याचें योग्य मार्गास अनुसरून केलेलें हित. १० कशाचा-कोणता. ११ चातुर्मास्यभर. १२ फक्त कृष्णाच्या अंतःकरणासच. १३ त्याची संन्यासाची युक्ति. १४ संपूर्ण. १५ तीव्र वैराग्य. १६ त्याचें कर्म सुभद्रा. १७ अनंत (शेष)-बळराम, त्याचें बळ. बळराम हा शेषावतार होता ह्मणून त्यास कवीनें अनंत म्हटलें आहे. १८ कृष्ण.

दादास देव दावी दारक-रीति[1] स्वयें सदैव वैरी ॥ १३ ॥
ताताला मातेला एकांतीं गुह्य वृत्त हें कळवी ॥
बळ-वीर-भीति[2] कोपोपशमोपायासि[3] सांगुनी पळवी ॥ १४ ॥
अनुकूळ ब्रह्म[4] तसें तों झालें मन्मनोरथा पर्व[5] ॥
तीर्थ-स्नान कराया पुर-वासी लोक चालले सर्व ॥ १५ ॥
नर-हय-रथ-गज शिबिकारूढ सकळ वृष्णि-दार[6]-जन चाले ॥
झाले सिद्ध वऱ्हाडी तैसे यदु-भट; धरा बळें हाले ॥ १६ ॥
दिव्य-रथांत सुभद्रा बैसुनि सेनेंत तेधवां शोभे ॥
यन्मुख-सुधाकरें[7] नर-वर-पार्थाशय-पयोनिधि[8] क्षोभे ॥ १७ ॥
तेव्हां धांवुनि बैसे पार्थ सुभद्रा-रथीं जसा पाटीं ॥
सु-चिर-क्षुधित ब्राह्मण हां हां ह्मणतांहि वाढिल्या ताटीं ॥ १८ ॥
समय-ज्ञ चतुर सेवक धनु तूण तशांत देति आणोनी ॥
धांवति रक्षक सैनिक कपट-यति-कृतात्यनर्थ[9] जाणोनी ॥ १९ ॥
त्यांतें ह्मणे सुभद्रा-मुक्ता-हर[10] वीर अर्जुन मराल ॥
समरा लक्षाहि या परि काक तुह्मी गति[11] विसंर्जुन मराल ॥ २० ॥
धर्मानुज मी अर्जुन सिंह, तुह्मी शश-किशोर, आटोपा ॥
या टोपा कवचाच्या भीमा वल्गा[12] उगेची आटोपा ॥ २१ ॥
ऐसें नीट दटावुनि जाय सुभद्रा हरूनि तो पार्थ ॥
मारिति हाका केवळ, नागविला वनिं जसा वणिक्सार्थ[13] ॥ २२ ॥
सार्थक पार्थ करी, ती कैरविणी तो सुधांशु गौरविता ॥
सविता[14] बिसिनीसि वरी, कीं भेटे तो गुण-ज्ञ ती कविता ॥ २३ ॥
श्रुति सत्क्रिय[15] धर्म-पथा शोभविती दंपती तसे स्व-रथा ॥
अन्योन्य-प्रिय संगम तो प्रेमळ भक्त ती मुकुंद-कथा ॥ २४ ॥

---

१ लहान मलाची रीत. २ बाह्यात्कारीं. ३ राग शांत करण्याची युक्ति. ४ परब्रह्म-कृष्ण. ५ ज्याप्रमाणें कृष्ण त्याच्या मनोरथास अनुकूल ( साह्यकारी ) होता, त्याप्रमाणेंच एक पर्वहि त्याला अनुकूल झालें. पर्व असल्यामुळें आपला हेतु सिद्धीस न्यावयास त्यास संधि सांपडली, हें तात्पर्य. ६ यादवांच्या स्त्रिया. ७ जिच्या मुखचंद्राच्या योगानें. ८ नरवर (पुरुषश्रेष्ठ) असा पार्थ (अर्जुन) त्याचा आशय (मन) हाच पयोनिधि (समुद्र). ९ खोट्या संन्याशानें केलेला मोठा अनर्थ. १० सुभद्रा हीच मुक्ता (मोती) तिचें हरण करणारा वीर अर्जुन हाच हंस. ११ थकून. १२ घोड्यांचे लगाम. १३ व्यापारी लोकांचा तांडा. १४ कमलिनी. १५ सत्कर्मानें वागणारा.

झटिति भट-कटक बहु करि कन्या नेली ह्मणोनि बोभाट ॥
वाटे बळासि [1]सांगे जो जो त्या दस्युचाचि तो भाट ॥ २५ ॥
प्रस्फुरदधर-[2]देल प्रभु बलभद्र ह्मणे खरेंचि सांगा रे ॥
कोठें तो कपट-पटू गांठितसे जो पटांत आंगारे ॥ २६ ॥
कोठें रथ, मुसळ पुरे, कवच कशाला, धनुष्य राहों द्या ॥
वत्सेला निज-धर्षण-कर-खळ-[3]दंडोत्सवासि पाहों द्या ॥ २७ ॥
[4]पर्वी अर्णव तैसा भगवान् बळभद्र पुष्कळ क्षोभे ॥
[5]संध्या-राग-सु-रंजित-शरदभ्राहूनि फार तो शोभे ॥ २८ ॥
[6]कोप-ज्वर-भर-कंपित-काय [7]प्रभु लोचनें करी शोणें ॥
होणें पुढें [8]सु-दुर्घट वारावें त्या महेश्वरा कोणें ॥ २९ ॥
जाय हळूच विनय-नत-काय चतुर वृष्णि-राय देव हरी ॥
माय सुतार्थ पतीचें काय गुरूचे नमूनि पाय धरी ॥ ३० ॥
नमनीं प्रकटवि [9]सह-भव सद्गुण शांति-क्षमानुकंपादी ॥
कंपा दीन-सख नुरवि अधरीं, प्रणतींहि भव्य संपादी ॥ ३१ ॥
हांसे बळभद्र ह्मणे कृष्णाक्रूरोद्धवा अहो कळलें ॥
वळलें मन, [10]मत्पद भय सोडा, [11]ओदान बंधुचें टळलें ॥ ३२ ॥
जा जा उठा मुलीला पाहूं [12]वोहूं वरा घरा आणा ॥
प्राणाधिक तो येना तरि घालाव्या [13]मदंघ्रिच्या आणा ॥ ३३ ॥
अथवा कशास शासन-भय धरुनि मनीं पळेल तो दूर ॥
शूर ख्यात पळेना नेऊं द्या [14]पोरिबर्ह अक्रूर ॥ ३४ ॥
धाडा भूषा वसनें दासी-दासाश्व-हस्ति-रथ-रत्नें ॥

---

१ जो जो बळासी (बळरामास) (हें वर्तमान) सांगे (तो तो) त्या दस्यूचा (अर्जुनाचा) भाटच (स्तुतिपाठकच) वाटे-प्रत्येक मनुष्य अर्जुनाच्याच पराक्रमाचें वर्णन करूं लागला; हा भाव. २ रागानें कांपत आहे अधरोष्ठ ज्याचा. ३ आपलें बलात्कारानें हरण करणाऱ्या दुष्टाला जो दंड हाच उत्साह, त्यास. ४ अमावास्या व पूर्णिमा ह्या दिवशीं. ५ सायंकाल-च्या तांबडेपणानें रंगविलेल्या शरत्कालच्या मेघापेक्षां अधिक शोभे, ह्मणजे रागानें फार लाल झाला. ६ अत्यंत कोपानें ज्याचें शरीर कांपत आहे असा. ७ बळराम. ८ अन्वय—(त्याच्या) पुढें होणें (देखील) सुदुर्घट (मग) त्या महेश्वरा कोणें वारावें?—त्या वेळीं बळरामाच्यापुढें जाणें देखील कठीण; मग त्याचें निवारण करण्यास कोण समर्थ? ९ जन्मत: असणारें—स्वाभाविक. १० मत्पद सोडा व भय सोडा. ११ मोठें भय. १२ अर्पण करूं. १३ मत् + अंघ्रि—माझे पाय त्यांच्या. १४ लवाजमा.

झाला भगीरथाचा पार्थ सखा आजि या महा-यत्नें ॥ ३५ ॥
हें रसिक-कर्ण-तर्णक-शत तर्पायासि काम-धेनु कथा ॥
करिती प्रभु-वर अनुचर[1]पर-सुख-कर अनुसरोनि लोक-पथा ॥ ३६ ॥

---

## वनपर्वांतील नलोपाख्यान (म०भा०अ०५३-५७).
### ( मोरोपंत अ० ४. )

सोमवंशांतील **वीरसेना**चा मुलगा **नळ**राजा ह्यास स्वयंवरांत **विदर्भ** देशाच्या **भीम** नामक राजाची कन्या **दमयंती** हिनें वरिलें. ही कथा ह्या आख्यानांत आहे.

श्री-**वीरसेन**-सुत **नळ** निषधेश्वर[2] सु-गुण-मणि-करंडक[3] हो ॥
ब्रह्मण्य-प्रभु दुर्गत दारिद्र्य-समुद्र-वर-तरंडक[4] हो ॥ १ ॥
तो पुण्य-श्लोक रणीं करितां रिपु-वीर-हानि[5] वासवसा ॥
तत्कीर्ति ह्मणे गा श्री-धी[6] हो या योग्य हा निवास वसा ॥ २ ॥
वैदर्भ[7] भीम-राजा होता बहु खिन्न हीनें संतानें[8] ॥
तो भेटोनि सुखविला दमनानें[9] स्वपद-लीन[10] संतानें ॥ ३ ॥
नृप-दास्य-तुष्ट[11] मुनिचें मन त्या मुनिला ह्मणे सखे दमना ॥
झाला शुद्ध करावा संतति-सुख-पात्र हा स-खेद-मना[12] ॥ ४ ॥
ब्रह्मर्षि-वरें[13] दमनें वर दिधला त्या नृपासि संततिचा ॥
झाले तीन सुत, सुता चवथी, गाती गुणौघ[14] संत तिचा ॥ ५ ॥
ठेवी **दम, दांत, दमन, दमयंती** हीं अशीं तयां नांवें ॥
ज्या मुनि-वर-प्रसाद-प्र-भवांतें[15] त्रि-भुवनेंहि मानावें ॥ ६ ॥
भीम-नृ-पति दुग्धोदधि दमयंती श्रीच वपु सु-रुचिर तिचें ॥

---

१ अन्वय—प्रभुवर (बलराम व कृष्ण) लोकपथा अनुसरोनि; रसिककर्ण हें (च) तर्णकशत तर्पायासि अनुचर—पर—सुखकर—(भक्तांना अत्यंत सुख देणाऱ्या) कथा (लीला) कामधेनु करिती. २ निषध देशाचा राजा. ३ (सु + गुण + मणि + करंडक)—चांगले गुण हेच मणि (रत्नें) ह्यांचा करंडा, म्हणजे उत्तम गुण ज्याच्यामध्यें परमेश्वरानें एकत्र सांठविले आहेत असा. ४ दरिद्रीलोकांचें दारिद्र्य हाच समुद्र त्यांतील (तो तरण्यास) उत्तम नौकारूप. मोठा दानशूर हें तात्पर्य. ५ शत्रुभूत वीरांचा नाश. ६ संपत्ति व विद्या ह्या दोघींचा बहुधा एकत्र वास नसतो; परंतु नलापाशीं त्या दोन्ही होत्या हें तात्पर्य. ७ विदर्भ—देशचा. ८ संततीनें रहित असल्यामुळें. ९ ऋषिविशेष ह्यानें. १० आपणाला शरण आलेला. ११ राजाच्या सेवेनें संतुष्ट झालेल्या. १२ खेदयुक्त आहे मन ज्याचें असा. १३ ब्रह्मर्षी-मध्यें श्रेष्ठ. १४ गुणांचा समुदाय. १५ मुनिश्रेष्ठाच्या वराच्या प्रसादानें उत्पन्न झालेल्यांस.

पाहूनि देह दिवसों-दिवस दिसे दीन जरि सु-रुचि रतिचें ॥ ७ ॥
ती पाहिल्यावरि गमे कोणासहि न स्व-रूप सुंदरसें ॥
श्री-वनमाळेहि पुढें मिरवील स्वे-मद काय कुंद रसें ॥ ८ ॥
श्री-कृष्ण रुक्मिणीला, श्री-कृष्णा रुक्मिणी जशी आतां ॥
दमयंतीस नळ, नळा दमयंती आयकों जनें गातां ॥ ९ ॥
नळ नृ-प ह्मणे शिवा ती नवरी हो मज दुजीस न वरी हो ॥
भैमी म्हणे शिवें तो नवरा हो, प्रेम नित्य नव राहो ॥ १० ॥
एका समयीं धरिला हंस नळें तो ह्मणे कृपा कर गा ॥
सोड मला जरि व्हावी ती दमयंती वधू नृ-पा कर-गा ॥ ११ ॥
करिन तुझें गुण-वर्णन जेणें होइल तुझीच नवरी ती ॥
सत्य प्रिय हित वदती शुद्धात्मे न धरितीच नव रीती ॥ १२ ॥
नळ-मुक्त राजहंसासह हंसांची नभः-पथें आली ॥
आली प्रमद-वनीं तों भैमी ही घेउनि प्रिया आली ॥ १३ ॥
भैमी ह्मणे मराळ-ग्रहणेच्छा मन्मनांत आली हो ॥
एकाहि तरि धरूं या विखरा मुका वनांत आली हो ॥ १४ ॥
इतरा हंसांनीं त्या नेल्या बहु लोभवूनी दूरवर ॥
भैमी त्यास धरूं ये ज्या दे असु-दान दान-शूर-वर ॥ १५ ॥
एकांतीं तीपाशीं स्तविला निषधेंद्र तो खगानें हो ॥
जाणो राधेला दे खग-भगवद्वेणु तोख गानें हो ॥ १६ ॥
पुण्य श्लोक निषध-पति नळ खळ-बळ-जल-धि-वाडवानल गे ॥
लोकां महोत्सव-प्र-द तोचि सदा, त्यांसि पाडवा नलगे ॥ १७ ॥
स्मर-बुध-दस्र-रुचिरतर ऐसें ह्मणणार जे न ते लटिके ॥

१ उत्तम आहे कांति ज्याची असें. २ आपला गर्व. ३ आता म्हणजे सांप्रत कृष्ण व रुक्मिणी हीं दोघें जशीं एकमेकांस शोभतात असें लोक म्हणतात; तशीं पूर्वी नल व दमयंती हीं परस्परांस अनुरूप होतीं असें लोक गात होते; हें आम्ही ऐकतों असें कवि म्हणतो. ४ हे पार्वति. ५ होवो. ६ हस्तगत ७ निर्मळ अंतःकरणाचे. ८ नळानें सोडलेला. ९ आकाशमार्गानें. १० क्रीडेच्या बागेंत. ११ भीमराजाची मुलगी दमयंती. १२ हंस धरण्याची इच्छा. १३ हंसरूपी-कृष्णाचा वेणू. १४ दुष्टांचें सैन्य हाच समुद्र त्याला वडवाग्नीसारखा. १५ मोठा आनंद देणारा. १६ पाडवा लोकांस एक दिवस मात्र आनंद देतो, परंतु नल सर्वकाळ आनंद देणारा होता; असा भावार्थ. १७ मदन, बुध व अश्विनीकुमार (हे तिघेहि रूपाविषयीं प्रसिद्ध आहेत) ह्यांपेक्षाहि हा सुंदर.

हैय्यंगवीन जैसें सु-रसिक-रसनेपुढें न तेल टिके ॥ १८ ॥
अनुपम अनु-रूप अनघ जरि वरिला त्वां नृपात्म-जे न नळ ॥
होइल केवळ ताप-द, कीं जो नर नळ न होय तो अनळ ॥ १९ ॥
नळ-कस्तुरीस टाकुनि कां तूं घेतीस अन्य नर माती ॥
जरि वरिती न हरीप्रति घेती ह्मणवूनि धन्य न रमा ती ॥ २० ॥
नर-रत्न तोचि, तूंचि स्त्री-रत्न, उदंड-आड-नांवांचीं ॥
न बुडविति न वा तारिति चित्रें बरवीं हि आड-नावांचीं ॥ २१ ॥
ती सु-मति ह्मणे आर्या त्वां तिकडे ही असेंचि कळवावें ॥
साधो हळुहळु मृदु मधु हित मित बोलोनि चित्त वळवावें ॥ २२ ॥
आज्ञा म्हणोनि एथुनि कळवुनि हें प्रेम तेथुनि उडाला ॥ २३ ॥

इकडे ती उपवर झाली आहे असें भीमराजानें समजून तिच्या स्वयंवराची योजना केली, आणि राजेरजवाड्यांस निमंत्रण केलें त्यानंतरः—

देवर्षि-मुखें परिसुनि शक्र करी धरुनि हरिख गमनातें ॥
त्याच्या विमान येइल काय न येतांचि हरि-खग मनातें ॥ २४ ॥
जों निकट कुंडिनाच्या आले यम-वरुण-भू-भृदर्यनळ ॥
तों तोहि सकळ-सद्गुण-निधि पुण्य-श्लोक वीर-वर्य नळ ॥ २५ ॥
ते सुर ह्मणति अहाहा नळचि सकळ-पुरुष-वर्य वीर-मणी ॥
नवरी न वरील कशी याला पाहोनि सु-मति ही रमणी ॥ २६ ॥
आह्मांलाचि न केवळ लाजितसे व्यक्त लाज हा रविला ॥

---

१ ताजें तूप. २ रुचि घेण्यांत मार्मिक अशा लोकांच्या जिभेपुढें. ३ ज्याला उपमा नाहीं असा. ४ योग्य. ५ निष्पाप. ६ उत्तरार्ध—नळास टाकून तूं जर इतर पुरुष (अनळ) वरशील तर तो तुला संताप देणारा होईल; कारण, जो नळ नव्हे तो अनळ ह्मणजे अग्नि होय ७ नररत्न, स्त्रीरत्न अशा नांवांचीं मनुष्यें पुष्कळ आहेत, परंतु त्या नांवांच्या अर्थास अनुसरून तुह्मां दोघांवांचून कोणी सांपडावयाचीं नाहींत असा भाव. ८ विहिरी आणि नावा ह्यांची. ९ मधासारखें गोड. १० नळाकडून. ११ नारद. १२ विष्णूचा गरुड. उत्तरार्ध दमयंतीकडे येण्याची इंद्राला इतकी उत्कंठा झाली कीं, अतिवेगवान् जो गरुड तोही त्याला वाहनार्थ आवडेना, मग विमानाची कथा कशाला? १३ कुंडिन हें भीमक–राजाच्या राजधानीचें नांव. १४ (यम + वरुण + भूभृदरि + अनळ) = यम, वरुण, ( पर्वतांचा शत्रु ) इंद्र आणि अग्नि. १५ साऱ्या सद्गुणांचा ठेवा. १६ वीरांमध्यें श्रेष्ठ. १७ हा 'आला' ह्या अध्याहृत क्रियापदाचा कर्ता.

आम्हीं निज-तेजो-मद याचिपुढें सर्व आज हारविला ॥ २७ ॥
भेटोनि त्यासि ह्मणती, कार्य-परें सर्वथा न लाजावें ॥
हो अस्मद्दूत, वि-मुख न असें, सत्य-व्रता नला जावें ॥ २८ ॥
होतों दूत नळ ह्मणे कार्य वदा कोण हो तुह्मी चवघे ॥
ओळख देउनि ह्मणती आम्ही भैम्यर्थ पातलों अवघे ॥ २९ ॥
भैमी स्वयें वरू या आम्हां चौघां जणांत अन्य-तमा ॥
हें कार्य, दूत होगा जा गा बा तिजकडेचि धन्य-तमा ॥ ३० ॥
स-स्मित-वदन नळ म्हणे प्रभुजी जो हेतु सुर-वरागमनीं ॥
माझ्याहि तोचि, सर्वांहि मृगांच्या तुल्य सु-रव-राग मनीं ॥ ३१ ॥
दूत करुनि मज तिकडे कार्यास्तव पाठवूं नको पावा ॥
कोणावरिही सु-नय न स्वातिक्रम आठवून कोपावा ॥ ३२ ॥
शक्र म्हणे वदलासि प्रथम तसें वचन मग असें वदसी ॥
अ-चळ करींच असावा व्यवहारीं शब्द संगरीं सदसी ॥ ३३ ॥
भू-प म्हणे या कर्मी पवन हि होईल मज न सांगाती ॥
अंतः-पुर-प्रवेशीं जी प्रभुजी साधु युक्ति सांगा ती ॥ ३४ ॥
शक्र ह्मणे जा गा तूं चिंता आधींच करिशि कां गा ती ॥
आह्मांसि हें कठिण जरि, तरि सु-ज्ञ प्रभु ह्मणोनि कां गाती? ॥३५॥
शक्र-वरें नळ गेला शिरला अंतः-पुरीं सुखें सुर-सा ॥
भैमीच्या हा, याच्या ती सेवी रूप-संपदा सुरसा ॥ ३६ ॥
भैमी हर्षे त्याच्या विधुच्या तशि कुमुदिनी न आगमनीं ॥
सत्कारूनि ह्मणे जी यावें मद्भाषणें न ओंग मनीं ॥ ३७ ॥

---

१ प्रतिकूल, पराङ्मुख. २ होऊं नको. ३ कोणाला तरी एकाला. ४ देवश्रेष्ठांच्या आगमनांत. ५ मधुरध्वनीविषयीं आवड. ६ कृपा करा. ७ ( सुनय स्वातिक्रम आठवून कोणावरीहि न कोपावा, असा अन्वय.) तात्पर्य—तुह्मी व मी एकच कार्याकरितां आलों आहों; ह्मणून त्याच कामासाठीं तुह्मी मला तिकडे दूत करून पाठवितां; परंतु तसें न कराल तर कोणाच्याहि हातून नीतीचें उल्लंघन होणार नाहीं. ८ (सत् + असी)=उत्तम खड्ग. उत्तरार्ध—व्यवहारीं शब्द अचल असावा; व संगरीं करीं सदसी अचळ असावा, असा अन्वय. ९ ह्या ( अंतःपुरप्रवेशरूप ) कार्यांत वायुहि मजबरोबर यावयास भिईल ह्मणजे वारा देखील जेथें शिरूं शकत नाहीं. १० सहाय; सोबती. ११ नलाच्या, त्याचा संबंध आगमनाकडे. १२ अपराध. मी जें पुढें बोलतें त्याची माफी असावी हें तात्पर्य.

सुंदर-वर कोण तुह्मी गुरुच्या वाटो न हें[2] पैराग मना ॥
कीं जें जें अंतःपुर तें तें हि विषय नव्हे पंरागमना ॥ ३८ ॥
आलां कसे अ-वारित, कार्यार्थि प्रगट आयकों दावा ॥
वाटे कर्णीं तुमचा वाङ्मय सौवर्ण काय कोंदावा ॥ ३९ ॥
वोंहीं लागे गुरु-घन-रस-पूरित वीरसेन-भू-पैनळ ॥
सुंदरि मी पोंशि[11]-पितृ-प-पावक-पुरुहूत-दूत भूप नळ ॥ ४० ॥
सु-मुखि प्रार्थिति बहु तुज ऐसें प्रभु लोक-पाळ ते चवघे ॥
अवघे उणेचि रस; तूं दिव्य रसाचीच सर्वदा चव घे ॥ ४१ ॥
सुज्ञें तुवां वरावा आह्मां चवघां जणांत अन्यतम ॥
धन्य[12]-तम-त्व तुला यो[13] न शिवो पळ दयित[14]-विरह-जन्य तम ॥ ४२ ॥
हांसोनि ह्मणे भैमी प्रणति-प्रिय देव गुरु असें ह्मणती ॥
त्यांहीं क्षमा करावी, स्वीकारावी यशोर्थ मत्प्रणती ॥ ४३ ॥
वरिले हेचि चरण म्यां, त्यजितां ज्वलनांत काय होमीन ॥
येंज्जीवन जीवन तो दुर्धी वांचेल काय हो मीन ॥ ४४ ॥
नळ-नृप ह्मणे सु-बुद्धे या दासावरि तिहीं न कोपावें ॥
मदधिक कोटि-गुणें ते आग्रह कांहीं धरूं नको, पावें ॥ ४५ ॥
मृत्यु असो, पर-वंचन करुनि सुधेच्या जिणें नको पानें ॥
त्वत्पाणि-ग्रहणें मी देवांच्या बहु शिणेन कोपानें ॥ ४६ ॥
विदुषी ह्मणे ह्मणा जा कीं म्यां कथिलें परोपरी पण ती ॥
प्रणति प्रभूंसि करिती अनुकंप्या मी स्वयं-वरा ह्मणती ॥ ४७ ॥
सत्संमत स्वयं-वर-विधिनें वरितां तुम्ही न अपराधी ॥

---

१ पित्याच्या. २ तुमचें अंतःपुरांत येणें. ३ मोठा अपराध. ४ योग्य; पात्र. ५ परक्याच्या येण्याला. ६ कोणीं अटकाव न केलेले असे. ७ (कार्यार्थ प्रकट दावा, आयकों)—कोणत्या कामाकरितां आपण आलां हें स्पष्ट सांगा, तें मला ऐकूं द्या. ८ वार्णी-रूप. ९ सोन्याचा; पक्षीं, उत्तम (अकारादि) वर्णांनीं युक्त. १० मोठा आणि पाण्यानें गच्च भरलेला; हें पनळाचें विशेषण. तात्पर्य कीं, गंभीर व अत्यंत रसाल असें भाषण करण्यास नलानें आरंभ केला. ११ वरुण, यम, अग्नि व इंद्र ह्यांचा दूत. १२ अतिशय कृतार्थता. १३ येवो. १४ पतिच्या वियोगापासून उत्पन्न, होणारें दुःख. तात्पर्य तूं मनुष्यास वरिलें तर तुला पतिवियोगाचें दुःख सोसावें लागेल ह्याकरितां आह्मां देवांपैकीं एकास वर. १५ ज्याचें वांचण्याचें साधन. १६ शाहणी. १७ स्वतः पति पाहून त्यास वरणारी.

काय करूं त्यजुनि तुह्मां माझी पळ अनु-सरे न अपराधी ॥ ४८ ॥
होईल देह रंगीं सुर-पति-नर-पति-समक्ष नैल-गामी ॥
हा जन तुमच्याचि असे इतरा कोणाचियाहि न लगामीं ॥ ४९ ॥
होय अ-कृत-कार्यहि नळ सुर-वर-संमत खरें निवेदून ॥
सत्यें जसा तसा न प्राज्यैंहि सुधा-रसें निवे दून ॥ ५० ॥
रंगीं सर्व मिळाले तेव्हां आली तयांत दमयंती ॥
जाणो चकोर ते ती मूर्त-ज्योत्स्नाचि ताप-दमयंती ॥ ५१ ॥
साहे न परोत्कर्षा ज्याची मति सच्छळीं सदानलसा ॥
भैमे तिघां जणांसह हरिहि अधिष्ठुनि त्या सदा नलसा ॥ ५२ ॥
रंगीं पाहों जातां दिसले चौघेहि ते धवासम जे ॥
भैमी देव-कृत-च्छळ ऐसें वित्तांत तेधवां समजे ॥ ५३ ॥
पांचा नळांत जेव्हां काय दिसेनाचि भेद लेव तीस ॥
बुद्धि ह्मणे कां भीसी गुरु-चरणीं त्यजुनि खेद लेवतीस ॥ ५४ ॥
कर जोडूनि ह्मणे ती नळ भर्ता भीम-कन्यकेला हो ॥
प्रभुजी स्वप्नांतहि जरि संकल्प नसेल अन्य केला हो ॥ ५५ ॥
नळ पति इतर पुरुष पितृ-बंधु जरि मनांत मानिले असती ॥
तरि ताराल इला हो प्रभुजी कैसी तरेल जी अ-सती ॥ ५६ ॥
तीचा बलवान् निश्चय सुर-धृत नळ-रूप घे हिराऊनी ॥
बहु तेज प्रकट करी शुचि सत्व-गुण च्छळीं हिरा ऊनीं ॥ ५७ ॥
शुद्ध सवांग कृश नळद परि उप-भोगोचितत्व नळदासी ॥
ऐसें मनांत आणुनि दमयंती सु-मति होय नल-दासी ॥ ५८ ॥

---

१ दुसऱ्याकडे. २ नळाकडे जाणारा. ३ केलें नाहीं कार्य ज्याणें. ४ दुःखित. ५ शमविणारी. ६ साधूंचा छल करण्याविषयीं. ७(सदा + अनलसा)=सर्वदा आलस्यरहित. ८ सभेला. ९ पति जो नळ त्याखारखे. १० लेशमात्र. ११ नम्र होत आहेस. ह्मणजे गुरुचरणीं (श्रेष्ठ इंद्रादिदेव त्यांच्या चरणीं) खेद त्यजुनि (जर) लवतीस ह्मणजे शरण जाण्यास सिद्ध आहेस (तर) तुं कां भीसी-भितेस. १२ देवांनीं घेतलेलें. १३ हिरा उन्हांत जसा(ज्यास्त) तेज प्रकट करितो तसा शुद्ध जो सत्वगुण तो (त्याचा छल केला असतां) ज्यास्त सामर्थ्य प्रकट करितो. १४ (सव + अंग)-यज्ञाचे अंगभूत. १५ बाळ. १६ उपभोगाला योग्य असणें. तात्पर्य कीं जसे देव पवित्र तसा नलहि पवित्र, ते जसे प्रेमार्ह तसा हाहि प्रेमार्ह; पण ते गुरु ह्मणून प्रेमार्ह, व हा पति ह्मणून प्रेमार्ह असें समजून तिनें नलालाच वरिलें.

पति-रूप सोडवुनि ती लोकेशांचा प्रसाद साधूनी ॥
घाली नळासि माळा स्तविली प्रेम-प्रसन्न साधूंनीं ॥ ५९ ॥
नल तीस ह्मणे कुल-जे त्वां[१] जरि देवां-समक्ष मज वरिलें ॥
जों सासु[३] तों तुझा मी होतांहि प्रेम ऊन मजवरिलें ॥ ६० ॥
झाला विवाह गेला स्व-पुरा नळ मग तिशीं सदा रमला ॥
भूमि म्हणे ताराया अव-तरला विष्णु हा स-दार[४] मला ॥ ६१ ॥

---

## वनपर्वांतील जयद्रथ-कृत द्रौपदी-हरण.

( म० भा० अ० २६४—२७२. मोरोपंत अ० ९ ).

धर्मादि पांडव काम्यकवनांत असतां एके दिवशीं मृगया करण्याकरितां सर्व वनांत गेले होते. आश्रमांत द्रौपदी एकटीच होती. त्याच दिवशीं जयद्रथ ह्या नांवाचा राजा विवाह करण्याच्या उद्देशानें नवरी पाहण्याकरितां सैन्यासह चालला असतां त्या आश्रमाजवळ उतरला होता. तेथें द्रौपदी त्याच्या दृष्टीस पडली. तेव्हां तो तिच्या सौंदर्यानें मोहित झाला, आणि तिला आपल्या रथांत घालून घेऊन चालला. पुढें लागलेंच पांडवांनीं त्यास गांठून त्याचा पराभव करून द्रौपदीस परत आणिलें. हें ह्या आख्यानांत वर्णिलें आहे.

राया[५] धृतराष्ट्राचा प्रिय जामाता[६] विवाह-काम[७] वनीं ॥
आला जयद्रथाख्य स्व-बळ-भरें[८] कांपवीत ती अवनी ॥ १ ॥
मृगयार्थ पांडु-नंदन गेले असतां निजाश्रम-द्वारीं-॥
होती उभी द्रुपद-जा, जैसी शंपा[९] नवांबु-भृद्वारीं[१०] ॥ २ ॥
तीतें पाहुनि झाला तो रावणसाचि पात्र अ-न्याया ॥
मित्रासि ह्मणे चित्ता हेचि बहु-मता नकोचि अन्या यों[११] ॥ ३ ॥
जा कोटिका सख्या तूं पूस तिचें वृत्त, होय मत्करें-गा[१२]-॥

---

१ इंद्रादि लोकपालांचा. २ ज्यापक्षीं. ३ (स + असु)-जिवंत. ४ स्त्रीसहित. ५ जनमेजया. ६ धृतराष्ट्राची दुःशला नांवाची मुलगी जयद्रथास ( सिंधुदेशाच्या ) राजास दिली होती. ७ लग्न करण्याची ज्यास इच्छा आहे असा. ८ आपल्या सैन्याच्या भारानें. ९ वीज. १० ( नव—अंबु—भृत्—वारी ) नव्या मेघसमुदायांत. ११ ह्या मला. १२ माझ्या हस्तगत.

ऐसें आर्धीं चतुरा सामें निज-कार्य सिद्धिमत् कर गा ॥ ४ ॥
सांगुनि निज वृत्त तिचें वृत्त पुसे तीस कोटिक वि-हितसें ॥
स्वल्पांत तीहि सांगे बोलों शकती न कोटि-कविहि तसें ॥ ५ ॥

नंतर कोटिकानें सांगितल्यावरून जयद्रथास समजलें कीं, द्रौपदी ही आपली बहीण आहे; तरी तो तिला, तूं मला वर, असें ह्मणून आणखी बोलतो.

राज्य-च्युत-संगें श्रम-पात्र करिसि दिव्य देह कां गे हें ॥
श्रीमद्देह मिळाल्या सेवावीं निर्धनें चि कां गेहें ॥ ६ ॥
त्वां फेडिलेंचि त्यांचें तत्संगें कृश करूनि देह रिण ॥
हो मद्दयिता, देइन मन तुज, गानासि जेविं दे हरिण ॥ ७ ॥
कृष्णा ह्मणे कु-बुद्धे खद्योतीं कीटकाधमीं मलिनीं ॥
द्यु-मणि-प्रति सोडूनि प्रिय-भाव धरील काय रे नलिनी ॥ ८ ॥
स्पर्शींच मृति-प्र-द हीं वीरें-परिग्रह महाहिचा मणि कीं ॥
अंडे-घटीं द्यु-मणि-द्युति योग्या नांदावयास कीं माणिकीं ॥ १० ॥
त्यजितिल भट तुज समयीं त्यजिति हरि जसे नगासि नग-दाहें ॥
भीम-प्रिया प्रिय-सखी लवहि न साहेल लंघनें गदा हें ॥ ११ ॥
धांवोनि बळात्कारें हां हां ह्मणतांहि तो शिवे कपिसा ॥ १२ ॥
पावे व्यसन अ-नाथा जाणों वि-जनांत तापसी ते, तें ॥
खळ दे तिला, जसा तो पाप-मति दशास्य ताप सीतेतें ॥ १३ ॥
कृष्णेनें. भावि-नरक-पाताच्या प्रत्ययासि जड लाहो ॥
ह्मणउनि कृष्ट-निजोत्तर-पट आसुडितांचि दुष्ट पडला हो १४ ॥
धौम्यासि ह्मणे धांवा मजला हें मूर्त-पातक विटाळी ॥
रक्षा मज कीर्तिसही, कीं स्वें-पर-व्यसन-पात कवि टाळी ॥ १५ ॥

---

१ सामोपचारानें. २ घडून येईल असें. ३ पुसण्याला योग्य. ४ राज्यभ्रष्ट ( पांडव ) त्यांच्या संगतीनें. ५ तुझ्या आज्ञेंत राहीन. ६ काजव्याविषयीं हा आपला आवडता पति आहे अशी बुद्धि. ७ ही (मी) वीरपत्नी. ८ मोठ्या विषारी सर्पाचा माणिच केवळ. ९ ब्रह्मांडोदरांत. १० सिंह. ११ वणव्यानें पर्वत पेटला असतां. १२ माझी प्रियसखी. १३ मजशीं दुर्वृत्तपणानें वागणें. १४ माकडासारखा. १५ (जयद्रथानें) ओढलेलें आपल्या अंगावरील वस्त्र ( द्रौपदीनें ) जोरानें ओढतांच. १६ जयद्रथ हेंच मूर्तिमंत पातक. १७ आपलें व दुसऱ्याचें संकटांत पडणें शहाणा टाळतो.

पुनरपि कपिसाचि पिसा क्षिप्र धरायास तीवर उेगारे ॥
तों धांउनि धौम्य ह्मणे न उठ धराया सती-वर उगा रे ॥ १६ ॥
ती नमुनि ह्मणे मुनिला न वदावें व्यर्थ, दुष्ट हा निपट ॥
ओढिल तरि जीवनही पावेल न एक मात्र हानि वट ॥ १७ ॥
भवदाज्ञेनें बैसा हे दुष्ट-रथीं वृकोदर-गदार्सी ॥
न हरि-प्रसाद कैविची आपन्ना खेळ-वृकोदर-ग दासी ॥ १८ ॥
बसतां स्व-रथीं हर्षे तो, जेविं दशास्य जानकी-लाभें ॥
धरि पर-रथासि ती, कीं स्पर्शाया अंत्यजा न कीला भें ॥ १९ ॥
ती बहु त्यासि दटावी कार्पासा काय दापिना कीला ॥
काय बघेल पराला त्यजुनि सती काय-दा पिनाकीला ॥ २० ॥
जरि तूळ-राशि-मध्य-स्व-बिळीं नेईल आखु वातीतें ॥
तरि वाति आखुतें बा सहसा भक्षील आखु वा तीतें ? ॥ २१ ॥
रे तत्काळचि साध्वी-धर्षण-कर जरि महा-तपा मरतो ॥
धौम्य मुनि असें सांगे हित, परि जोडी न हात पामर तो ॥ २२ ॥
कृष्णाहि ह्मणे काय न कापिल गिळितां वृकानना शस्त्री ॥
वधि दश-मुखा मग करिल एक-मुखाचाहि कां न नाश स्त्री ॥ २३ ॥
अप-शकुन-ज्ञ युधिष्ठिर समजोनि अनिष्ट सानुज परतला ॥
जो मृगयेंत न निर्त्ते त्यजुनि दया राम नाम-जप रतला ॥ २४ ॥
तों मार्गीं भृत्याची भार्या धात्रेयिकाचि आदळली ॥
धांवे पडेहि अ-सकृन्नग-शिखराहुनि जशी शिळा ढळली ॥ २५ ॥
वृत्त कथुनि कोपानल दीप्त करायासि पांडु-योध-मनीं ॥
सरला सु-वंश-जा ती झाली धात्रेयिकाचि हो धमनी ॥ २६ ॥
रिपुला गांठाया ते पांडव देती भरों न घटिकेतें ॥
खळ-बळ बहु भी, जाणों न पळहि साधूपुढें अत्र टिके तें ॥ २७ ॥
गांठिति रिपु-कटकातें हरिणाच्या सिंह जेविं कळपातें ॥

१ उठून धरावयास धांवला. २ शुक्राचार्याची. ३ खळ + वृक + उदर + ग (दुष्ट-जयद्रथ रूप) लांडग्याच्या पोटांत गेलेली. ४ अग्नीची ज्वाला. ५ आपलें अर्धांग देणाऱ्या महादेवास. ६ (हें धौम्याचें भाषण) कापसाच्या ढिगामधील आपल्या बिळांत. ७ पतिव्रतेची अब्रू घेणारा जरी मोठा तपस्वी असला तरी तो मरतो. ८ ह्या नांवाची. ९ सरळ, पक्षीं, निष्कपट. १० चांगल्या वेळूची केलेली, पक्षीं, चांगल्या कुळांत झालेली.

रक्षील काय पतिला तें व्यसनीं होय [1]जें विकळ पातें ॥ २८ ॥
स्व-रथावरूनि भूवरि उतरुनि देवीस, जरिहि नाक-द न-॥
वरिलें पलायन खळें, कीं न पहावेचि लोचना कदन ॥ २९ ॥
धर्म स्व-रथीं स्त्रीतें मुनितें घेउनि ह्मणे पुरोध्यातें ॥
[4]व्हा शांत, असेंचि प्रिय राज्य-श्री-मोचनें पुरो ध्या तें ॥ ३० ॥
अर्जुन भीमासि ह्मणे न करावें व्यर्थ भीत-भट-कदन ॥
गेला पळोनि बहुधा दुष्ट जयद्रथ न दाखवी वदन ॥ ३१ ॥
भीम ह्मणे स-पुरोहित राया तूं आश्रमांत जायेतें-॥
निववीं, तेंचि करावें तेणें [5]जें स्वच्छ कर्म जा येतें ॥ ३२ ॥
जा सहदेवा नकुळा तूंही जा या तिघांसि सांभाळा ॥
लावावा गेलें धन येतां हातासि बोल कां भाळा ॥ ३३ ॥
येतों आतांचि नको साधाया शत्रु-वध मला उशिर ॥
कृष्ण असो, जा [7]आर्या, त्वच्चरणा तो न अधम लाउ शिर ॥ ३४ ॥
धर्म ह्मणे रे वा त्या निज [9]भगिनीच्या न उग्र हो तिलकीं ॥
नित्य [10]सुता-सौभाग्य-क्षय-शोकें [11]पितरें साश्रु होतिल कीं ॥ ३५ ॥
कृष्णा ह्मणे अहो जरि मत्प्रिय करणें वधाचि तरि त्यातें ॥
मारावेंचि नय-ज्ञें श्रीतें स्त्रीतें बळेंचि हरित्यातें ॥ ३६ ॥
[12]क्रोश-मितांतर असतां [13]बीभत्सु ह्मणे शरांस कळवा जी-॥
आलों असें [14]अरिस तो दूर न जावा वधा स-कळ वाजी ॥ ३७ ॥
अर्जुन-नामांकित-शर-हत हय पाहून फार तो भ्याला ॥
बहु [15]पाप-जीवितहि त्या प्रिय; जैसें पाप-वित्त लोभ्याला ॥ ३८ ॥
धांवोनि त्यासि सार्जुन भीम महा-बळ पळांत आटोपी ॥

१ जें कटक. २ पडण्यानें. ३ स्वर्ग देणारें. ( पलायनाचें विशेषण ). ४ शांत व्हा, राज्यश्रीमोचनें (आपलें राज्य सोडविल्याच्या योगानें) असेंचि प्रिय (इष्ट) पुरो (मिळो) तें ध्या (असें चिंता.) ५ ज्याला जें कर्म उत्तम येतें तें, त्यानें करावें. ६ अर्जुनमात्र मजबरोबर असूं द्या. ७ हे धर्मा. ८ तो अधम (जयद्रथ) तुला शरण न येवो; तसें झाल्यानें त्याची तुला दया येईल, हा भाव. ९ आपल्या बहिणीच्या ( दुःशलेच्या ) तिलकाविषयीं ह्मणजे कुंकवाविषयीं कठोर होऊं नको, ह्मणजे जयद्रथास मारून तिला वैधव्य देऊं नको. १० कन्येच्या वैधव्याच्या दुःखानें. ११ गांधारी व धृतराष्ट्र. १२ कोसभर अंतर. १३ अर्जुन. १४ जयद्रथास. १५ दुष्टाचारामध्यें घालविलेलें आयुष्य.

ज्याचें चित्त ह्मणे स्व-क्रोधा-और्वा खलाब्धि आटो पी ॥ ३९ ॥
अर्जुन ह्मणे उभा रे सिंह-त्व त्यजुनियां न कुतरा हो ॥
उतरा हो, क्षण पाहों, जा यम-भट हो तळीं न उतरा हो ॥ ४० ॥
रे रे जयद्रथा हें योग्य नव्हे तुज पलायन, परत रे ॥
अभि-मुख मरोनि जरि पळ पळतां न महा-बलायन पर तरे ॥ ४१ ॥
भीम रथावरुनि उडी टाकुनि धांवुनि धरी तया अरितें ॥
वाटे प्रभुचें भीमाकृति खल-बल-दलन-लब्ध-यश अरि तें ॥ ४२ ॥
व्यसनीं न पडेल कसा व्याघ्र-बिळीं जो मदांध ओतु निघे ॥
कीं पद्मराग मानुनि जो पदरीं विंगळांसि ओतुनि घे ॥ ४३ ॥
बुकली भीम, बुकलिती जैसें यज्ञांत बोकडाला हो ॥
कीं तो साध्वी-धर्षण-दोष-फलानुभव रोकडा लाहो ॥ ४४ ॥
वि-कळ जयद्रथ होतां वारी धर्मानुजा गुडाकेश ॥
कीं तैत्सत्सेव्य-गुणा कोर्प न दूषू जसा गुडा केश ॥ ४५ ॥
भीम ह्मणे गुरु-दुःख-द तो स्त्री-जितसाचि हा दया-जित कीं ॥
चालों न देचि कर्मे मी करितों तीं हितादया जितकीं ॥ ४६ ॥
हा धर्म दया-जित तुज योग्य सखा स्त्री-जिता दश-रथा रे ॥
शर सह्य पार जातां हृदयींच जनापवाद-शर थारे ॥ ४७ ॥
वत्सा जैसा तो गुरु होतोसि तसाचि तूंहि कां पावें ॥
या पापातें पाहुनि सत्नयनें न नरकेंहि कांपावें ॥ ४८ ॥
देऊं दे प्राणांत प्रायश्चित्त स्वकीय हा नर कीं ॥
मूर्खहि सुहृत् वसावा स्वर्गीं चिरकाळ कीं महा-नरकीं ॥ ४९ ॥

---

१ हे क्रोधरूप वडवानला, हा खल (जयद्रथ) हाच समुद्र पी, हा आटूं दे. २ उत्तरार्ध-(अर्जुन) उतरा हो (असें यमभटांस ह्मणून जयद्रथास मारावयास तयार झाला, परंतु युद्धांत मरून उत्तम गतीस जाण्याची त्याची इच्छा आहे किंवा नाहीं हें पहावें ह्मणून तो पुन: त्यास ह्मणतो) क्षण पाहों—क्षणभर वाट पाहूं द्या इ०. ३ पर ( शत्रु ) जरि महाबलायन (महाबलिष्ठ) (तरी) पळ पळतां न तरे, अभिमुख मरोनि तरे. ४ भीमाचें स्वरूप घेणारें, दुष्टांच्या सैन्याच्या नाशापासून मिळविली आहे कीर्ति ज्यानें असें प्रभूचें (विष्णूचें) तें अरि (चक्र—सुदर्शन) च वाटे. ५ बोका. ६ अर्जुन. ७ त्याच्या ( धर्माच्या ) सज्जनांनीं सेव्य अशा ( दयारूप ) गुणास. ८ ( तुझा ) राग. ९ तो दशरथ, बायको (कैकेयी) ह्मणेल तसें वागणारा. १० बाण शरिरांतून पार निघून जातो ( ह्मणून ) तो सह्य (होय); (परंतु) लोकनिंदारूप बाण हृदयांत रुतून राहतो (ह्मणून तो असह्य) असा भाव. ११ धर्म.

वध-सम विडंबन असें समर्थींच स्मरण शास्त्र-पाटव दे ॥
अर्धेंदु-शरें त्याच्या माथां काढूनि पांच पाट वदे ॥ ५० ॥
मी पांडव-दास असें स्व-मुखें सर्वत्र बोलशील, तरी ॥
देईन जीवित तुला तारी विपदब्धिमाजि शील-तरी ॥ ५१ ॥
वंदुनि ह्मणे जयद्रथ ऐसेंच ह्मणेन मी सदा साचें ॥
मारूं नका बुक्यांनीं रक्षावें जीवित स्व-दासाचें ॥ ५२ ॥
ज्यापासुनी धरावी [१]प्रे-बळतराचारातिच्याहि भी मानें ॥
बांधुनि केतु-स्तंभीं खळ नेला स्वाश्रमासि भीमानें ॥ ५३ ॥
[२]प्रेषूनि कोटरेतें प्रेम्यानें जेविं त्राण राखविला ॥
तैसाचि निजाज्ञेनें [३]जेणें तो त्या [४]प्रभूसि दाखविला ॥ ५४ ॥
धर्म तशासि विलोकुनि भीमासि ह्मणे अगा महा-बाहो ॥
सोड न विलोकवे मज, द्या या असु, मृत्युला न हा बाहो ॥ ५५ ॥
भीम ह्मणे देवीला सांगा ती जरि ह्मणेल सोडीन ॥
नाहीं तरि मी याचा [५]सत्यंचल-कर्ष-पाणि तोडीन ॥ ५६ ॥
कां सोडितां असो द्या हा निज दासांत दास राबावा ॥
या काम-हता रक्षा पायांचा द्याचि आसरा बावा ॥ ५७ ॥
कृष्णा धर्मासि ह्मणे देवा सोडावयासि सांगा जी ॥
मज देखवे न शिवती निर्दयतेसह अ-कीर्ति आंगा जी ॥ ५८ ॥
धर्म ह्मणे रे साधो जाऊं दे सोड दे मला [६]बा हें-॥
जातें त्यजुनि भलेपण न विटावें सु-यश तें तया बाहें ॥ ५९ ॥
भीम ह्मणे मी पांडव-दास असें तीन वेळ मोठ्यानें ॥
हा खळ ह्मणो, भल्याला विनवावें धरुनि पाय खोट्यानें ॥ ६० ॥
धर्म ह्मणे गा भीमा तुज जरि आह्मी प्रमाण तरि सोडीं ॥
न वदें निष्ठुर कांहीं अ-भय-वितरणें [७]सदीड्य यश जोडीं ॥ ६१ ॥

१ ज्या भीमापुढें पराकाष्ठेचा बळकट शत्रुहि गर्वहीन होतो; हा भाव. २ पुत्रप्रेम्यानें कोटरेला पाठवून जसें बाणासुराचें रक्षण केलें;-बाणासुर व कृष्ण ह्यांचें युद्ध चाललें असतां शेवटीं आपल्या पुत्राचा नाश होतो असें पाहून बाणासुराची आई कोटरा नग्न होऊन रणांगणांत कृष्णापुढें येऊन उभी राहिली, तेव्हां कृष्णानें खालीं मान घातली, नंतर बाणासुर युद्धांतून परतला, अशी कथा आहे. ३ जेणें (धर्मानें) प्रभूसि (धर्मास). ४ (भीमानें) पुढें उभा केला. ५ (सती + अंचल + कर्ष) सतीचा पदर ओढणारा हात. ६ (अशा कर्मानें आपणापासून जाणाऱ्या) सुयशास बाहें (बोलाव) ह्मणजे राख. ७ (सत् + ईड्य) साधूंनीं स्तुत्य.

भीमें गुरु-मंत्र-वश-व्याघ्रें मृगसाचि सोडितां नमनें-॥
धर्मासि करि, वरि लवे मात्र शिरें, दुष्ट अंतरीं न मनें ॥ ६२ ॥
नृप त्यासि ह्मणे ध्याया भुजगीच्या झोंबतां नर मणीतें ॥
वांचेल, परि पराच्या चित्तेंहि स्पर्शतां न रमणीतें ॥ ६३ ॥
जा, यावरि न करावें पाप असें मागतों, मला दे हें ॥
जें कर्म धर्म-शर्म-द त्यासाचि संपादितो भला देहें ॥ ६४ ॥
खल न खलत्व त्यागी जरि सामें गौरवूनि बोळविला ॥
लकुच कटुचि अमृत-कराकरवींही शर्करेंत घोळविला ॥ ६५ ॥
हर-दर्शनार्थ गंगा-द्वारीं तपतां तया कृपा-पर तो ॥
भेटोनि ह्मणे घे वर, कष्टापासोनि मति नृपा परतो ॥ ६६ ॥
युद्धांत पंच-पांडव-परि-भव हो मत्करें असेंच वदे ॥
प्रभु-कर्णीं तें बहु कटु वच जाणो गर मुखीं रसें चव दे ॥ ६७ ॥
शंभु ह्मणे नारायण-सख नर अर्जुन पुराण ऋषि, तातें-॥
धनसें पाशुपतहि म्यां त्यासि दिलें, जेविं अ-मृत तृषितातें ॥ ६८ ॥
मजपासीं तुज द्याया तद्भंगावह असा नसेच वर ॥
हो मशक-मक्षिका-हर गरुडा नाशी असें नसे चवर ॥ ६९ ॥
यश एकदांचि अर्जुन-रहितहि चवघां रणांत भंगुनि घे ॥
मेरु असो, बहु हेंही जरि लंघुनि कुळ-गिरीशि पंगु निघे ॥ ७० ॥
झाला गुप्त महेश्वर तो बालिश मनुज-देव वेदी त्या ॥
प्रभुसहि विटवी मागुनि जें तैशाही न देववे दात्या ॥ ७१ ॥
मागावा कामाद्यरि-परि-भव-वर वर-द-नायका, परि तो ॥
सत्परि-भव-वर मागे, खळ न पराहित निजाहितहि करितो ॥ ७२ ॥
स्व-गृहा जाय जयद्रथ विसरुनियां दुःख तें परि-भवाचें ॥
दासासमंजसत्वें क्षोभे मन शांतही परि भवाचें ॥ ७३ ॥

---

१ पुण्यकारक व सुखकारक. २ दयाशील शिव. ३ हे जयद्रथा. ४ ह्या नांवाचें अस्त्र. ५ (तत् + भंग + आवह) अर्जुनाचा पराजय करण्यासारखा. ६ हें चवराचें विशेषण. ७ कुलपर्वतांस–हे सात आहेत त्यांचीं नांवें–महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्ष (गंधमादन), विंध्य, आणि पारिपुत्र (पारियात्र), एथें ह्याचा अर्थ (मेरूच्या संबंधानें) लहानसा डोंगर असा इष्ट दिसतो. ८ ज्ञानस्वरूप (अशा शिवाला). ९ जयद्रथाच्या मूर्खपणामुळें. १० शंकराचें.

## वनपर्वांतील सावित्रीचें आख्यान.

(म० भा० अ० २९३-२९९. मोरोपंत अ० १३).

**मद्रदेशच्या अश्वपतिराजाची कन्या सावित्री** ( सावित्रीदेवीचा अवतार ) हिनें **शाल्वदेशच्या द्युमत्सेनराजाचा मुलगा सत्यवान्** ह्यास वरिलें. सत्यवान् अल्पायुषी होता. त्याच्या मरणाच्या वेळीं **यम** जातीनें त्याचा प्राण घेऊन चालला असतां सावित्रीनें त्याच्या मागून जाऊन यमास आपल्या भाषणानें संतुष्ट केलें; आणि सासरा आंधळा व राज्यरहित होता त्यास डोळ्यांची व राज्याची प्राप्ति, आपल्या बापास शंभर पुत्रांची प्राप्ति, व आपणाला शंभर पुत्रांची प्राप्ति, असे वर त्यापासून संपादिले; आणि शेवटीं सत्यवानाचा प्राणहि परत आणिला; हें ह्या आख्यानांत सांगितलें आहे.

**धर्म** पुन्हा त्यासि ह्मणे **मार्कंडेया** मुनीश्वरा आर्या ॥
आढळली तुज लोकीं सत्वाढ्या आमुची जशी भार्या ॥ १ ॥
मुनि त्यासि ह्मणे होती **सावित्री** नाम अश्वपति-तनया ॥
तच्चरित श्रवण करीं, ऐकाया योग्य साधु पतित न या ॥ २ ॥
होय प्राप्त विधि-स्त्री-सावित्रीच्या वरेंचि ती रोया ॥
यत्कीर्ति जना ह्मणती कर देत्यें रे अघाब्धि-तीरा या ॥ ३ ॥
आली भक्त-सुता ती श्री-सावित्रीच उद्धरायाला ॥
श्रीभीरधिला जन्मुनि जें दे यश तेंच शुद्ध रायाला ॥ ४ ॥
अश्वपति ह्मणे वत्से चिंता मज हेचि एक परमा गे ॥
झालीस दान-योग्या परि कोणीही तुला न वर मागे ॥ ५ ॥
जा शोधुनि ये वत्से वरुनि मनें मानल्या कुलीनातें ॥
कीं तुजकडेचि आहे शत-पुत्रांचेंहि गे मुली नातें ॥ ६ ॥
'स्व-वर पहा जा' ऐसें योग्य जनीं तोचि तीसचि वदाया ॥

१ रामकथा सांगितल्यानंतर. २ सत्वगुणानें युक्त ह्मणजे कसाहि प्रसंग गुदरला तरी जी आपलें सद्वर्तन सोडित नाहीं अशी. ३ नांवानें प्रसिद्ध. ४ अश्वपतिनामक राजाची मुलगी. ५ ह्या चरित्रास. ६ ब्रह्मदेवाची बायको. ७ हे राजा धर्मा. ८ पातकसमुद्राच्या तीरास. ९ लक्ष्मी. १० देण्यास योग्य. ११ शंभर पुत्रांच्या ठिकाणीं तूं आहेस हें तात्पर्य.

गुरुच्या वचनें गेली आपण घेऊनि ती सेचिव दाया ॥ ७ ॥
अनु-रूप वर विलोकुनि आली तों त्या नृपा परम-हर्षी- ॥
सांगत होता सु-कथा श्री-नारद जो कृपा-पर महर्षी ॥ ८ ॥
ती दोघांतें वंदी तों तीस ब्रह्म-काय-भू पाहे ॥
स-स्मित असें पुसे कीं त्वत्तनया होय काय भूपा हे ॥ ९ ॥
कोठें गेली होती श्वशुर-गृहाहूनि काय आणविली ॥
हा! सचिवांनीं असुनी दानोचितता इची न जाणविली ॥ १० ॥
भू-प ह्मणे परिसावें तेंचि तुवां सर्व साधु-कुल-गीतें ॥
म्यां पाठविलें होतें स्व-वर पहाया स्वयें स्व-मुलगीतें ॥ ११ ॥
वद वत्से, काय कसें ? वर बरवा पाहिला ? न लाजावें ॥
ह्या गुरुनें धन्य असें ह्मणुनि स्व-मुखें तुला मला, जावें ॥ १२ ॥
सांगे ती सावित्री नृप द्युमत्सेन शाल्व-पति आहे ॥
जो वृद्ध अंध रिपु-हृत-राज्य वन-स्थहि न काळजी वाहे ॥ १३ ॥
कुल-शील-सत्त्व-गुण-निधि तो पुत्र-कलत्र-मात्र-परिवार ॥
परि वीर सर्व सम त्या, कीं मथिला स्वांतर-स्थ अरि-वार ॥ १४ ॥
तो श्वशुर मानला मज, चित्तें त्याचा कुमार म्यां वरिला ॥
जो लाजविति सख्यी, अनु-सरली गौरी हरा न त्या हरिला ॥ १५ ॥
नारद ह्मणे नृपा हे चुकली योजूनि सत्यवान् नवरा ॥
न वरावा जरि गुणवान् योजू अन्या, असे उणें न वरा ॥ १६ ॥
भू-प ह्मणे सर्व-ज्ञा देवा उमजे असेंचि सांग मला ॥
गुणवान् युवा कुल-ज-वर जरि तरिहि तुला अ-योग्य कां गमला ॥ १७ ॥
काय उणें न धरावें अ-धन-त्वें भू-प-जन-वरा जीवीं ॥
कां न प्राशावें मधु मधु-पानें कूप-ज-नव-राजीवीं ॥ १८ ॥

---

१ मंत्री आणि उपमाता ह्यांस. २ ब्रह्मानंदांत निमग्न. ३ ब्रह्मदेवाच्या शरिरापासून ह्मणजे मांडीपासून झालेला नारद. ४ खेदसूचक अव्यय. पूर्वार्धाचें 'नाहीं' असें उत्तर राजानें दिल्यावर नारदाचें भाषण या उत्तरार्धानें सांगितलें आहे. ५ सर्व साधूंच्या समुदायानें स्तविलेला. ६ द्युमत्सेननांवाचा. ७ शाल्व-देशाचा राजा. ८ शत्रूंनीं हरण केलें आहे राज्य ज्याचें असा. ९ अरण्यांत राहणारा. १० पुत्र आणि कलत्र ( स्त्री ) एवढाच आहे परिवार ज्याचा. ११ परि (तथापि) त्या (द्युमत्सेनाला) सर्व वार (दिवस) सम. १२ आपल्या अंतःकरणांत राहणारा. १३ कामक्रोधादिक शत्रूंचा समुदाय. १४ राजश्रेष्ठास. १५ विहिरींत उत्पन्न झालेल्या नव्या कमलांत.

मुनि सांगे वर्षांतीं येईल त्या भूप-पुत्रका व्यसु-ता[1] ॥
अन्य वरू, वृतहि कच त्यजुनि वरी भू-प-पुत्र काव्य-सुता[2] ॥ १९ ॥
भू-प ह्मणे न वरावा वत्से जरि सु-गुण-सागर लेवायु[3] ॥
शीतल मंद सु-गंधहि वद सेवावा कसा गरल-वायु ॥ २० ॥
ती सु-मति ह्मणे ताता न त्यजुनि पयोधिला नदी परते ॥
न पतंग-चित्त-वृत्ति क्षणही रत्नीं त्यजूनि दीप रते[4] ॥ २१ ॥
वरिला तो वरिलाचि, स्पर्शावा या न अन्य कायातें ॥
हा दृढ निश्चय माझा, स्तवितील कुलीन कन्यका यातें ॥ २२ ॥
आयुष्य असो किति तरि मज तदितर[5] पुरुष तुज-समचि राया ॥
मन न चळेलचि येइल जरि चरचर हा गळा यम चिराया ॥ २३ ॥
देवर्षि ह्मणे त्यासचि दे साध्वी-व्रत-परा[6] सुता राया ॥
शुचि निश्चयाहुनि अधिक अमृत-रस नसे परासु[7] ताराया ॥ २४ ॥
होतें सद्धर्माच्या कासेला लागतां सदा शिव हो ॥
येतों, बसा, प्रसन्न प्रभु मृत्युं-जय तुह्मां सदा-शिव हो ॥ २५ ॥
गेला मुनि जो भगवत्-कीर्ति-महा-काम-धेनुचा दुहिता[8] ॥
नेउनि दिली नृपें ती सद्विधिनें सत्यवत्-करीं दुहिता ॥ २६ ॥
झाली तपोवनांत स्वीकारुनि वल्क तापसी ते[9], तें-॥
अद्भुत सत्त्व तिचें बा, तितका नव्हताचि ताप सीतेतें ॥ २७ ॥
वेद श्वशुर, श्वश्रु स्मृति, ती स्वाचार-पद्धतीच[10] सती ॥
मुनि ह्मणति या नृपाच्या उटजीं सिद्धि स्नुषा-मिषें[11] वसती ॥ २८ ॥
तो सत्यवान् ह्मणे हे [12]पितृ-राज्य-श्री तपोवनांत पती-॥
हो औपन्मुक्त[13] ह्मणुनि बहुधा आपणहि यां मिषें[14] तपती[15] ॥ २९ ॥
तत्सद्गुणें प्र-मुदितें झाली केवळ मनांत न तिचे तीं ॥

---

१ ( वि + असु + ता ) गतप्राणता (मरण). २ शुक्राचार्याची मुलगी (देवयानी). ३ अल्पायुषी. ४ अन्वय—पतंग चित्तवृत्ति दीप त्यजुनि क्षणही न रते. ५ सत्यवानाहून निराळा. ६ पतिव्रतेच्या आचरणाविषयीं तत्पर. ७ गेले आहेत प्राण ज्याचे असा. ८ भगवंताची कीर्ति हीच कामधेनु तिचें दोहन करणारा (धार काढणारा). ९ ती सावित्री. १० सदाचाराचा क्रम. ११ सुनेच्या रूपानें. १२ बापाची राज्यलक्ष्मी. १३ विपत्तीपासून मोकळा झालेला. १४ या सावित्रीच्या रूपानें. १५ तप करिते.

सकळें से-देव-तापस-वृंदेंहि तपोवनांत नेति वेती[2] ॥ ३० ॥
ती स्व-मनांत ह्मणे तुज तनु रडविल सर्व काळ जीवा हे ॥
सोड इला वेड्या, बुध न कु-संगति धरुनि काळजी वाहे ॥ ३१ ॥
ऐसें चित्तीं बोले, मोजी उर्वरित[3] दिवस महिने ती ॥
नसतें तसें तरि सुखें वय भोगुनि तदधिक[4] श्रमहि नेती ॥ ३२ ॥
उरतां चार दिवस ती करि वांचाया पति व्रतारंभा ॥
तन्नियमीं[5] प्रिय[6]-वाक् ती शुकीं विलोकी न तीव्रता रंभा ॥ ३३ ॥
श्वशुर ह्मणे त्रि-दिन-व्रत झालें कीं? वंश धन्य केला गे ॥
कर पारणा, क्षुधा बहु पूर्व-वया-माजि कन्यके लागे ॥ ३४ ॥
ती संकल्पीं आहे सूर्यास्तीं पारणा करायाची ॥
ऐसें श्वशुर-श्वश्रू-चरणांतें जोडुनी करा यांची[7] ॥ ३५ ॥
फल-मूलार्थ निघे पति त्यासि ह्मणे मजहि सत्तमा न्या हो ॥
वन पाहेन, तुह्मां हे न प्रथम-प्रार्थना अ-मान्या हो ॥ ३६ ॥
चित्राश्व[8] ह्मणे दयिते गमली वन-सरणि[9] काय कोमळ ती ॥
श्रमशिल, [10]शिबिका-स्थाही दुर्ग[11]-वन-पथांत बायको मेळती[12] ॥ ३७ ॥
उप-वास तीं दिसांचा तूं आधींच प्रिये सु[13]-मृदुला गे ॥
न्यावें कसें चरण-युग नवनीता-परिसही सु-मृदु लागे ॥ ३८ ॥
मज सोसेल कशी जी न पहावे स्त्री-व्यथा नरा नीचा[14] ॥
श्रम-दा प्र-मदा-हृदया कथितीहि कवी कथा न रानींच्या ॥ ३९ ॥
येणारचि तरि साध्वी श्वश्रू-श्वशुरांसि पूस मग ये, तें-॥
योग्य तुज मजहि, मानिति गुर्वाज्ञाधिक सु-बुद्धि न गयेतें[15] ॥ ४० ॥
सावित्री त्यांच्याही आज्ञेतें तत्प्रसाद साधुनि घे ॥
उटजांतूनि सतीसह वंदुनि तो स्वें[16]-पितृ-पाद साधु निघे ॥ ४१ ॥

---

१ देवांसहित ऋषींचे समुदाय. २ त्या पतिव्रतेचा नमस्कार मोठ्या आनंदानें स्वीकारीत. ३ बाकी राहिलेले. ४ अन्वय—तदधिक श्रमहि भोगुनि वय नेती. ५ सावित्रीच्या नियमांत. ६ मधुर भाषण करणारी हें रंभेचें विशेषण. उत्तरार्धाचा अन्वय. त-न्नियमीं (जी) तीव्रता (होती) ती प्रियवाक् रंभा शुकीं (हि) न विलोकी. ७ विनंती करी. ८ सत्यवान्. ९ वनांतला मार्ग. १० पालखींत बसलेली. ११ रानांतलि खडतर मार्गांत. १२ दुःख पावते. १३ फार नाजूक. १४ निर्दय अशा. १५ गयाक्षेत्रास. १६ आपल्या बापाचे पाय.

ती न स्त्री रसाया त्यासि निघे आत्त-मूर्ति जनकाशी ॥
परम शिव जींतें नांदे ह्मणुनि जिला ह्मणति सुज्ञ-जन काशी ॥ ४२ ॥
जे पक्षी जे श्वापद-संघ अविछूनि[4] कानना वसती ॥
त्यांचें तद्वचनामृत-पानार्थ[5] पुसेल कां न नांव सती ॥ ४३ ॥
पात्र भरूनि फळांनीं काष्ठें फोडी वनांत, सत्व-रतें[6]-॥
पाहूनि तत्कलत्रें स्मरलें मुनि-वच मनांत स-त्वर तें ॥ ४४ ॥
जों साध्वी हळुच ह्मणे हा नाथा निर्यंत-मान-दा रुचिरा ॥
मूर्ति श्रमत्ये, भ्रमत्ये मति, कीं जी प्रियतमा न दारु चिरा ॥ ४५ ॥
तोंचि ह्मणे तो उठल्या करित्या स्मृति-हानि वेदना, लागे-॥
शूल-शत शिरीं, जाणों सखि अ-क्षम हा निवेदनाला गे ॥ ४६ ॥
तुझिया मृदु-शीतांकीं शिर ठेवुनि वाटतें निजावें गे ॥
त्वत्स्पर्श अ-मृत ह्मणवुनि या मत्तापें पळोनि जावें गे ॥ ४७ ॥
मांडी देउनि पतिचें मस्तक हस्त-कमळें सु-धी रगडी ॥
दे धैर्य सतीस तिचा निज-निश्चय जो खरा सु-धीर गडी ॥ ४८ ॥
सीता दश-कंठा जसि तशि सत्त्वें भी न तीव्र-तापा हे ॥
तों पाश-पाणि-पुरुषा-प्रति पति-पार्श्वी पति-व्रता पाहे ॥ ४९ ॥
क्षितिवरि पति-शिर उतरुनि स-वि-नय झडकरि उठोनि कर जोडी ॥
नमुनि ह्मणे देव तुह्मी, अशि कैंची अन्य-दर्शनीं गोडी ॥ ५० ॥
केलेंचि धन्य दर्शन-दानें येऊनि कानना मातें ॥
अजि देवेश निवावे बहु हे सेवूनि कान नामातें ॥ ५१ ॥
देव ह्मणे सति यम मी; कां आलों? न्यावया तुझ्या पतितें ॥
हें दूत-कार्य कीं जी; जें सेवक-कृत्य वेगळें सति तें ॥ ५२ ॥
हा सत्यवान् सु-कृतवान् गुणवान् न्यावा न सेवकांनीं कीं ॥
ज्या कर्मीं योग्य-त्व स्वामीचें तें न सेवकानीकीं[12] ॥ ५३ ॥

---

१ (जनक + आशी) बापाचा आशीर्वाद. २ ज्या आशीमध्यें. ३ ज्या आशीला. ४ आश्रय करून. ५ त्या सत्यवानाचें वचन हेंच अमृत घ्यावें ह्मणून. ६ धैर्यशील-हें तत्कलत्राचें विशेषण. ७ निश्चयेंकरून मान देणाऱ्या ह्मणजे माझें वचन कधीं न मोडणाऱ्या. ८ स्मरण नाहींसें करणाऱ्या-अशा वेदना. ९ मी. १० मृदु आणि शीतल अशा मांडीवर. ११ पाश आहे हातीं ज्याच्या अशा पुरुषाला. १२ (सेवक + अनीकीं) चाकरांच्या मेळ्यांत.

अंगुष्ठमात्र पुरुषाप्रति यम पाशेंकरूनि आकर्षी ॥
तें हाय हाय ह्मणती बहु सद्गद-कंठ साश्रु नाकर्षी ॥ ५४ ॥
त्यातें बांधुनि नेउनि यम-धर्म प्रभु निघे अवाचीतें ॥
म्याला सतीस बहुधा जें ब्रह्म-लिखित बरें न वाची तें ॥ ५५ ॥
त्यामार्गें तीहि निघे धर्म ह्मणे भागलीस जा परत ॥
स्नेह-ऋण फेडिलें त्वां करुनि स्व-पति-क्रिया रहा स्मरत ॥ ५६ ॥
साध्वी ह्मणे प्रभो पति जिकडे जावीच मूर्ति हे तिकडे ॥
स्व-गुरु-व्रत-प्रसादें मद्गतिसि न रोधितील हेति कडे ॥ ५७ ॥
संत ह्मणति सप्त-पदें सह-वासें सख्य साधुशीं घडतें ॥
सन्मित्राचि न व्यसनीं अन्याखिल-मित्र संकटीं पडतें ॥ ५८ ॥
तुज संत ह्मणति पितृ-पति सम-वर्ती धर्म-राज बापा, हें-॥
सत्य यश ह्मणुनि याही कन्येसि दया करूनि बा पाहें ॥ ५९ ॥
ऐसें सती वदे, तो बोल शशी, देव तोहि सागर-सा- ॥
प्रेमें उचंबळे हो, धरि कारुण्यें द्रवासि सांग रसा ॥ ६० ॥
धर्म ह्मणे साध्वी बहु श्रमलीस स्वाश्रमासि जा मार्गें ॥
जो मागशील तो वर देतों, घे, इष्ट तें मला मार्गें ॥ ६१ ॥
देवा व्हावें चक्षुस्तेजस्संपन्न आश्रमा-माजी ॥
मामाजी ऐसें द्या, मति साहेनाचि त्या श्रमा माजी(ज्ञी) ॥ ६२ ॥
दिधलें धर्म म्हणे परि जाताचि होती तशीच मागूनी ॥
देव म्हणे पुनरपि जा वत्से घे वर दुजाहि मागूनी ॥ ६३ ॥
ती सु-मति ह्मणे राज्य-भ्रंशें बहु खिन्न सासुरा होतो ॥
पावुनि भवत्प्रसादें निज-पद बहु काळ सौसु राहो तो ॥ ६४ ॥
होइल जा धर्म ह्मणे परि करि अनु-गमन स-बहु-मान सती ॥
कीं जी हंसी हंसावांचुनि मानील न बहु मौनस ती ॥ ६५ ॥

---

१ आंगठ्या एवढ्या. २ दक्षिण दिशेस. ३ उत्तरकार्य. ४ माझ्या वडिलांच्या आणि व्रताच्या प्रसादानें. ५ माझ्या गमनाला. ६ शस्त्रें व डोंगराचे कडे. ७ साधु ज्याचा मित्र आहे असें कोणीहि दुःखांत पडत नाहीं; त्यावांचून इतर सर्व जरी कोणाचे मित्र असले, तरी तें संकटांत पडतें. ८ सर्वांशीं समदृष्टीनें वागणारा. ९ पर्वतासहित. १० पृथ्वी; भूत-मात्राला करुणा आली हें चौथ्या चरणाचें तात्पर्य. ११ डोळ्यांच्या (पाहण्याच्या) शक्तीनें युक्त. १२ जिवंत. १३ मानससरोवर.

पुनरपि मार्गी काढी जें धर्म-रहस्य जेविं नेव पुसती ॥
तें होय वशीकरणचि, कीं भासों दे तयाशि न वेपु सती ॥ ६६ ॥
धर्म ह्मणे गे बाई करिसी कां व्यर्थ या श्रमास तिजा-॥
वर घे नकोचि मार्गों, आलीस सु-दूर, आश्रमा सति जा ॥ ६७ ॥
त्यासि ह्मणे सावित्री संपन्न असो पिता सु-तनय-शतें ॥
हा लक्ष्मी-सुत-कवि किति लिहिल सतीचें उमा-सुत न यश तें ॥ ६८ ॥
उडु-पा उडुसे धर्मौदार्या लाजोनि अभ्र मुरडे हो ॥
सावित्रीच्या सु-यशीं न दिसे पति ह्मणुनि अभ्रमु रडे हो ॥ ६९ ॥
ऐसें शिरोनि चित्तीं घेउनि भारीहि तीन वर देवा-॥
सोडीना सोडविल्यावांचुनियां ती सती नवर-देवा ॥ ७० ॥
देव ह्मणे तूं स्वच्छा स्व-च्छायाशीच मागतीं सति घे ॥
वर घेउनि जा चवथा देतों मागोनि मागतीस 'तिघे ॥ ७१ ॥
व्हा सु-प्रसन्न, वत्से तुज हो सुत-शत असें वदा, न्या हो-॥
सु-यशो-राशि स्वर्गी लज्जा-प्र-द सुर-न-गा वदान्या हो ॥ ७२ ॥
भुलला धर्म द्युतिला धृतिला मतिला तिच्या तथा स्तुतिला ॥
न करुनि विचार जावी मार्गे ह्मणवुनि ह्मणे 'तथास्तु' तिला ॥ ७३ ॥
हळुचि ह्मणे सावित्री पावेन वरेंकरूनि संततिला ॥
तुमचा प्रसाद ह्मणुनि प्रेमें गातील सर्व संत तिला ॥ ७४ ॥
तरि मत्पति मज द्या कीं तुमची पावेल मान सत्या गी ॥
यश रक्षाया प्राणहि सत्य-गुणासक्त-मानस त्यागी ॥ ७५ ॥
रोमांचित धर्म ह्मणे बाई गातिल तुझा प्र-भाव सती ॥
पतिशीं अ-विना-भावें वसशिल रविशीं जशी प्रभा वसती ॥ ७६ ॥

१ नवीन काढलेली पुस्ती. २ 'तयाशि सती वपु न भासों दे' ह्मणजे त्याचें देहभान नाहींसें करी. ३ उत्तम शंभर पुत्रांनीं. ४ लक्ष्मी हें मोरोपंताच्या आईचें नांव. ५ गणपति. ६ यमाच्या औदार्यास; उत्तरार्ध-सावित्रीच्या अतिशुभ्र यशानें विश्व इतकें भरून गेलें होतें कीं, अभ्रमूचा पति ऐरावत हा अत्यंत शुभ्र असल्यामुळें त्या यशांत बुडून कोठें दिसेनासा झाला, तेव्हां ती रडूं लागली. तात्पर्य, सावित्रीचें यश अगदीं निर्मळ असून साऱ्या त्रैलोक्यांत भरलें होतें. यशाचा वर्ण शुभ्र आहे असें कवि मानितात. ७ देव ह्मणे तूं स्वच्छा (व) स्वच्छायाशीच (माझ्या सावलीप्रमाणेंच) मागतीं (मागें) (येत आहेस) (ह्मणून) (हे) सति, तिघे (तीन) वर मागोनि (हि) चौथा मागतीस (तर) देतों घे, ह्मणजे घेऊन जा. ८ अन्वय—तिघे मागोनि मागतीस चवथा देतों इत्यादि. ९ सत्याविषयीं तत्पर आहे मन ज्याचें तो. १० सोडितो. ११ वियोग न होतां. १२ राहते.

राज्य चतुः-शत वत्सर करिल तुझा कांत सोडिला जा गे ॥
हा त्वन्महिमा जागो सीतेनें जेविं जोडिला जागे ॥ ७७ ॥
तें [१]वृत्त [२]वर्तमान स्वल्पहि न कळे तिच्या वरा पाशीं ॥
जातां यम सावित्री धांवत आली कलेवरापाशीं ॥ ७८ ॥
पुनरपि तशीच बसली अंकीं घेऊनियां स्व-पति-शिर ती ॥
जशि चेतना धवांगीं होय इची [३]जीवितांत मति शिरेती ॥ ७९ ॥
वन-देवता ह्मणति त्या बा गा [४]मूर्च्छोत्थिता चकोरा हो-॥
स्वस्थ, ज्योत्स्ना कीं हे, द्रुत उठचि, नमावया नको राहों ॥ ८० ॥
नेत्रें उघडुनि पाहे तो दयितेच्या मुखासचि वनीं, ती-॥
दे त्यासि जसि नृपासि व्यसनीं देती सुखा [५]सचिव-नीती ॥ ८१ ॥
स्त्रीस ह्मणे [६]सु-भगे त्वां मृदु मांडी मांडिली उशी, रमला-॥
आत्मा निद्रेशीं, रवि मावळला लागला उशीर मला ॥ ८२ ॥
पुरुष श्याम [७]महौजा ओढित होता बळेंचि मजला जो-॥
तो कोण, पुसेन तया नसतां [८]स्वप्नोत्तमर्णे मज लाजो ॥ ८३ ॥
कथिन उद्यां, झाली बहु रात्रि, बळ असेल तरि उठा राया-॥
देत्यें हात, चला जी, घेत्यें फळ-भाजना कुठारा या ॥ ८४ ॥
नेत्रें पुसोनि पदरें पतिस ह्मणे भेटतील मामाजी ॥
'आई' ह्मणतां रडतां पडतां दाटून कां श्रमामाजी ॥ ८५ ॥
भेटवित्यें ताताला मातेला, या उठा, असें वदली ॥
आली घेउनि, अद्भुत वाटे कलभाशि सांवरी कदली ॥ ८६ ॥
आला प्रकाश नेत्रीं, अंध-त्वाचा वरें नुरे गंध ॥
परि भू-प [९]पुत्र-मोहें केला पहिल्यापरीसही अंध ॥ ८७ ॥
त्याला ह्मणती गौतम दाल्भ्य भरद्वाज धौम्य तापस हा- ॥
बा गा उगा [१०]मुहूर्तोपस्थित दुर्दैव-दत्त ताप [११]सहा ॥ ८८ ॥
सावित्री शुभ-लक्षण गुण-संपन्ना महा-सती बा हे ॥

१ झालें काय व होत आहे काय. २ पाशांत असतां. ३ तिच्या जिवांत जीव आला. ४ मूर्च्छा जाऊन सावध झालेला अशा. ५ मंत्र्यांनीं सांगितलेली चांगली मसलत. ६ हे सुंदरि प्रिये. ७ मोठा तेजस्वी. ८ (स्वप्न + उत्तमर्ण) स्वप्नांतलाहि सावकार. ९ पुत्रशोकानें. १० क्षणभर प्राप्त झालेलें; दुर्दैवानें दिलेलें दुःख. ११ सहन कर.

जी जी साध्वी स्व-धवानुमतें द्वारस्था मेहास ती बोहे ॥ ८९ ॥
वाखाणिति बहु पाहति मुनि-दाराहि भासुर-व्रत तिला जे ॥
साध्वीच्च देवता ही साध्वीला वा सुर-व्रतति लाजे ॥ ९० ॥
शोकें रडतां डोळे जावे, गेले कधीं न यावे गा ॥
दिसतें कल्याण पुढें, होऊंचि नको अधीन या वेगा ॥ ९१ ॥
ऐसें समजाविति त्या राजाला जों दया-पर महर्षी ॥
तों झालें अवलोकुनि सावित्री-सह तया परम हर्षी ॥ ९२ ॥
मुनि ह्मणती हा आला नेत्रें उघडुनि पहा स-दारा या ॥
मोठा भाग्याचा तूं प्र-मुदित यांसह रहा सदा राया ॥ ९३ ॥
दे आलिंगन, अंकीं घे, मस्तक-पद्म हुंग, वाराया-॥
आत्मात्म-ज-तापातें दे आशी राज-सत्तमा राया ॥ ९४ ॥
पुसतां विलंब-कारण चित्राश्व ह्मणे शिरो-व्यथा-शयन ॥
मुनि ह्मणति हें नव्हे, वद वत्से, हो तूंचि आमुचें नयन ॥ ९५ ॥
सावित्रीनें कथिलें तें वृत्त अ-शेष साधु-सद नमुनी ॥
तेव्हां झाले अ-तुल प्रीति-क्रीडेशि केलि-सदन मुनी ॥ ९६ ॥
मार्कंडेय ह्मणे बहु वर्णावें काय जेविं शिव-सेवा ॥
मज काळापासुनि तशि मुक्त करी त्योंशि[11] ती[12] मेनु-ज-देवा[13] ॥ ९७ ॥
दुसरे दिवशीं प्रकृति[14] प्रार्थिति येऊनि आपुल्या पतितें ॥
या राज्य करा, सचिवें वधिला हरिली स्व-भूमि ज्या पतितें ॥ ९८ ॥
मुनि ह्मणति अनुभवावें स्वस्थ-मनें राज्य-पद नता राया ॥
न तपोवन वर तुज बहु सावित्री-युक्त सदन ताराया ॥ ९९ ॥
सिंहासनीं बसविला सावित्रीच्या व्रतेंचि, हा नियेम[15] ॥
वर-सामर्थ्यें ह्मणा परि गेला होता करूनि हानि यम ॥ १०० ॥
सावित्रीनें केला उभय-कुलोद्धार हा असा रोजा[16] ॥

---

१ साध्वी आपल्या नवऱ्याच्या अनुमतानें ( वागते ). २ दारांत उभा राहिलेल्या (किंवा जवळ असलेल्या) उत्सवास बोलाविते. उत्तरार्द्ध-आनंद हा पतिव्रतेच्या नेहमीं दारीं उभा असतो, ह्मणजे तिला अति सुलभ असतो, हें तात्पर्य. ३ ऋषिपत्नी. ४ उत्कृष्ट आचारयुक्त. ५ कल्पवल्ली. ६ आपणाला व आपल्या मुलाला झालेलें जें (वियोग) दुःख त्यातें. ७ सत्यवान्. ८ मस्तकव्यथेमुळें निजणें. ९ साधूंचा समुदाय. १० क्रीडेचें स्थान. ११ सत्यवानाला. १२ सावित्री. १३ हे धर्मराजा. १४ प्रजा. १५ हेंच खरें समजावें. १६ हे धर्मराजा.

कृष्णाहि अशीच, स्तुति येती न मुखाशि या अ-सारा जा(ज्या) ॥ १०१ ॥
राम-घन–मयूर ह्मणे निववालचि सु-रसिकांशि केकाहो ॥
शंभुहि ह्मणे न सेविति मंद ह्मणुनि झुरसि काशिके कां हो ॥ १०२ ॥

## विराट-पर्वांतील उत्तर-गोग्रहण.

(म० भा० अ० ३९-५३; मोरोपंत अ० ३-६ ).

**पांडव** अज्ञातवास करण्याकरितां **विराटाच्या** नगरींत राहिले होते. तेव्हां विराटाचा सेनापति **कीचक** ह्यानें द्रौपदीविषयीं दुर्वासना दर्शविल्यामुळें भीमानें त्यास ठार मारिलें. हें ऐकून विराटापासून फार त्रास पावलेला त्रिगर्तदेशाचा राजा **सुशर्मा** ह्यानें **दुर्योधनास** सुचविलें कीं, ही संधि विराटनगरावर स्वारी करण्यास बरी आहे. तो विचार दुर्योधनास पटून त्यानें त्या नगराच्या दक्षिणेच्या बाजूस सैन्यासह सुशर्म्यास पाठविलें आणि आपण स्वतः मोठें सैन्य घेऊन त्याच्या उत्तरेच्या बाजूस आला. ह्या प्रकरणांत उत्तरेकडील सैन्यानें विराटाच्या गाई हरण केल्या, हा प्रकार वर्णिला आहे, ह्यासाठीं ह्यास **उत्तरगोग्रहण** ह्मणतात.

मत्स्य-पुरोत्तर-भागीं प्रातःकाळींच ये सु-योधन हो ॥
ज्यासि जय-प्राप्ति मनीं ह्मणती भीष्मादिही सु-योध न हो ॥ १ ॥
सहसा व्रजांत गांठुनि बहु ताडुनि करुनि बद्ध-भुज गवळी ॥
षष्टि-सहस्र सु-गोधन तो कुरु-कुळ-चंदन-द्रु-भुज-ग वळी ॥ २ ॥
गोपाध्यक्ष रथावरि बैसुनि धांवे नृपासि सांगाया ॥
चित्तीं ह्मणे बुडाया कुरवधमा हरिसि धेनु कां गा या ॥ ३ ॥
तो राज-गृहीं जाउनि रायाच्या उत्तराख्य तनयातें- ॥

१ द्रौपदी. २ निरर्थक. ३ राम हाच मेघ त्याला मोरासारिखा मोरोपंत कवि. ४ मयूरवाणी हो. ५ अन्वय–शंभु हि ( काशिकेला ) ह्मणे ( हे ) काशिके मंद (अज्ञान) (तुज) न सेविति, ह्मणूनि कां हो झुरसि–अज्ञान जन तुजमध्यें येऊन वास करित नाहींत, ह्मणून तुला खिन्न होण्याचें काय कारण आहे? असें साक्षात् शंभुहि काशीला ह्मणतो. तस्मात् हे केकाहो अज्ञानजनांनीं तुमचा अनादर केला तरी तुह्मीं खेद करूं नये. जे रसज्ञ आहेत त्यांना तुह्मांपासून आनंद खचीत होईल. ६ हे वाराणसि. ७ मत्स्यदेशाच्या राजधानीच्या उत्तरेच्या बाजूस. ८ ज्यासि (दुर्योधनास) जयप्राप्ति (अर्जुनाची गांठ किंवा जय मिळणें) न हो ( असें ) भीष्मादिही सुयोध मनीं ह्मणती, असा अन्वय. ९ कौरवांचें कुळ हाच चंदनवृक्ष ह्याजवरचा सर्पच (दुर्योधन). १० कुरुकुलांतील नीचा.

नमुनि ह्मणे हो नेतो दुर्योधन धेनु करुनि अ-नयातें ॥ ४ ॥
कवची खड्गी धन्वी व्हा, चित्तीं रामचंद्रहि असा ध्या ॥
ऐसा रथीं, जय-श्री गो-विप्रावन-परासि न अ-साध्या ॥ ५ ॥
उत्तर ह्मणे असें जरी मी एकाकी व्हानपरि सवतें-॥
यश जोडितोंचि असता सारथि तरि कथन मज न परिसवतें ॥ ६ ॥
कर्णादिकांसि देतों समरीं वैराटि-केसरी करि-ता ॥
जिष्णुपुढें अ-सुर-जनीं कोणी वैरा टिके सरी करिता ॥ ७ ॥
मिळता कोणी तरि हो धैर्याचा मात्र उदधि सारथि जो ॥
कुरु-भट-समूह पाहुनि मज जेविं हिमासि सु-दधि-सार थिजो ॥ ८ ॥
ऐसें बहुतचि बोले तो बालिश बोल बायकांमाजी ॥
चित्र-पट-कटकसें शिशु-भाषण येईल काय कामा जी ॥ ९ ॥
तें परिसुनि एकांतीं पार्थ ह्मणे देवि कृष्ण-सखि जावें ॥
उत्तर-सारथि होउनि भ्यां, त्वां मजवरि कदापि न खिजावें ॥ १० ॥
कृष्णा ह्मणे बहु बरें, व्हा मारुत, हो पलाल खळ-बळ तें ॥
मद्धृदय न अरि-सैन्यें तुमच्या दैन्येंचि फार खळबळतें ॥ ११ ॥
त्या उत्तरासि सांगे सारथ्य बृहन्नडा करिल यातें ॥
सूत करुनि विजयानें नेले बहु खांडवीं अरि लयातें ॥ १२ ॥
सारथ्य-गीत-नृत्य-प्राप्तीचा हेतु जिष्णु-सह-वास ॥
पूर्णत्वाचा लागे पशु-पां भ्रमतांहि विष्णुसह वास ॥ १३ ॥
भगिनी-मुखेंचि विनवा तन्मातेला उत्तराचि वळवील ॥
अति-सहवासि-वच मना केतक केलुषिता वेना निवळवील ॥ १४ ॥
उत्तर ह्मणे कुरु-कटक न पशूंस यशासहि स्वसे नेतें ॥
अवकाश पळहि नाहीं कळवाया वृत्त हें स्व-सेनेतें ॥ १५ ॥
माझें सारथ्य करू तुझिया वचनें बृहन्नडा, गमला- ॥
हाचि सदुपाय वत्से, लागो अप-कीर्तिचा न डाग मला ॥ १६ ॥
ती धांवत जाय ह्मणे गानादिक हें बृहन्नडे राहो ॥

---

१ कवची, खड्गी व धन्वी असा. २ गाई आणि ब्राह्मण ह्यांच्या रक्षणाविषयीं जो तत्पर त्यास. ३ देणारा झाला असता. ४ विराटपुत्र हाच सिंह. ५ हत्तीपणा. ६ इंद्रापुढें. ७ तूप. ८ चित्रपटावरील सैन्याप्रमाणें. ९ केरकसपट. १० कृष्णाच्या सहवासानें गोपाळांस (अज्ञान गुराख्यांस) परमेश्वर जो कृष्ण त्याचे सर्व गुण प्राप्त झाले. ११ निवळीचें बीं. १२ गढूळ पाण्यास.

समर्यां सारथ्य-गुणा नुघडूनि कदर्युचा ने डेरा हो ॥ १७ ॥
उठल्या उत्साहाच्या त्या शांत श्रीमदुदधिवरि लहरी ॥
धरितां हनु ननु ह्मणतां प्रणताचें कां न सु[2]-दधि वरिल हरी ॥ १८ ॥
वाद्य असो नृत्य असो हो अभि-नय किमपि[3] गीत अथवा हो ॥
जाणोनि कसें ह्मणतां समरांत बृहन्नडाचि रथ वाहो ॥ १९ ॥
वैराटि ह्मणे नर्तक हो कीं वादक तथैव गायन हो ॥
सारथि हो या समर्यां एकहि वश कौरवांसि गाय न हो ॥ २० ॥
ऐसें वदे कवच दे त्या श्रित[4]-कुशलावहास ल्यायाला ॥
तद्धारणीं चुके तो, कन्या पाहूनि हांसल्या याला ॥ २१ ॥
स-त्वर बृहन्नडा नृप-सुत-रथ घेऊनि जाय बाहेर ॥
त्यासि ह्मणे हेरावें ह्मणसी कुरु[5]-कटक काय बा हेर ॥ २२ ॥
कुरु कटकासि पहातां तो उत्तर बाळ फार गडबडला ॥
स्व[6]-पर-बळाबळ नेणुनि बालिश बहु बायकांत बडबडला ॥ २३ ॥
बोले बृहन्नडे हें कुरु-बळ कल्पांत[7]-सिंधुसें गमतें ॥
ने रथ पुरांत, माझें मन नयनाहि पाहतां बहु भ्रमतें ॥ २४ ॥
दुर्योधन दुःशासन कर्ण कृप द्रोण भीष्म ज्या कटकीं ॥
त्यांत मरेनाचि शिरतां कांट्यावरि घालितां चिरे पट कीं ॥ २५ ॥
पार्थ ह्मणे राज-सुता आतां वदतोसि हें अहा काय ॥
शय्येवरि न पडाया योग्य रण-क्षितिवरीच हा काय ॥ २६ ॥
तेव्हां स्त्रियांत तैसें बोलुनि आतां असें कसें वदसी ॥
एकहि बाण न सुटला नाहीं अद्यापि झळकला सदसी[9] ॥ २७ ॥
निज[10]-वृत्ति-रसीं लोभी हो, साधो बुद्धि अन्यथा न करीं ॥
निज-हित-लोभें धरितो शिशुहि मुखीं एक, अन्य थान करीं ॥ २८ ॥

१ कृपणानें डेऱ्यांत पुरून ठेविलेलें द्रव्य कधींच कोणाच्या उपयोगीं न पडल्यामुळें व्यर्थ होय. तसा तुझा सारथ्यगुण समर्यां प्रकट न होईल तर व्यर्थ होय. असें तात्पर्य. २ प्रेमळ भक्तानें आर्जवानें दिलेलें सुदधि ( उत्तम दहीं ) हरी नु (नको) न ह्मणतां कां न स्वीकारील? तसें युद्धप्रिय अर्जुनास दुर्योधनाबरोबर युद्ध करण्याची प्रार्थना कशी न रुचेल? ३ (किं + अपि) = कोणतेंहि; हें गीताचें विशेषण. ४ ( श्रित + कुशल + आवहास ) आश्रिताचें कल्याण करणाऱ्या (अर्जुनाला). ५ बा, कुरुकटक हेरावें ह्मणसी काय? हेर (पहा) असा अन्वय. ६ आपलें तसेंच शत्रूचें बळ व अबळ. ७ प्रलयकालच्या समुद्रासारखें. ८ बक. ९ ( सत् + असी ) चांगली तरवार. १० क्षत्रियाच्या कर्माची ( युद्धाची ) आवड भर.

मरतीच न दाखविती पाउलहि पळोनि तोंड लेंक[1] विल्या ॥
ह्मणती सद्यः-कीर्ति-प्रज्ञा-घ्न-स्पर्श[2] तोंडलें कवि त्या ॥ २९ ॥
ऐसें पार्थ वदे तों भिउनि-कटक-वागुलासि पोर पळे ॥
शत्रु-प्र-ताप-दाव-ज्वालांनीं तो कुरंग होय पळे ॥ ३० ॥
उत्तर ह्मणे नको गे पायां पडतों बृहन्नडे सोड ॥
जोडे दिली,[3] दुखवुं नको केवळ पितृ-कर-तळ-स्थ[4] हा फोड[5] ॥ ३१ ॥
कुरवाळोनि ह्मणे गा राज-सुता योग्य तूं न कांपाला ॥
मृदुल-त्व म्लान-त्व स्वीकारुनि जाहलासि कां पाला ॥ ३२ ॥
तुज उत्साह नसे तरि करितों घेउनि धनूस मी रण हो ॥
मज मेघासि कराया शर-वृष्टि[6] सहाय तूं समीरण हो ॥ ३३ ॥
आतां सोडवितों पशु खल-बल पल न लगतांचि पळवीतों ॥
मी विजय असें तुजचि न सकळांही कौरवांसि कळवीतों ॥ ३४ ॥
धृत-रश्मि कुमार ह्मणे दारुक कीं आज मानली लाजो ॥
दंड करावा या कुरु-सेनेला योग्य मातलीला जो ॥ ३५ ॥
काढूनि शंख-वलयें[7] त्याला पुं-भूषणें सितें वस्त्रें ॥
बांधूनि केश माथां प्राङ्मुख[8] होऊनि आठवी अस्त्रें ॥ ३६ ॥
जातां कुरु-कटकावरि वाजविला दिव्य देवदत्त दर ॥
तो होय जना जैसा कल्पांतीं रुद्र-देव[9] दत्त-दर[10] ॥ ३७ ॥
भ्याला उत्तर त्यातें जिष्णु ह्मणे पावलासि कांप दरें ॥
अद्यापि बांधिलेंसे तुझिया मतिनें अ-धैर्य कां पदरें ॥ ३८ ॥
हांसोनि ह्मणे हरि-सख हो गोढासन[11] [12]वि-कंप-धी धीट ॥

१ बापाला. २ कीर्तिरूप प्रज्ञा ( बुद्धि ) हिचा तादडतोब नाश करणारा आहे स्पर्श ज्याचा; हें तोंडल्याचें विशेषण. ३ तुला हवी ती देणगी देतों. ह्यास आधार—महाभारत विराटपर्व अ० ३८

श्लो० ४३, ४४—शातकुंभस्य शुद्धस्य शतं निष्कान्ददामि ते ॥
मणीनष्टौ च वैदूर्यान्हेमबद्धान्महाप्रभान् ॥ १ ॥
हेमदंडप्रतिच्छन्नं रथं युक्तं च सुव्रतैः ॥
मत्तांश्च दश मातंगान्मुंच मां त्वं बृहन्नले ॥ २ ॥

४ बापाच्या करतळावर असणारा. ५ हा मी ( करतळावरील फोडाप्रमाणें बाप मला जपतो ) हें तात्पर्य. ६ बाणांची वृष्टि पक्षीं, जलवृष्टि. ७ शंखाचीं केलेलीं वलयें ( चुडे ). ८ पूर्वाभिमुख. ९ महादेव. १० दिलें आहे भय ज्यानें असा. ११ दृढ आहे आसन ज्याचें असा (हो)—बळकट बैस. १२ निर्भय आहे बुद्धी ज्याची असा.

न धरीं बा दे[1] हा देर, सादर दे वाजवूं पुन्हा नीट ॥ ३९ ॥
द्रोण ह्मणे न दिसे जय कां करितां आननें नत पहा रे ॥
आला विजय [4]जयाचें श्री-शंभु-तपापुढें न तप हारे ॥ ४० ॥
गांवार ह्मणे गुरुजी पण [5]न करुनि पूर्ण हा प्रकटला हो ॥
पुनरपि वन-वास करूं गुरु-घातक-पातक प्रकट लाहो ॥ ४१ ॥
कर्णाद्यासांसि ह्मणे तुमचे वि-जयी असोत हात रणीं ॥
[7]शर-पटलाच्छादित हो अर्जुन-शस्त्र-प्रताप हा तरणी ॥ ४२ ॥
[8]गुरुजींस काय पुसतां चापीं गुण सद्धचेंचि चढवा हो ॥
यांला हेंचि ह्मणावें कीं आह्मां धर्म-शास्त्र पढवा हो ॥ ४३ ॥
पढवावें मात्र इहीं भेदावें पर-हृदब्ज कटुक वचें ॥
कीं दूरूनि दिसावें प्रेक्षक-दृष्टीस युद्ध-पटु कवचें ॥ ४४ ॥
प्रार्थुनि पुढें करावे हे यज्ञीं कीं सु-भोजनावसरीं ॥
सिंधूंत तरेल कशी जी केली [10]केलि-हेतु नाव सरीं ॥ ४५ ॥
खळ-कृत गुरु-निंदेतें वर्णील कधीं न विस्तरें सु-कवी ॥
कीं तें श्री[12]-गुरु-भक्ति-प्रेमामर-पादपांकुरा सुकवी ॥ ४६ ॥
त्यासि कृप ह्मणे कर्णा सु-ज्ञांहीं ऐकतांचि डोलावें ॥
ऐसेंचि बोलणें जरि तरि पुरुपानें दहांत बोलावें ॥ ४७ ॥
तूं नीति-विरुद्ध वदसि साहस हें फळ न दे वचन-यज्ञ ॥
अद्भुत कर्म करूनिहि वा न वदति एकही वच नय-ज्ञ ॥ ४८ ॥
घालूं पाहसि दंष्ट्रा उपडाया अहि-मुखांत आंगोळी ॥
ऐसें साहस करितां होइल तनुची क्षणांत रांगोळी ॥ ४९ ॥

१ भय. २ शस्त्र. ३ मनापासून. ४ जयाचें तप श्रीशंभुतपापुढें न हारे असा अन्वय, ह्या कथा अशी आहे कीं पाशुपतास्त्र मिळावें ह्मणून अर्जुन हिमालयावर शिवप्रसादार्थ उग्र तप करित असतां त्याच्या बलाची परीक्षा पाहण्याकरितां शिवानें भिल्लाचें रूप घेतलें आणि एक रानडुकर उत्पन्न केला. तो रानडुकर अर्जुन तप करित होता तेथून कांहीं अंतरावरून जातांना त्यावर दोघांनीं एकदम बाण सोडून त्याचा प्राण घेतला, तेव्हां तो मीं मारिला, मीं मारिला असें ह्मणून दोघेहि त्याविषयीं भांडूं लागले आणि हातघाईवर आले. त्या प्रसंगीं अर्जुनानें महान् पराक्रम करून शिवाला जेर केलें; तेणेंकरून शिव प्रसन्न होऊन त्यानें अर्जुनास पाशुपतास्त्र दिलें; ह्या कथेस लक्षून हें लिहिलें आहे. ५ दुर्योधन. ६ गुरुहत्या करणाराचें पातक. ७ बाणांच्या समुदायानें पक्षीं, मेघांनीं झांकलेला. ८ (४३, ४४, व ४५) ह्या आर्यांतील बोलणें कर्णाचें आहे. ९ दुसऱ्याचें हृदयकमळ. १० क्रीडा हाच आहे उद्देश जीचा अशी. ११ गुरुनिंदा. १२ श्रीगुरुभक्तीचें प्रेम हाच कल्पवृक्षाचा अंकुर, त्यास. १३ शुष्क—तोंडचा यज्ञ.

कंठीं बांधूनि शिळा बाहु-बळें सागराशि तरशील ॥
परि साहसें न विजया, हें शील नसो असो इतर शील ॥ ५० ॥
सर्वहि मिळोनि भांडूं कर्णा व्हावें न साहसा मान्य ॥
यत्नें नृप-यश रक्षूं आजि नव्हे श्वेत-वाह सामान्य ॥ ५१ ॥
द्रौणि ह्मणे एकाकी तूंचि क्षम जिष्णु-वारणा सूत ॥
बहुधा बद्ध करीलचि लूतेचें जिष्णु-वारणा सूत ॥ ५२ ॥
करिसि वि-कत्थन जिंकुनि नेलें नसतांहि गो-धन शिवेतें ॥
सत्प्रिय शुचि यश कर्णा भलत्या न करूनि शोध न शिवे तें ॥ ५३ ॥
पावोनि सर्व महितें वि-गुणाहि गुरूसि जे कुल-ज नर ते- ॥
सत्कारिति, अलि कमलीं तेविं गुरु-पदीं महा-कुल-जन रते ॥ ५४ ॥
राधेया उद्धत तूं हा दुर्योधनहि फार उद्धत रे ॥
गुरु-निंदक हो स्पष्ट व्यसनांत बुडे अ-शुद्ध, शुद्ध तरे ॥ ५५ ॥
सिंहांसीं द्वेष करुनि कोण बळी वारणांत उरणारे ॥
कां भ्रमलासि कसा त्वां जय पावावा रणांत उरणा रे ॥ ५६ ॥
दुर्योधन नमुनि ह्मणे गुरुजी मज अरि-करीं न सोपावें ॥
तेजो-जननार्थ असें वदलों, त्वन्मत्सरीं नसो, पावें ॥ ५७ ॥
हांसोनि द्रोण ह्मणे आह्मां कोपों न देचि वत्सल-ता ॥
नसतें क्षमा-कवच तरि हृदयीं त्वच्छब्द अशनिवत् सलता ॥ ५८ ॥
भीष्मासि मग ह्मणे नृप पुसतों अ-ज्ञात-वास-पण पुरला- ॥
कीं कांहीं मास तरी पक्ष तरी दिन तरी असे उरला ॥ ५९ ॥
भीष्म ह्मणे गांधारे पांडव पंडित खरे न दंभ्र-मती ॥
न भ्रमले जे प्राकृत तेचि मनीं धरुनियां मद भ्रमती ॥ ६० ॥
कामी कोपी लोभी जे संसारांत पावती भ्रम ते ॥
प्राकृत पंडित पांडव असते तरि हेहि केविं न भ्रमते ॥ ६१ ॥
शास्त्र-मतें मास-द्वय पांचां वर्षांत अधिक लेखावें ॥

१ हा साहसाचा स्वभाव. २ अर्जुनाचा पराभव करण्यास. ३ सारथी—कर्ण; हा सारथ्याच्या राधानांवाच्या बायकोस लहानपणीं सांपडला व तिनें त्यास वाढविलें ह्मणून त्याचीं सूत, सूतपुत्र, राधेय अशीं नांवें आहेत. ४ इंद्राच्या हत्तीला म्हणजे ऐरावताला. ५ मोठ्या कुळांत झालेला जन. ६ राधापुत्रा कर्णा. ७ हे मेंढ्या. ८ ईर्ष्या उत्पन्न व्हावी ह्मणून. ९ वज्राप्रमाणें चिलखत. १० दुर्योधना. ११ अल्पबुद्धीचे. १२ शास्त्रमानानें.

अ-ज्ञात-वास यास्तव सरलाचि असेंचि तत्त्व देखावें ॥ ६२ ॥
तेरा वर्षांत अधिक दश पक्ष द्वादश क्षपा पडती ॥
चांद्र-शरन्मानें हे संख्या संख्यावदादृता वडती ॥ ६३ ॥
एवंच चांद्र-मानें तेराही स्पष्ट सारिले अब्द ॥
सत्य-प्रतिज्ञ पांडव लागों देतिल न आपणा शब्द ॥ ६४ ॥
येतां अ-न्याय-लवें अल्पायासेंहि इंद्र-पद पदरा- ॥
हूं न ह्मणतील, काळापासुनिही पावतील हे न दरा ॥ ६५ ॥
युद्धें करूनि पाक्षिक जय, त्यांतहि विजय पातला समरा ॥
सम रामाशीं व्हा, हो शम राज्य-समर्पणें, हटें न मरा ॥ ६६ ॥
कुर्वधम ह्मणे युद्धचि हो, सख्य न हो पितामहा यासीं ॥
शक्रहि बुडेल यातें मद्धृत पद ओपितां महायासीं ॥ ६७ ॥
पार्थ ह्मणे वैराटे रथ कुरु-कटकासमीप राहूं दे ॥
गो-धन हरावयास्तव आले भट कोण कोण पाहूं दे ॥ ६८ ॥
तो गुरु, तो गुरु-नंदन, तो कृप, तो कर्ण, तो पितामह, रे ॥
यांहीं धेनु वळाव्या !! शिव शिव गोपाळ राम कृष्ण हरे !! ॥ ६९ ॥
रे उत्तरा शकुनिचा या व्यूहांत न दिसे मला भाचा ॥
त्यावांचुनि यांसीं जो करणें संग्राम तो न लाभाचा ॥ ७० ॥
हें कटक सोड, तिकडे चाल, तुझ्या हरुनि गोधना खळ तो- ॥
प्राण-त्राण-परायण जिकडे निरपत्रपाग्रणी पळतो ॥ ७१ ॥
उत्तर निज तुरगांतें द्याया अरुणासि कौतुक पिटाळी ॥

---

१ चांद्रवर्षाच्या मानानें—चांद्रमानानें वर्षांचे दिवस सुमारें ३५४ व सौरमानानें सुमारें ३६५¼ असतात. चांद्रमानाचा सौरमानाशीं मेळ घालण्यासाठीं चांद्रमानाच्या पांच वर्षांत सुमारें २ महिने अधिक धरितात. ह्या मानानें १३ वर्षांत चांद्रमानाचे ५ महिने व १२ दिवस ज्यास्त धरिले जातात. २ ( संख्यावत् + आदृता ) ज्योतिःशास्त्र जाणणाऱ्या पंडितांस मान्य. ३ ह्याप्रमाणें पाहिलें असतां. ४ हें स्वीकारार्थ अव्यय. ५ रामचंद्र जसा नीतीस्तव राज्यत्याग करून वनवासास गेला. तसें तुह्मी न्यायास अनुसरून पांडवांस राज्य द्या; असा भाव. ६ मद्धृत ( मत् + हृत ) पद ( मीं घेतलेलें राज्य ) यातें ( अर्जुनातें ) ओपितां शक्रहि महायासीं ( महा + आयासीं=मोठ्या संकटांत ) बुडेल—असा अन्वय. ७ कौरवपांडवांचा गुरु द्रोणाचार्य. ८ शकुनिचा भाचा—दुर्योधन. ९ प्राण राखण्याविषयीं तत्पर. १० ( निर् + अपत्रपा + अग्रणी ) निर्लज्जांमध्यें श्रेष्ठ ( दुर्योधन ). ११ सूर्याचा सारथी अरुण हा सूर्याच्या घोड्यांना जो वेग देतो, त्यापेक्षांहि उत्तर आपल्या घोड्यांस ज्यास्त वेग देता झाला असा भाव.

तों गर्जोनि कुरु-कटक-कर्णीं बसवी ध्वज-स्थ क[1]पि टाळी ॥ ७२ ॥
कोठें जाल उभे रे म[2]त्स्येश्वर-धेनु-पश्यतो-हर हो ॥
सोडा गो-धन नाहीं तरि वधिन तुह्मांसि वश्य तो हर हो ॥ ७३ ॥
खल-बल-जलधि-नि-मग्ना धेनु उसळल्या अलावु जाल्या हो ॥
हांसुनि विजय मनिं ह्मणे कां गोपै[3]-सख्या मला बुजाल्या हो ॥ ७४ ॥
गेल्या पळोनि गाई पृष्ठावरि पुच्छ-भार वाहोनी ॥
राहूनि निश्चल क्षण विजय निवे त्यांकडेचि पाहोनी ॥ ७५ ॥
येतांचि वि-क्रम-लवें श्री-हरिचा दयित दास वीर गडी ॥
हरि करि-घटेसि जैसा त्या कुरु-सेनेसि वासवी रगडी ॥ ७६ ॥
तत्काळ उत्तरें तो नेला कर्णाकडेचि रथ वातें ॥
घन गिरिकडे, सु-वैद्यें स्वौषध रुग्णाकडेचि अथवा तें ॥ ७७ ॥
दव जेविं तृ[4]णावरणा वृ[5]ष भस्म करी महा-शरावरणा ॥
पार्थ ह्मणे करितो गिरि-शें[6]-कमंडलुशीं पहा श[7]रात रणा ॥ ७८ ॥
होते य[8]दंश-शेष-श्वास-ज्वलनांत हे समिद् धरणी ॥
त्याचा सखा धनंजय होय खल-शलभ-लया समि[9]द्ध रणीं ॥ ७९ ॥
मग ग[10]गन-ग-नग-भिन्मुख-सुर-मत-गुरुसींहि अ[11]-नव मुनि नर तो-॥
क[12]लह करी कीं इतरीं गुरु-कलहीं यासि जन वमुनि न रतो ॥ ८० ॥

---

१ एका समयीं अर्जुन व मारुति ह्यांचा एकमेकांच्या बळाविषयीं कांहीं पण पडला असतां अर्जुनास कृष्णाचें साह्याय्य असल्यामुळें त्यांत मारुति हरला; तेव्हां कृष्णमतें असा नियम ठरला कीं, "मारुतीनें प्रत्येक युद्धप्रसंगीं अर्जुनाच्या ध्वजावर बसून आपल्या गर्जनेनें शत्रूंस भयभीत करावें." ह्यावरूनच अर्जुनास 'कपिध्वज' हें नांव पडलें आहे. २ विराटराजाच्या गायी पाहतां पाहतां नेणारे. ३ गवळ्याच्या (कृष्णाच्या) मित्रास. जो गोपसख त्यास गायींनीं बुजूं नये हें तात्पर्य. ४ (तृण + आवरणा) गवताच्या आच्छादनास. ५ कर्ण. ६ महादेवाच्या कमंडलूबरोबर. ७ परळ. ८ ज्या कृष्णाचा अंश जो शेष त्याच्या श्वासांच्या अग्नीमध्यें. प्रळयकाळीं प्रखरसूर्य किरणांनीं पृथ्वी तापून ती आग शेषाच्या मस्तकास पोंचली असतां तो फूत्कार करितो, व त्या योगानें सर्व पृथ्वी जळून जाते; अशी कथा आहे. ९ फार पेटलेला. १० गगनांत गमन करणारे आणि नगभित् (पर्वताचा भेद करणारा) ह्मणजे इंद्र तो आहे प्रमुख ज्यांत असे जे सुर ह्मणजे देव त्यांना मान्य जो गुरु (द्रोण) त्याबरोबर. ११ पुराणऋषि. अर्जुन हा नरनारायणांपैकीं नराचा अवतार होय. १२ उत्तरार्ध—यासि (क्षत्रियधर्मास अनुसरून मात्र केलेल्या कलहास) वमुनि (खेरीज करून) इतरीं गुरुकलहीं (गुरुशीं दुसऱ्या कोणत्याहि प्रकारच्या कलहांत) जन न रतो; असा अन्वय.

गुरुला वि-विध शरांची वाहे तो राग-राशि लाखोली ॥
भेटे अस्त्र-तति तया जशि पोहे सागरा शिला खोली ॥ ८१ ॥
करिती सूर्यास्तोदय एक मुहूर्तांत एक शतदा ते ॥
त्यांत न एकासमही होती मेघा असेहि शत दाते ॥ ८२ ॥
द्रोणार्जुन तुल्य-क्रिय बिंब-प्रति-बिंबसेचि ते गमती ॥
किति कुरु कटकें प्रेक्षक वृत्र-घ्नाचींहि लोचनें भ्रमती ॥ ८३ ॥
अश्वत्थामा धांवे रक्षाया संकटांत जनकास ॥
जन कासया विते सुत कसिते न करावया भजन कास ॥ ८४ ॥
सांवर्तिक मेघांच्या लाजाव्या द्रौणि-सायकां धारा ॥
सत्ताताहुनि होइल सुत ह्मणवायासि हाय कां धारा ॥ ८५ ॥
बहु कल्पना सु-कवि-मा विजयहि बहु शर-परंपरा व्याला ॥
भंगू पाहे समरीं गुरु-पुत्रासहि जसें पराव्याला ॥ ८६ ॥
प्रति-रव-मिषें शरांनीं भरतां कुंथावयासि नभ लागे ॥
देवी ह्मणति सख्यांनो दारुण हा क्षात्र-धर्म न भला गे ॥ ८७ ॥
झाले भाते समरीं आणाया गुरु-सुतीं उणीव रिते ॥
देती सामग्री जय तरि कां सद्गतिला गुणी वरिते ॥ ८८ ॥
भंगे अश्वत्थामा अश्वत्था मी कैंचित् सदा हरिला ॥

१ उत्तरार्धाचा अर्थ—शिळा महासागरांतहि टाकली असतां जशी ती त्याच्या थेट तळाशीं जाते, तसे नानाविध अस्त्रांचा प्रयोग करून जे बाण अर्जुनानें महापराक्रमी द्रोणावर सोडिले ते सर्व त्याच्या शरिरांत भेदून गेले—असा भाव. २ एकानें आपल्या बाणांच्या वृष्टीनें सूर्य झांकून टाकावा, व दुसऱ्यानें त्या बाणांचा छेद करून पुनः सूर्याचा उदय करावा, असे ते एक एक (प्रत्येक) मुहूर्तांत शेंकडों वेळां करित होते; हा भाव. ३ कोणतेंहि प्रतिबिंब ( प्रतिच्छाया ) ज्या पदार्थाचें असतें, त्या पदार्थास ( त्या प्रतिबिंबाचें ) बिंब ह्मणतात. पदार्थ आणि त्याचें प्रतिबिंब हीं जशीं सर्वांशीं सारखीं असतात, तसे द्रोण व अर्जुन पराक्रमानें अगदीं सारखे भासले. ४ सुत भजन ( सेवा ) करावया (जर) कास न कसिते, (तर) जन (त्यांस कासया विते?) असा अन्वय. ५ प्रलयकालसंबंधी. ६ अश्वत्थाम्याच्या बाणांस. ७ उत्तरार्ध—हाय ह्मणवावयास ( अरे रे हा कुपुत्र निघाला ह्मणून दुःखाचे उद्गार काढविण्यास) सुत सत्ताताहुनि (पराक्रमी बापापेक्षां) धारा (कमी योग्यतेचा) कां होईल ? असा अन्वय तात्पर्य, अश्वत्थामा द्रोणापेक्षां पराक्रमानें कमी नव्हता. ८ बाणांच्या पंक्ति. ९ प्रतिध्वनीच्या मिषानें. १० फक्त शनिवारींच अश्वत्थ ( पिंपळ ) ह्यापाशीं लक्ष्मीचा वास असतो, अशी प्रसिद्ध आहे.

तसि इतरासि जय-श्री नित्य हरि-जनासि तो तिणें वरिला ॥ ८९ ॥
हरुनि यशो-धन गो-धन योध न गणितां क्षयासि नेऊन ॥
त्या नृप-पुत्रास ह्मणे चाल पुरा हें मनींच ठेवून ॥ ९० ॥
झांकीं वपुला क्षत-जें बसतां मर्मीं अरीषु न्हाल्याला ॥
झाला सारथि पहिल्या योषा-वेषासि तो पुन्हा त्याला ॥ ९१ ॥
विजयी विराट इकडे ये पूजिति पौर विप्र-जन यातें ॥
येतांचि सभेंत पुसे प्रेमें त्या उत्तरा स्व-तनयातें ॥ ९२ ॥
जन कथिति धेनु कुरुनीं वळिल्या येऊनि उत्तराशेला ॥
त्वत्कीर्तिनें पसरिला स्व-परित्राणार्थ उत्तरा शेला ॥ ९३ ॥
गेला कुरु जिंकाया आहे सारथि बृहन्नडा, गमला ॥
सत्य कुमारचि, वदला लागो अप-कीर्तिचा न डाग मला ॥ ९४ ॥
भू-प ह्मणे कुरु होतिल वारे, करितील आजि अभ्र मुला ॥
दुःख सुदेष्णेला जें शिरतां सिंहांत कलभ अभ्रमुला ॥ ९५ ॥
देवा कुमार आला सोडविल्या धेनु पळविलीं कटकें ॥
न वय प्रमाण तेजस्वि-जनीं ह्मणती कवी न तें लटकें ॥ ९६ ॥
धर्म ह्मणे आयकिलें दूताचें वचन चांगलें कानें ॥
राया सुख-रोमांचित केलें कीं आजि आंग लेकानें ॥ ९७ ॥
सारथि बृहन्नडा ज्या तद्विजयें करुत बायका नवला ॥
चिंतो-मणि-गल बालक जो दुर्लभ त्यासि काय कानवला ॥ ९८ ॥
गाजत वाजत साजत आज तया जतन करुनि आणा हो ॥
मज-मागें मत्स्यांचा हा रिपु-शशि-राहु-बाहु राणा हो ॥ ९९ ॥

---

१ वर्मी बाण लागून रक्तानें भिजलेल्या शरिरास झांकी. २ स्त्रीवेषास. ३ (उत्तर + आशेला) उत्तर दिशेला. ४ त्वत्कीर्तीनें स्वपरित्राणार्थ उत्तरा शेला पसरिला, हा अन्वय; तुझ्या कीर्तीनें उत्तरापुढें पदर पसरून, माझें रक्षण कर अशी विनंति केली. तुझी कीर्ति राखण्याकरितां तो युद्धास गेला; हें तात्पर्य. ५ सत्य कुमारचि गमला–ह्मणजे खरोखर कार्तिकस्वामीच वाटला. ६ मुलाला ( उत्तराला ). ७ सुदेष्णा ही विराटाची बायको, तिला. ८ हे राजा. ९ अंगांत मोठा पराक्रम असण्यास वय मोठें असावें लागत नाहीं हें तात्पर्य. १० चिंतामणि ( इच्छिलेलें देणारें रत्न ) ज्याच्या गळ्यांत आहे असा बालक. ११ शत्रु हाच चंद्र त्याला राहूसारिखा ( ग्रासणारा ) आहे बाहु ज्याचा; हें 'राणा' याचें विशेषण.

## उद्योग-पर्वातील कृष्ण-शिष्टाई.

( म० भा० अ० ७२-९५; मोरोपंत अ० ६-८ )

**पांडवांचा** अज्ञातवास संपल्यानंतर त्यांनीं आपला राज्याचा हिस्सा आपणांस मिळावा, व **दुर्योधनाशीं** सल्ला व्हावा ह्मणून **कृष्णास** शिष्ट ( वकील ) करून **हस्तिनापुरास** पाठविलें, हें ह्या आख्यानांत आहे.

**धर्म** ह्मणे **श्री-कृष्णा** बुडतों मी सत्य जाण तार मला ॥
भव बुडवी ह्मणुनिच तव भजनीं **सनकादि** जाणता रमला ॥ १ ॥
जेणें न बुडे कुरु-कुळ धर्म, यश, न्याय, त्याचि सदुपाया-॥
सांग, सख्या भ्रमला हा जन, केवळ आप्त तूंचि यदु-पा या ॥ २ ॥
श्रीकृष्ण ह्मणे देवा जातों मी त्याकडे हित वदाया ॥
काय सु-योधन न शके पचवाया वृत्र-हाहि तव दाया ॥ ३ ॥
धर्म ह्मणे हितहि तया अ-हित, अहि तसाचि तो परम खळ गा ॥
व्यसनीं भल्यासि पाडी दुष्ट गजा जेविं पिहित-मुख खळगा ॥ ४ ॥
शौरि ह्मणे राजेंद्रा यद्यपि बलवान् तथापि शुनकानें ॥
हरिनें काय करावें परिसो तो हित-कथा पिशुन कानें ॥ ५ ॥
जिंकिल काय हरा तो जिंकी कुतुकेंचि मन्मथ नरा जो (ज्या) ॥
करिल हरि-मथन शश तरि करिल सु-योधनहि मन्मथन राजा ॥ ६ ॥
योजीन युक्ति सामीं सांदीपनिच्या तुझ्या बहु नव्या ही ॥
प्राणापरीस बहु मज जेविं तुह्मीं तेविं तो बहु न व्याही ॥ ७ ॥
माय करी बाळाचें नित्य श्रमवूनि काय जेविं हित ॥
तेविं करितसे मन्मति होय निज-दयेसि काय जें वि-हित ॥ ८ ॥
देइल अंश सु-योधन तरि आह्मा पावला सदाशिव हो ॥
ह्मणतोसि तूंहि मीही कीं प्रज्ञा-चक्षुचें सदा शिव हो ॥ ९ ॥
**श्री-राम** जसा प्रेषी शिकवुनि सामोक्ति अंगदा साच्या ॥
धर्म तसा प्रभुला, जो कार्यी देणार अंग दासाच्या ॥ १० ॥

---

१ या ( ह्या धर्मास ) यदुपा ( हे कृष्णा ) तूंचि आप्त—हित व खरें सांगणारा (आहेस). २ हे धर्मराजा. ३ गवतानें वगैरे झांकलें आहे तोंड ज्याचें असा. ४ तो खल दुर्योधन. ५ ज्याला. ६ दुर्योधनाची मुलगी लक्ष्मणा ही कृष्णाचा मुलगा सांब ह्यास दिली होती, ह्मणून तो व्याही. ७ प्रज्ञा ( बुद्धिच ) आहे चक्षु ज्यास ह्मणजे अंध त्याचें—धृतराष्ट्राचें. ८ सामाविषयीं भाषणें.

भीम ह्मणे केशवजी मृदु बोला [1]उग्र तो सु-योधन हो ॥
वा त्यासीं सख्याचि हो युद्धीं हत एकही सु-योध न हो ॥ ११ ॥
इतर असो, लाजेलचि त्या नित्य मदांध सुर-गज [2]गदीशा ॥
दुर्योधना गुरु असें ह्मणतिल गरलांध उरग जगदीशा ॥ १२ ॥
श्री-कृष्ण ह्मणे हा रे भीमा जरि तूं महा-भुज गदीन ॥
भ्यालासि, होय जैसा चिंतुनि गरुडा महा-भुजग दीन ॥ १३ ॥
आह्मा तुझा भरंवसा बहु कीं खळ मर्दिशील तूं अगदीं ॥
निर्वीर्यत्व [3]चिकित्सा-समयीं [4]आलें चिरार्जितीं [5]अगदीं ॥ १४ ॥
भीम ह्मणे हा द्याया सुत-शोक पित्यासि [6]यादवा [7]लाजे ॥
भस्मचि होतील सकळ ते सांपडतील या दवाला [8]जे ॥ १५ ॥
अर्जुन ह्मणे सख्या जें कीर्ति-कर असेल तेंचि कर जा गा ॥
मागावें काय, तुझा प्रणत-त्राणीं असेचि कर जागा ॥ १६ ॥
कृष्णाहि ह्मणे कृष्णा ह्मणसि जिला प्रिय-सखी पहा हे ती ॥
विसरो तुझी न समर्था ईस श्रित-[9]भव्य-दा महा-हेति ॥ १७ ॥
बहु गहिंवरोनि दावुनि [10]दुःशासन-पाणि-कृष्ट-केश वदे ॥
बहु दीर्घ उष्ण सोडुनि सुसकारा तीस अ-भय केशव दे ॥ १८ ॥
श्रीमद्युधिष्ठिराच्या दूतत्वा परम लाभ मानुनि घे ॥
[11]दुर्योधन-प्रमुख-खळ-खद्योत-तदन्य-पद्म-भानु निघे ॥ १९ ॥
धर्म ह्मणे शीघ्र सुखें ये जोडुनि सिद्धि कीर्ति-सह देवा ॥
मातेसि नमुनि वद कीं आहे आरोग्य [12]साधु-सहदेवा ॥ २० ॥
तूं जेविं देवकीला भेटसि तैसाच भेट [13]आतेला ॥
आह्माहुनि तूंचि अधिक घृत सोडुनि कोण करिल आ तेला ॥ २१ ॥

---

१ गदा धारण करणाऱ्यांत श्रेष्ठ अशा ( दुर्योधनास ). २ गदी + इन—गदा धरणाऱ्यांत श्रेष्ठ. ३ निःसारपणा. ४ रोग दूर करण्याच्या वेळीं. ५ पुष्कळ दिवस संपादन करून ठेविलेल्या औषधांत. ६ कौरवांचा बाप ( धृतराष्ट्र ) त्यास. ७ हे कृष्णा. ८ हा ( भीच जो ) वणवा त्याला. ९ आश्रितांचें कल्याण करणारी किंवा कृष्णाचें संबोधन. १० दुःशासनानें हातानें ओढलेले केस. ११ दुर्योधन आदिकरून जे दुष्ट हेच काजवे त्यांस 'व त्या दुष्टांहून इतर ह्मणजे ( सुजन ) तींच पद्में त्यांस' सूर्यासारखा. दुष्टांचें दमन करणारा व साधूंस संतोष देणारा असा कृष्ण. १२ बाळा सहदेवाला. सहदेव सर्वांत लहान असल्यामुळें असें ह्मटलें आहे. १३ कुंतीला.

कृष्णा कळेल तैसें वद कुंतीला न दुःख बाधावें ॥
पंकीं धेनु[1] श्रमती पुण्य-श्लोका मुरारि बा धावें ॥ २२ ॥
धृतराष्ट्र भीष्म [2]बाल्हिक विदुर कृप द्रोण सर्व शुचि तेज्ज्ञ ॥
जे त्यांसि भेट, वद हि[3], सांगों तुज काय, तूंचि उचित-ज्ञ ॥ २३ ॥
म्यां पुशिलें [4]कुशल असें कर्णासि सुयोधनासि सांगावें ॥
येतां पंचम दाटुनि कर्ण-कटु पिकें शिकोनि कां गावें ॥ २४ ॥
ऐसें अ-जात-रिपु नृप [5]सूचित सुचवूनि शौरिला परते ॥
मग विजय ह्मणे देवा येऊं द्यावे न मजपुढें पर ते ॥ २५ ॥
प्रभु पांडवांसि फिरवुनि जातां पाहे पथांत नाकर्षी ॥
राजर्षि ब्रह्मर्षि स्व-यश जयांच्या मनासि आकर्षी ॥ २६ ॥
इच्छा पुसतां वदले बा तुज-सम अन्य बोलका नाहीं ॥
प्राशूं धृतराष्ट्र-सभे-माजि तुझे धन्य बोल कानांहीं ॥ २७ ॥
दे[6] या अयास याया आज्ञा स-दया महोदया [6]परिसा ॥
यापरि साधु-मनोरथ जाणोनि ह्मणे मुकुंद या परिसा ॥ २८ ॥
सामार्थ प्रभु येतो ऐसें धृतराष्ट्र आयके कानीं ॥
बहु तृषित अंध चातक मेघा-सम जेविं काय केकांनीं ॥ २९ ॥
मार्गीं सभादि सर्वहि बहु साहित्य प्रति-स्थळीं करवी ॥
कीं आपणावरि दया-दृष्टि करावी यदूत्तमें बरवी ॥ ३० ॥
देव न पाहे तिकडे कीं तें करणें नव्हेचि निष्कपट ॥
मैंदाचें स्वीकारिल कवण विचक्षण अ-मूल्य निष्कपट ॥ ३१ ॥
धृतराष्ट्र ह्मणे विदुरा जो साधु-मनें स्व-सद्गुणें हरितो ॥
येइल [7]वृकस्थळाहुनि आह्मां भेटावया उद्यां हरि तो ॥ ३२ ॥
दासी शत दासहि शत आठ महा-नाग रुक्म-रथ सोळा ॥
देईन तोहि सन्मणि शुचि तेजाचाचि जो गमे गोळा ॥ ३३ ॥

---

१ कुंती हीच गाय. २ हा शंतनुराजाचा भाऊ व भीष्माचा चुलता. ३ ज्ञातें. ४ कोकिळास पंचम ( गोड स्वरानें ) गातां येत असतां त्यानें शिकून ( दाटून ) कर्णकटु कां गावें?-धर्मराजा अगदीं सरळ स्वभावाचा व अजातशत्रु होता ह्मणून त्यानें कर्णदुर्योधनांस ( ते दुष्ट असतांहि ) कुशल विचारिलें हें तात्पर्य. ५ (सु + उचित) योग्य. ६ हे सदया महोदया ( भक्तांचा मोठा उत्कर्ष करणाऱ्या ) परिसा, या अयास ( हे आह्मी जे लोक त्यांस ) याया ( येण्याला) आज्ञा दे. ७ वृकप्रस्थ ( गांवाचें नांव ) तेथून.

विदुर ह्मणे कपट मनीं प्रेम वरि असें करूं नको पार्वे ॥
तुजवरि न ईश्वरानें करुणा परती करून कोपावें ॥ ३४ ॥
पांचां पुत्रां द्यावीं पांच न होउनि खळासि वश गांवें ॥
तें तों न करिसि जेणें प्रभुनें स्व-मुखेंकरूनी यश गावें ॥ ३५ ॥
गुळ-खोबरें विलोकुनि भलत्याहि जनासि बाळक वळावा ॥
सत्य प्रेमचि दावुनि मु-र्जें तो विश्व-पाळ कवळावा ॥ ३६ ॥
कपटादरें वळो पेर पर परमेश्वर कसा वळेल हरी ॥
कृष्ण-कृपामृत-निधिची अ-कपट-वि-नताकड वळे लहरी ॥ ३७ ॥
येतो साम कराया होय यशोर्थीच, तो यश लाहो ॥
देणार तुह्मी हय गज रथ दासी दास, हे कशाला हो ॥ ३८ ॥
समजाल तरि करिल हरि हर्षें पावोनियां विडा लास्य ॥
नाहीं तरि खेद-द त्या सर्व, जसें प्रे-स्थिता बिडालास्य ॥ ३९ ॥
तेव्हां सु-योधन ह्मणे सत्य न सोडील सख्य हरि त्यांचें ॥
न पुरेल कृष्ण-मानस-हरणीं बळ मेरुच्याहि हरित्यांचें ॥ ४० ॥
कृष्णासि वस्तु संप्रति किमपि न द्यावें तुह्मीं अहो तात ॥
भ्याले ह्मणेल, मान्य न अव-मानाला कुलीन होतात ॥ ४१ ॥
त्रि-भुवन-पूज्य-तम प्रभु सत्यचि हें किंचें तो असे न्याही ॥
परि संप्रति सेव्य नव्हे सेवूं कृष्णेतरा अ-सेव्याही ॥ ४२ ॥
जें वैर वाढलें तें आतिथ्येंकरुनि काय हो शमतें ॥
अव-मान नव्हे जेणें तें क्षेत्रोचित असें मला गमतें ॥ ४३ ॥
वृष्णि-प वृकस्थळाहुनि येतां भीष्मादि सु-ज्ञ ते सर्व ॥
जन सामोरे गेले अंदुक जाला सु-योधना गर्व ॥ ४४ ॥
धृतराष्ट्र-गृहा नेती राज-पथीं हळुहळूच हरि हरितें ॥
त्यां पशु ह्मणेल तो पशु, त्यांचें स-कृप-त्व अ-तुळ हो रिहरि तें ॥ ४५ ॥

१ ईश्वराहून अन्य. २ कपट सोडून शरण गेलेल्याकडे. ३ बाहेर जाणारास जसें (बिडाल + आस्य) मांजराचें तोंड, (मांजर) वाटेंत आडवें आलें तर तें दुःखद होतें. ४ पांडवांचें. ५ तिन्ही लोकांत पूजा करण्यास अत्यंत योग्य ६ आणि. ७ क्षत्रियाला योग्य. ८ यादवांचा पति (कृष्ण). ९ गर्वानें दुर्योधन सामोरा गेला नाहीं, हें तात्पर्य. १० घोडे. ११ हे शब्द आश्चर्यवाचक आहेत. कृष्णमूर्ति चांगली सर्वांच्या दृष्टीस पडावी ह्मणून घोडे हळू चालत होते हें तात्पर्य.

भेटे धृतराष्ट्राला तत्कृत पूजेसि बहुत भाउनि घे ॥
मग जगदीश्वर तेथुनि त्याचा निववावयासि भाउ[1] निघे ॥ ४६ ॥
"आहेत सुखी पांडव देवा आलासि काय सामास[3] ॥
खळ न वळेल झिजविला[4] जरि करितां बोध काय सा मास[5]" ॥ ४७ ॥
विदुरासि भेटल्यावरि भेटे सर्वाप्त-राज[6] कुंतीतें ॥
जीस अ-सुख सह्य गमे दे जें भेदूनि हृदय कुंती तें ॥ ४८ ॥
वैकुंठाच्या कंठीं घालूनि मिठी रडे पृथा आर्या ॥
ब्रह्मासहि गहिंवरवी महिवर-वीरेंद्र-पांडुची भार्या ॥ ४९ ॥
प्रभुला ह्मणे मुकुंदा बा तूंचि करिसि सुखी स-खेदास[9] ॥
संप्रति आहेत कसे मद्बालक ते तुझे सखे दास ॥ ५० ॥
प्रिय-सुत-विरह सु-दुःसह देहें[10]-विरह बहु बरा सु-सह देवा ॥
पावेन कधीं बा मी ह्मणतें स्वें-बहिश्चरासु[11] सहदेवा ॥ ५१ ॥
वत्सा सहदेवा मी मेल्यावरि हाय नच वदावें हो ॥
तेरों पळेंहि नसती माता, हें हायन चवदावें हो[12] ॥ ५२ ॥
प्रभु अश्रु पुसोनि ह्मणे जें संकल्पित घडेल सत्वर तें ॥
आत्याबाई कवणें ऐसे श्रम भोगिले न सत्व-रतें ॥ ५३ ॥
मच्चित्त कौरवांचें चिंतूनि अ-साधु-वाद[13] तळमळतें ॥
असतों मी तैं तरि न व्यसन-मळें धर्म-पाद-तळ मळतें ॥ ५४ ॥
आहेत स-दार सुखी देवि नमस्कार हे तुला साजे[14] ॥
ऐसें सांगुनि वंदी, तें त्या श्रित-शर्म-हेतुला साजे ॥ ५५ ॥
समजावुनि कुंतीतें भेटे दुर्योधना अ-सेव्याही ॥
कीं तो स्वें-सुता स्वें-सुता[15] देउनियां जाहला असे व्याही ॥ ५६ ॥

---

१ धृतराष्ट्राचा भाऊ (विदुर). २ हें विदुराचें भाषण. ३ संधि करावयास. ४ शरीर. ५ सहा महिने -पुष्कळ दिवस हा अर्थ. ६ सर्व हितचिंतकांमध्यें श्रेष्ठ (श्रीकृष्ण). कोठें सर्वाप्तराजकुंतीतें असें एक पद आढळतें, तसें केल्यास, सर्व आप्त (इष्टमंडळी) ह्यांत प्रमुख कुंतीला, असा अर्थ घ्यावा व भेटे ह्याचा कर्ता कृष्ण अध्याहृत घ्यावा. ७ भाला धारण करणारा. ८ निर्विकार अशा ईश्वरालाहि. ९ दुःखितास. १० देहाचा नाश. ११ (बहिः + चर + असु) बाहेर संचार करणारा प्राणच. १२ पुत्रवियोग झाला असतां माता (आई) तेरा पळेंहि वांचावयाची नाहीं; परंतु मी १३ वर्षे वांचलें आहें, ह्मणून मला माता हें नांव शोभत नाहीं, हें तात्पर्य. १३ दुर्भाषणें. १४ सहा. १५ आपल्या मुलाला आपली मुलगी.

लघु ह्मणति जे सु-योधन-दुःशासन-शकुनि-कर्ण वेनोतें[1] ॥
परिरंभ-पात्र केले प्रभुचें सौजन्य वर्णवेना तें ॥ ५७ ॥
पूजुनि वे प्रभु, होइल जल-निधिला तृप्ति-दायक विहीर ॥
थोरपण अनंताचें अनंत वर्णील काय कवि-हीर ॥ ५८ ॥
भोजन करा ह्मणे शठ, देव ह्मणे मज कशास होकरितां ॥
जेवा तुह्मींच, दाटुनि आदर आग्रह कशास हो कारितां ॥ ५९ ॥
असतों जरि अन्नार्थी प्रथमचि ह्मणतों अवश्य मी तुजला ॥
प्रेमार्थी पांडव-सख हा अन्नाकारणें नसे सुजला ॥ ६० ॥
प्रभुला ह्मणे सु-योधन तिकडे हिकडेहि[2] सम असे नातें ॥
ज्याकारणें करावा अस्मदनादर[3] तुवां असेना तें ॥ ६१ ॥
देव ह्मणे केवळ ते न सोयरे मदसु सर्व वसु देव ॥
मान्य जसे अक्रूरोद्धव-बळ-भद्रोग्रसेन-वसुदेव ॥ ६२ ॥
जे तत्सख तद्रिपु ते मत्सख मद्रिपु खरे अगा राया ॥
द्विषदन्न[4] न सेवावें ग्यां येऊंही नये अगारा या ॥ ६३ ॥
खोटा सु-योधन ह्मणुनि विदुर-गृहा जाय देव नच खोटा ॥
गोपोच्छिष्टा[5] वळला वळता कां वासुदेव न चखोटा ॥ ६४ ॥
दुः-संग-नक्र-दत्त[6] क्लेश निवारूनि सर्व विदुर-गजा[7] ॥
मुक्त करी हरि, लाजे गातां गुण-कीर्ति सर्व-विदुरग[8] जा ॥ ६५ ॥
शत-संख्य वाजवी ज्या जेववितां माय देवकी चिटक्या[9] ॥
तो नित्य-तृप्त भगवान् विदुर-गृहीं भोजनांत दे मिटक्या ॥ ६६ ॥
आले ढेंकर, दिधल्या मिटक्या बहुसाळ, मारिले फुरके ॥
उरके सर्वांमागुनि अशन परि न ताट चाटणें उरके ॥ ६७ ॥
ज्याच्या चरणें स्व-रजा-करवीं प्र-णतासि मोक्ष देवविला ॥
देव विलीस-मनु-ज-तनु[10] विदुर-प्रेमें यथेष्ट जेवविला ॥ ६८ ॥
मग रात्रौ एकांतीं सर्व-ज्ञालाहि साधु-राय कवी ॥

१ ह्या नांवाचा राजा महापातकी व दुष्ट होता; त्यालाहि जे सुयोधनादि लघु (लहान) (तो काय आमच्या पुढें?) असें ह्मणाते. २ पांडवांकडे व आह्मांकडे. ३ आमचा अपमान. ४ द्विषत् + अन्न शत्रूचें अन्न. ५ गोपाळांच्या उष्ट्या अन्नाला. ६ दुःसंग हाच नक्र ह्यानें दिलेले. ७ विदुररूप गजेंद्रास. ८ (सर्व–वित् + उरग) सर्वज्ञ शेष. ९ चुटक्या. १० लीलेनें मनुष्यदेह ज्यानें धारण केला आहे असा.

पाय रगडितां दुर्जन-दुर्योधन-दुर्मतासि [1]आयकवी ॥ ६९ ॥
पंगुहि मेरुवरुनिहि न माथां धरितां यदंघ्रि-रज निसरे ॥
त्या दीन-बंधुची ती चिंता न सरे परंतु रजनि सरे ॥ ७० ॥
प्रातःकाळीं स-शकुनि दुर्योधन ये स्वयें बहायाला ॥
प्रातर्विधि करुनि प्रभु जाय प्रेज्ञांबका पहायाला ॥ ७१ ॥
जन-दृष्टि-चातकी जी तूर्य-रवेंकरुनि देत ओ तीतें ॥
प्रभु-मेघ दर्शनामृत दुर्लभ जें तन्मुखांत ओती तें[2] ॥ ७२ ॥
मग जी जल-द-श्यामा करुणा बसली नवासनावरि ती ॥
जीच्या उपासक-जना-प्रति विषयाच्या न वासना वरिती ॥ ७३ ॥
केवळ जवळ बसविला विदुर प्रेमेंकरूनि मा-पानें ॥
तद्यश न मोजवेल ब्रह्मांडायेवढ्याहि मापानें ॥ ७४ ॥
टकमक पाहत होते प्रभु-मुख-चंद्राकडेचि चातकसे ॥
नसतील जोडिले श्रवणांहिं बसाया मनासि हात कसे ॥ ७५ ॥
सभ्य श्रुति-वदनांतें पसरिति सेवावया भगवदुक्ती ॥
प्राशावयासि जेविं स्वच्छ स्वात्यंबुला जलधि-शुक्ती ॥ ७६ ॥
देव ह्मणे धृतराष्ट्रा राया मोठी जगीं तुझी पदवी ॥
पद विद्यांचें तूं, परि परिस, मज बळेंचि आप्त-ता वदवी ॥ ७७ ॥
जें मेळविलें चंदन-सम झिजवुनि पर-सुखार्थ आंगातें ॥
केवळ कृपाळु-पूर्वज-सद्यश मळविसि बळेंचि कां गा तें ॥ ७८ ॥
दुःख परासि न द्यावें, सत्य वदावें क्षमा न सोडावी ॥
जोडावी कीर्ति, असी कुळ-रीति तुह्मीं कधीं न मोडावी ॥ ७९ ॥
वाढिव धर्म प्रेमें वाढवि मज जेविं नंद नवनीतें ॥
सत्पुत्रांनीं भवनीं सुर-तरुनीं न सुख नंदन-वनीं तें ॥ ८० ॥
ह्मणतो युधिष्ठिर नको पायें लोटूं मला अव-नतातें ॥

---

१ प्रज्ञा ( बुद्धी ) हेंच आहे अंबक ( नेत्र ) ज्याचें अशाला ह्मणजे अंध धृतराष्ट्राला. २ जनदृष्टि जी चातकी तीतें प्रभु मेघ तूर्यरवेंकरुनि ओ देत जें दुर्लभ दर्शनामृत तें तन्मुखांत ओती. ३ करुणेची मूर्तीच जो कृष्ण. ४ लक्ष्मीपतीनें. ५ एथें चंद्राच्या संबंधानें चकोरपद पाहिजे; परंतु प्रास साधण्याच्या व्यवधानांत चातकपद योजण्याचा प्रमाद कवीच्या हातून झाला असावा. ६ कान हींच वदनें त्यांतें. ७ स्वातिनक्षत्राच्या उदकास.

वचन-कराप्रत्यांचें न करावें काय हो अवन तातें ॥ ८१ ॥
क्रमिले तसेचि कथिले होते त्वां त्यांसि अब्द तेरा जे ॥
धन्य ह्मणत होते जे लाविती तुलाचि शब्द ते राजे ॥ ८२ ॥
सुख-संतति-सु-कृतर्द्धि-प्रीति-श्री-पुण्य-कीर्ति या लाभें- ॥
साम करीं साधूंनीं नाहीं तरि पावलेंचि योंला भें ॥ ८३ ॥
बहु सत्य बहु प्रिय बहु हित बहु मत बहु दुराप बहु रुचिर ॥
शुचि-रम्य-श्रीरधिजानन-चंद्र-चकोर बोलिला सु-चिर ॥ ८४ ॥

## आर्या—भीष्म-पर्वांतील युद्ध-प्रकरणीं.

( म० भा० अ० २३ व १२६; मोरोपंत अ० १-१० ).

युद्धारंभीं श्रीकृष्णानें सांगितल्यावरून विजयानें ( अर्जुनानें ) रथाखालीं उतरून आपल्यास विजय मिळावा ह्मणून श्रीदुर्गेचें स्तवन केलें. त्यानंतर देवी प्रगट होऊन तिनें “ तुला जय प्राप्त होईल ” असा आशीर्वाद दिला व ती गुप्त झाली. मग आपल्या समोर सर्व आप्तमंडळी उभी राहिलेली पाहून त्यांच्यावर बाण कसे टाकावे ह्मणून अर्जुनाला भीति उत्पन्न झाली असें पाहून श्रीकृष्णानें अटरा अध्याय गीतेचा अर्जुनास उपदेश केल्यानंतर तो भीष्माशीं युद्ध करूं लागला. त्यांत भीष्माचे बाण अर्जुनास लागून तो घायाळ होऊन रथांत पडला. तें पाहून श्रीकृष्ण रथावरून खालीं उडी टाकून भीष्मास मारण्याकरितां त्याच्या अंगावर धावून गेला व त्यानें भीष्माचा पराभव केला ही कथा या आख्यानांत आहे.

युद्धारंभीं यदु-पति वदला विजया रथा-तळीं उतर ॥
दुर्गेसि हात जोडीं होइल खल-बल-समुद्र हा सु-तर ॥ १ ॥
त्रि-भुवन इच्या प्रसादें जेविं वसंततुनें समस्त वन- ॥
शोभे, ह्मणुनि करावें त्वां केवळ दुर्बला-सम स्तवन ॥ २ ॥
स्व-रथाखालें उतरुनि नमुनि ह्मणे विजय वि-जय दे दुर्गे ॥
त्वत्पद-भजनीं बहु सुख ह्मणुनि ह्मणे भक्त मुक्तिला दुर्गे(दुर गे)॥ ३ ॥

१ (वचन + कर + अपत्य ) आज्ञेंत राहणाऱ्या मुलांचें. २ सुखादिकांला. ३ (दुर् + आप) ऐकायाला मिळणें कठीण. ४ लक्ष्मीच्या मुखचंद्राविषयीं चकोरासारखा कृष्ण. ५ मे दूर हो.

वासर-मणि-कोटि-रुचे हास-रस-वशीकृत-स्मराराते ॥
कासर-नगासने हा दास रणीं वि-जय-पात्र हो माते ॥ ४ ॥
त्वदुदारता जसी तसि न सुरांच्या बहु-मता अं-गा साधो ॥
ऐसें स्तवितांचि शिवा दर्शन देउनि ह्मणे अगा साधो ॥ ५ ॥
द्याय। मज यश, लोकां सुख, गृध्रां तो लुलाय मास मरे ॥
मरतिल तसेचि तव रिपु मानुनि समरीं तुला यमासम रे ॥ ६ ॥
देउनि विजय-वर असा झाली अंतर्हिता भवानी ती ॥
सदवन असदनवन या नित्य जिच्या बहु-मता भवा नीती ॥ ७ ॥
युद्धारंभीं भीष्म-द्रोण-प्रमुखाखिलाप्त-वध-भीता ॥
शक्र-सुता त्रि-जगद्गुरु-कृष्णें उपदेशिली स्वयें गीता ॥ ८ ॥

त्या योगानें अर्जुनाचा मोह दूर होऊन तो युद्धास तयार झाला तेव्हां—

बहु-विध-वाद्य-रव अ-मर-नाथादि-विमान दाटले खांत ॥
वर्णिति नर-नारायण कोण तयांचे न भाट लेखांत ॥ ९ ॥
भीष्म पुढें करुनि उठे प्रथम सु-योधन कराव्या कदन ॥
भीम पुढें करुनि उठे धर्म प्रभु जो सु-कीर्तिचें सदन ॥ १० ॥
भीमाचा सिंह-ध्वनि कोणासहि आयकों न दे वाद्यें ॥
सोडुनि समाधि मस्तक डोलविलें आयकोन देवाद्यें ॥ ११ ॥
वृद्ध-तरुण भीष्मार्जुन परि न रणीं न्यून अधिक ते गमले ॥
सम लेखर्पि तयांतें जाणुनि तद्भुज-पराक्रमीं रमले ॥ १२ ॥
सूं सणणण सणणणणण वाजति शर-निकर काय-हानि-कर ॥
वदले सुर मुनि करितो नर-रूपें रुद्र काय हा निकर ॥ १३ ॥
शर-धी जल-धी फुटले कीं दैवें पाश एकदां तुटले ॥
कीं काल-व्याल, करटि-घोटक-भट-भेक खावया सुटले ॥ १४ ॥

---

१ कोटि सूर्याप्रमाणें आहे तेज जिचें. २ आपल्या सुंदर हास्यानें स्वाधीन केला आहे मदनाचा शत्रु (शिव) जिनें. ३ महिषासुर व विंध्याचल ह्यांवर बसणारी. ४ कल्पवृक्षास. ५ महिषासुर. ६ असत् + अन् + अवन—दुष्टांचें रक्षण न करणें. ७ भीष्म, द्रोण आदिकरून संपूर्ण आप्तांचा वध होईल ह्मणून भ्यालेला जो. ८ इंद्राचा मुलगा अर्जुन, त्यास. ९ अर्जुन व कृष्ण ( वर्णिति त्याचें कर्म ). १० महादेवानें. ११ शरिरांचा नाश करणार. १२ कृष्णसर्प. १३ हत्ती, घोडे, व योद्धे हेच कोणी बेडूक ह्यांस गिळावयास.

..र्जुनि उपम[illegible] -तातिस वाहुटळ लाजो ॥
[illegible]-तुल-बल न कां गेर-गल-कलहींहि न विजेय-बाहु टळला जो ॥ १५ ॥
देवासुराहव न बहु त्या कौरव-पांडवाहवाहून ॥
शोणित-नदींत गेले स[4]-भट-रथ-द्वि-रद-वाह वाहून ॥ १६ ॥
तिसरे दिवशीं राया[5] भीमानें अतितरोग्र[6]-कोपानें ॥
दुर्योधन नृप मूर्छित केला भेदुनि उरांत रोपानें ॥ १७ ॥
सावध होउनि राजा भीष्मासि ह्मणे अहो पितामहजी ॥
झाली भवत्[7]-प्रतिज्ञा काय, जना दे सुधा पिता मह जी ॥ १८ ॥
असतां तुह्मी पति[8] पृथा-पुत्र मथिति या मदीय पृतनेतें ॥
नवल ज्वलदनलाचें[9] सर्वस्वें बळ हरोनि घृत नेतें ॥ १९ ॥
जिकडे वपु तिकडे मन युक्त, न शोभेल अन्यथा नातें ॥
पायें अनन्य लोटुनि लावावें काय अन्य[10] थानातें ॥ २० ॥
राया भलतें वदसी पथ्य[11] हित स्व-गुरु-वच न आइकसी ॥
अन्य असोत, वदेल स्व-सुताप्रति अ-हित वचन आइ कसी ॥ २१ ॥
कैसा जिंकावा हो करुनि बळें आहवा युवा[12] जीनें[13] ॥
बा जिंकिला कधीं तरि जवनें तरुणेंहि वायु वाजीनें ॥ २२ ॥
मी आजि साग्रजानु[14]-ज शक्र-सुताचें करीन वारण गा ॥
बहु हेंहि पदभरिहि जरि सारील अ-नव करी नवा रण[15]-गा ॥ २३ ॥
असि करुनियां प्रतिज्ञा विष्णु-पदी-नंदनें अति-त्वरितें ॥
पांडव-चमू-पतीचें मथुनि चमू पाडिलें पति-त्व रितें ॥ २४ ॥
जिकडे जिकडे पळती तिकडे तिकडे महा-जवन तो बा ॥
बहु हाय हाय ह्मणती प्राकृत, बुध हंत हा, यवन तोबा ॥ २५ ॥
गरुडाहि अहीस न तसा न करि-कुळालाहि तेविं हरि खपवी ॥
दुर्योधनासि जैसा दे भीष्म न हरिस[16] तेविं हरिख पवी ॥ २६ ॥

---

१ हत्तींचा नाश करणाऱ्या अर्जुनाच्या बाणसमुदायास उपमा वाहुटळ योजून कवि लाजो. २ विष आहे कंठांत ज्याच्या अशा शिवाबरोबर युद्ध करण्यांत. ३ अर्जुनाचा बाहु. ४ योद्ध्यांसह रथ, हत्ती व घोडे. ५ हे धृतराष्ट्रा. ६ अतितर + उग्र + कोप—फारच भयंकर कोप. ७ पांडवांस मी जिंकीन किंवा ते मला जिंकितील अशी (भार० भीष्म-प० अ० ८१). ८ सेनापते. ९ (ज्वलत् + अनल) पेटलेल्या अग्नीचें. १० दुसरें मूल. ११ नीतीस अनुसरून असणारें. १२ तरुण—अर्जुन. १३ ह्मातारा जो मी त्यानें. १४ वडील व धाकट्या भावांसह. १५ रणांत आलेल्या. १६ इंद्राला.

धर्म-कटक खांडव-वन, भीष्म विजेय, विजय
शर दव, रक्त ज्वाला, रूपक याहूनि होय बहु न
पडतांचि गांठ झाले समर-चमत्कार फार न वदवती । १० ॥
लिहितां सरस्वतीच्या सरतिल शत-कलश-सदृश नव दवती ॥
वाटे तुमचा उरविल कृष्णांचे जीव न स्थविर तात ॥
दिसले शरांत ते न-ग कल्पांबुधि-जीवन-स्थ विरतात ॥ २९ ॥
शांतनव सिंह गमला पळतां नर-रथ हि तो पळ ससाच ॥
से-सग्न प्रभुहि वसंतीं ऋतु फुलला होय हो पळस साच ॥ ३० ॥
जों जों हाणी खर शर तो रिपु-यवस-दव तारकोपाया ॥
तों तों लागे हळुहळु कमला-धव-सदवतार कोपाया ॥ ३१ ॥
जो मातृ-स्नेहाचा चित्तीं स्नेहें निजें विसर घेली ॥
तो भीष्मावरि कोपे स्वें-मधु-हरा-उपरि जेविं सैरवाली ॥ ३२ ॥
चक्र करीं धरुनि रथा-खालें टाकुनि उडीस जंव धांवे ॥
वाटे त्या सिंहानें सर्वहि भीष्मादि ते गज वधावे ॥ ३३ ॥
धांवुनि यत्नें धरि परि वोढुनि नें देव त्यैासि वोढक-सा ॥
जाणों ह्मणे भुज-बळें पाहूं जरि वोढिनोसि वोढ कसा ॥ ३४ ॥
कर जोडुनि भीष्म ह्मणे येतां मारावयासि या हो या ॥
हा मत्य-संध केला मुक्तहि माझुंमि गावया होया ॥ ३५ ॥
केला उभा सितार्श्वे चरणीं घालुनि सिटी पदीं देशमीं ॥
प्रभु तत्त्व असें कळवी कीं प्रेम-बळेंचि पद-नता वश मी ॥ ३६ ॥
पाय धरुनि पार्थ ह्मणे त्यागुनि धन काय जीप्रति ज्ञातें- ॥
बहु जपले तद्गुरुंनीं त्यागावी काय जी प्रतिज्ञा ते ॥ ३७ ॥
या दासाकरवींच क्षिप्र तुह्मी या यशास करवाल ॥

१ अर्जुन. २ इंद्र. अर्जुनानें अग्नीस खांडव–वन जाळावयास दिलें, तेव्हां इंद्राचें व अर्जुनाचें युद्ध झालें अशी कथा आहे. ३ वृद्ध–भीष्म. ४ कृष्णार्जुन. ५ कल्प + अंबुधि + जीवन + स्थ–प्रलयकालच्या समुद्राच्या पाण्यांतील. ६ अर्जुन व कृष्ण ह्यांस भीष्माचे सकळ बाण लागून त्यांच्या अंगांतून रक्त वाहूं लागलें असतां ते फुललेल्या पळसासारखे दिसूं लागले. ७ शत्रुरूप तृणास वणवाच. ८ तारणारा उपायच जो ( कृष्ण ) त्यास. ९ लक्ष्मीचा पति जो विष्णु त्याचा पूर्ण लक्षणाचा अवतार–विष्णूचा कृष्ण हा पूर्ण अवतार मानिला आहे. १० पाडतो. ११ आपला मध हरण करणाऱ्यावर. १२ मधमाशांचा थवा. १३ अर्जुनास. १४ दहाव्या पावलीं.

.. त्या काढावा कशास करवाल ॥ ३८ ॥
.. पृथा-पुत्रोक्ति अ-मान्य कां करील हरी ॥
री जें अमृत-रसाची न तें करी लहरी ॥ ३९ ॥
..हु काय वदों राया तिसऱ्या दिवसाचिया चरमयामीं ॥
भूमि-तळा मांस-मया देखत होतों नभा शर-मया मी ॥ ४० ॥
भीष्मासि ह्मणे राजा व्हावी ऐसी रणांत मदवस्था ॥
झाला मला सु-दुः-सह हा ऐसा होय ताप न देव-स्था ॥ ४१ ॥
शिरला भीम व्यूहीं जेविं अज-कुळांत लांडगा शिरतो ॥
दैवेंचि रक्षिलें मज कापित होताचि दांडगा शिर तो ॥ ४२ ॥
या तुमच्या पावाल्या दुर्बल-सेनां-समान वध सेना ॥
हें झाल्या कां स्वर्गी जोडुनि एनास मानव धसेना ॥ ४३ ॥
झालीं युद्धें शत-शः सर्व-प्रेक्षक-मनो-हरें स-रसें ॥
होय रणांगण रक्तोत्पल-वन-चित-पद्मराग-भू-सर-सें ॥ ४४ ॥
भीष्म ग्रीष्म-तरणि-सा अर्जुन हेमंत-तरणि-सा गमला ॥
देव ह्मणे बहु आला वृद्धाहुनि जिष्णुचाचि राग मला ॥ ४५ ॥
हो शूर दूर ओसर ह्मणणार महा-प्रभाव हा रविला ॥
हार विलासि-जनेंसा येणें कैसा प्र-भाव हारविला ॥ ४६ ॥
झाला धीर परि परि-म्लान सखा जाति-पुष्प-गुच्छक-सा ॥
तुच्छ कसा हा प्र-वया निरडिल भलता अहींद्र-पुच्छ कसा ॥ ४७ ॥
हा पांडवांसि भस्मचि करिल उपेक्षा करूं नये याची ॥
पदरीं अ-कीर्ति आश्रित-सुहृदनवन-पथ करून येयाची ॥ ४८ ॥
आणुनि मनीं असें ज्या धन्य ह्मणति सर्व विप्र तो दास- ॥
भीष्म वधाया धांवे हरि हस्तें कवळुनि प्रतोदास ॥ ४९ ॥

---

१ वणव्यांत सांपडलेल्यास. २ तांबड्या कमलांच्या समुदायानें युक्त व माणकांची ज्यास जमीन आहे अशा सरोवरासारखे सर्व रणभूमीवर रक्ताचे प्रवाह वाहूं लागले, व त्यांत मनुष्यांचीं मस्तकें ( तोडिलेलीं ) तरंगत होतीं, हें तात्पर्य. ३ हा शूर ( व ) महाप्रभाव ( अर्जुन ) हो दूर, ( ओसर असें ) रविला ह्मणणार, ( त्या ) येणें ( ह्या अर्जुनानें ) विलासिजनें हारसा, प्रभाव कैसा हारविला; हा अन्वय. ४ आश्रित व मित्र ह्यांचें संरक्षण न करण्याचा मार्ग स्वीकारून. ५ यावयाची.

देव रथातें सोडुनि धांवे देवापगा-विलापार्थ ॥
कीं दुस्तरारि-सागरिं न बुडो कांसेसि लाविला पार्थ ॥ ९० ॥
पार्था-प्रति प्रयत्नें तो बळ-कारुण्य-सिंधु राखाया ॥
क्रोधें गर्जत धांवे सिंह जसा मत्त-सिंधुरा खाया ॥ ९१ ॥
"एह्येहि देव-देव श्री-कृष्ण नमोऽस्तु ते" असें बोले ॥
बोले गद्गद प्राज्य-प्रेमाश्रु-भरें करूनियां डोले ॥ ९२ ॥
भीष्म ह्मणे त्वद्धस्तें व्हाया समरांत शांत नवसा जो- ॥
होता करीत, तो हा जेविं हरि-हतेभ शांतनव साजो ॥ ९३ ॥
जरि मारिसील मज गति-लाभ, तुजहि कीर्ति-लाभ गुरु-तर तो ॥
विश्व-गुरो प्राकृतही तारुनि शरणागतासि गुरु तरतो ॥ ९४ ॥
तूं हरि-सा हरि साचा हरिणी सुर-सिंधु मीहि पाडस-सा ॥
पाड, स-मात्सर हो अरि, हरिशीं पावेल काय पाड ससा ॥ ९५ ॥
ब्रह्मांड भस्म व्हावें ज्याच्या दर-रक्त-चक्षुच्या पातें ॥
तो तूं अंगें मारूं पाहसि मज दावुनि प्र-तापातें ॥ ९६ ॥
आलों धन्य त्रि-जगीं भास पळ प्राकृतास मारक-सा ॥
त्या प्रभुनें हो केला भस्म स्वातिक्रमेच्छु मार कसा ॥ ९७ ॥
धांवुनि धरी धनंजय मागुनि त्या मा-धवासि बाहूंनीं ॥
मग दृढ चरणींच मिठी घाली पहिलीच रीति पाहूनी ॥ ९८ ॥
दूर उसळत्या तेव्हां कोपावेशें मुकुंद कंदुक-सा ॥
राहे उभा प्रभु गमे इभ-सा धृत-चरण भक्त अंदुक-सा ॥ ९९ ॥
पार्थ ह्मणे श्री-धर्मा-वरि धरितिल जे असि-प्रति ज्ञाती- ॥
मरतील, त्यजसी कां आयुध न धरिन असि प्रतिज्ञा ती ॥ ६० ॥
मारिन भीष्मातें मी इतरांतेंही भवद्दयाधारें ॥
बा त्वत्प्रसाद ज्यावरि केवळ मेर्वग्रही तया धारें ॥ ६१ ॥

१ (देव + आपगा + विलाप + अर्थ) गंगेला पुत्राच्या मरणानें विलाप करावयास लावावें ह्मणून. २ (दुस्तर + अरि + सागरिं) तरण्यास कठिन अशा शत्रुरूप समुद्रांत. ३ एहि एहि (ये ये) ते नमः अस्तु (तुला नमस्कार असो). ४ मृत. ५ (हरि + हत + इभ) सिंहानें मारिलेला हत्ती. ६ मार. ७ किंचित् डोळे लाल करून पाहिलें असतां. ८ महादेवानें. ९ आपली अमर्यादा करण्यास इच्छिणारा. १० (भवत् + दया + आधारें) तुझ्या कृपेच्या आश्रयानें. ११ (मेरु + अग्र) मेरु-पर्वताचें शिखरहि.

कुरु-कुंजरासि गेला होता यदु-सिंह तो खरा खाया ॥
परते पर तेथूनि प्राण-प्रिय-मित्र-तोख राखाया ॥ ६२ ॥
कृष्ण स्व-रथीं चढतां समर-चमत्कार मग नवा तातें- ॥
दाखविला, वाहों दे न शर-व्रज-पूर्ण गगन वातातें ॥ ६३ ॥
भीष्म-शर-व्रज-दावचि पांडव-भट-निकर तो गमे घास ॥
क्षण सोसवे न कोणासहि जैसा वायु-वेग मेघास ॥ ६४ ॥
जेविं महा-वात करी अभ्रांचा न लगतां पळ विसकट ॥
त्वत्तात-शर-व्रात ध्वंमुनि सर्वांसही पळवि सकट ॥ ६५ ॥
बहु वधिले उरले जे ते केले बाहु-ज-प पराभूत ॥
पाहों शकले न जसे श्री-नर-हरि-मंत्र-जप-परा भूत ॥ ६६ ॥
तों मावळला दिन-कर होय बहु प्रास साध्वस, मग तिहीं- ॥
केला अवहार परि-श्रांतांहीं लंघिताध्व-सम-गतिहीं ॥ ६७ ॥

---

## द्रोण-पर्वांतील युद्ध-प्रकरणीं.

( म० भा० अ० १६-८४; मोरोपंत अ० १-१० ).

भीष्म शरपंजरीं पडल्यावर दुर्योधनानें द्रोणाचार्यांस सेनापति केलें. त्यानें धृष्टद्युम्न आपल्यास मारण्याकरितांच उत्पन्न केला आहे असें जाणून त्याला मात्र मी मारणार नाहीं असें दुर्योधनाजवळ कबूल केलें होतें. द्रोणाचार्यांनें व पांडवांनें युद्ध चाललें असतां चक्रव्यूह नांवाचा व्यूह द्रोणानें रचिला. त्या व्यूहाचा भेद करण्याकरितां अर्जुनाचा मुलगा अभिमन्यु हा झटत होता. त्यानें पुष्कळ पराक्रम केला परंतु शेवटीं दुःशासनाच्या मुलानें त्याच्या मस्तकावर तो सावध नसतां गदा घालून त्यास मारून टाकिलें. पुढें धृष्टद्युम्नानेंहि द्रोणास अन्यायानेंच मारिलें. इत्यादि कथा या आख्यानांत आहे.

भीष्म पडतांचि गेले सर्वांचेही पळांत आवांके ॥
नसतां धुरंधर वृषभ बाळ-वृष भरें करूनि आ वांके ॥ १ ॥

---

१ हे धृतराष्ट्रा तुझा जो तात ( बापासारखा ) त्याच्या बाणांचा समुदाय. ( भीष्म हा धृतराष्ट्राचा चुलता होता ). २ क्षत्रियश्रेष्ठ. ३ पसरलेल्या सैन्याचें एकीकरण. ४ लांबून चालून आलेल्या मनुष्याप्रमाणें ज्यांची ( मंद ) गती आहे अशा.

रवि-रुचिनें तीमार्गे संपादे स्वल्प काज वातीस ॥
विसरविल काय ? तेज प्रकट करुनि अल्प काजवा तीस ॥ २ ॥
कुरु-राज ह्मणे गुरुजी सेना-पति शत्रु-बळ-विरामा व्हा ॥
तुमची आव्हा पळवू अ-हित-मदा जेविं पळवि रामाव्हा ॥ ३ ॥
द्रोण ह्मणे सेना-पति होतों, ह्मणतोस जरि; परि स्पष्ट- ॥
धृष्टद्युम्नासि न मी वधिन, करीन त्वदर्थ बहु कष्ट ॥ ४ ॥
मी समर पांडवांसीं करिन हरिन अरि-नराधि-पति-कटकें ॥
भट केविं टिकेल इतर गरुड निरखिजेल काय गा चटकें ॥ ५ ॥
गुरु-रथ-वेग अ-सह्यचि झाला त्या विष्णु-पत्र-रथ-वेगा ॥
केला पांच दिवस बहु युद्ध-चमत्कार तो न कथवे गा ॥ ६ ॥
धृष्टद्युम्नें वधिला अ-न्यायें, सकळ सैन्य हळहळतें ॥
गुरु-मरण तसें देतें जैसें दे मोह दैन्य हळहळ तें ॥ ७ ॥
धृतराष्ट्र विलाप करी बहु आपण आपणासि निंदुनि घे ॥
स्मृति हरपे, कंपेचि न तन्नयनांतुनि अश्रु-बिंदु निघे ॥ ८ ॥
बहु जन बुडवुनि शोकीं दुष्टा दुर्योधना बुडालास ॥
मकरालय लंघाया मत्ता मशाका कसा उडालास ॥ ९ ॥
गज गोष्पदीं बुडाला हा दैवा सिंधु शोषिला मशकें ॥
न शकें सोसाया हें वधिला तो केसरी कसा शशकें ॥ १० ॥
मी माझें हें घातक लागो या आजि आग मोहाला ॥
न मनांत अहं-ममताभ्यधिका लोकांचिया गमो हाला ॥ ११ ॥
सांग रण-कथा, काढिल नसतां मनिं मोह काय बाप रडें ॥
वांकेल ताजव्याचें भारावांचोनि काय बा पारडें ॥ १२ ॥
संजय ह्मणे नृपा मन लावूनि अ-नश्वरीं सुखीं न रडें ॥
हो सावध काळानें जों नाहीं घातलें मुखीं नरडें ॥ १३ ॥

१ सूर्याच्या कांतीला. २ शत्रूच्या सैन्याच्या नाशाकरितां, अथवा ( नाश करणाऱ्या ) हें संबोधन समजावें. ३ धृष्टद्युम्न हा आपल्या वधार्थ उत्पन्न झाला आहे, असें द्रोणास माहीत होतें. ( भार. द्रो. प. अ. ७ ). ४ शत्रूकडील राजांचीं सैन्यें. ५ विष्णूच्या पक्ष्याच्या ( गरुडाच्या ) वेगास. ६ विष. ७ ह्याचा कर्ता अश्रुबिंदु. ८ (मकर + आलय) समुद्र. ९ गाईच्या उमटलेल्या पावलाच्या पाण्यांत. १० अहंता व ममता. ११ (अहं + मम + ता + अभि + अधिका ) अहंता व ममता ह्यांपेक्षां अधिक ( मोहक ). १२ अक्षय सुखाकडे मन लावून ह्मणजे मोक्षसुख प्राप्त करून देण्याऱ्या मार्गाकडे मन वळवून.

पुत्राप्त-राज्य-मोहें होय जरि तुज व्यथा परि सराया ॥
मोह श्रोत्यांचा मी कथिन [1]गुरु-वरें कथा, परिस राया ॥ १४ ॥
आह्मां अर्जुन-पालित-धर्म-नृप-बलाकडे पहावेना ॥
त्या पांडवांहि कुरु-गुरु-रक्षित-कटक-प्र-भा सहावेना ॥ १५ ॥
भट गांठिती भटांतें अहि अहितें जेविं पतग पतगातें ॥
कीं हरि हरितें अत्यद्भुत होय द्वंद्व-युद्ध-शत गा तें ॥ १६ ॥
करिते झाले युद्ध क्रुद्ध शरभ-सिंह-देव-दानवसे ॥
मानवसे गमले न स्नेह कणहि तन्मनीं तदा न वसे ॥ १७ ॥
रविला झांकी गगनीं कुरु-गुरु बहु-शर भरीं [2]तिमिर विखरी ॥
लीलेनें [3]नर-केसरि लक्ष चिरी, शरभ-रीति मिरवि खरी ॥ १८ ॥
धर्माला गांठाया धांवे तो [4]विप्र कटक विसकटुन ॥
वाटे तदेक-विशिखाहुनि [5]सिंधु-ज-गरल-घट कविस कटु न ॥ १९ ॥
रक्त-नदी वाहविली राया त्या [6]शत्रु-सिंह-शरभानें ॥
केवळ कुरु-कटकाचीं [7]हरिलीं विखरुनि अनंत-शरभानें ॥ २० ॥
पार्थाचा प्रलय-घनाधिक दारुण देवदत्त दर वाजे ॥
दरवाजे-से डोळे झांकिति आइकति भीति-द रवा जे ॥ २१ ॥
शर्मा रथ धर्मा धनु बाहु भ्राते [8]सु-पूर्व पांच विती ॥
[9]ज्या त्यांशि [10]पूतनाशी विजय-विशिख-वृष्टि पळ न वांचवि ती ॥ २२ ॥
वेष्टा [11]धनंजयाला आत्म-यशें [12]सत्यपांड वेष्टाया ॥
चेष्टा करूं न द्याव्या गोपाला सत्य [13]पांडवेष्टा या ॥ २३ ॥
[14]संशप्तकां नर जसा नर-हरि मारी वि-शृंखळ खळातें ॥
होय असृक्स्रोतः-शत, वाहे समराजिरीं खळखळा तें ॥ २४ ॥
अरि-कदन जसें अर्जुन कुरु-गुरुहि तसेंचि वीर-कदन करी ॥

---

१ व्यासाच्या प्रसादानें. २ अंधार पाडी. ३ मोठे वीर—हें चिरी ह्याचें कर्म. ४ ब्राह्मण (द्रोण). ५ समुद्रांतून निघालेला विषाचा कलश. ६ (शत्रुरूप सिंहाला शरभाप्रमाणें असणाऱ्यानें) अर्जुनानें. ७ त्यांस मूर्छा आणिली. ८ 'सु' आहे आद्यक्षर ज्यांचें असे म्हणजे सुशर्मा; सुरथ, सुधर्मा, सुधनु व सुबाहु. ९ ज्या बाणांस. १० पूतनाराक्षसीप्रमाणें. ११ हें संशप्तकांचें भाषण आहे. १२ (सत्य + प + अंड) ब्रह्मांड. १३ (पांडव + इष्ट) पांडवांस इष्ट असणाऱ्या. १४ त्रिगर्त देशाचा राजा सुशर्मा व त्याचे अनुयायी ह्या सर्वांनीं युद्धांत अर्जुनास मारूं किंवा आपण मरूं, अशी प्रतिज्ञा केली होती, ह्मणून त्यांस एथें संशप्तक ही संज्ञा दिली आहे.

मिरवी तयापुढें भट जेविं हरिपुढें बलीहि मद न करी ॥ २५ ॥
कौंतेय[1] गांठिला रण-रंगीं नटउनि महा-भट कबंध ॥
जैसा जल-द समीरें तैसा विसकटुनियां कटक-बंध ॥ २६ ॥
धीर धरुनि धर्म-ज्ञें धीरें धर्में धनुष्य चढवीलें ॥
दाखविलें तें गुरुला जें होतें आपणासि पढवीलें ॥ २७ ॥
भीमावरि न गणुनि शर-वृष्टीची झड करी करी[2] लगट ॥
वाटे जनासि काळचि तो त्याला झडकरी करील गट ॥ २८ ॥
कुरु-कटका तप्त करी पार्थ, ग्रीष्मीं जसा पतंग जगा ॥
तों प्रेरिला तयावरि भगदत्तें काळसा मतंगज गा ॥ २९ ॥
देव गजासि[4] ह्मणे रे गर्व अयः-स्तंभ-सम-रदा[5] न वहा[6] ॥
हा[7] मत्सख नर सिंहचि वज्र-धरासह्य-समर[8] दानव-हा[9] ॥ ३० ॥
होय पुढेंचि न मागें पार्थ-शराहत[10]हि शत-मख-सख[11] सरे ॥
मुनि ह्मणति अर्जुनीं तव शक्ति जसी सागरांत खसखस रे ॥ ३१ ॥
प्रकट करूं दे समरीं श्री-देवी जेविं सैरिभास[12] कला[13] ॥
तेविं विजय चाप-लता[14] मग दवडी दूर वैरि-भा[15] सकला ॥ ३२ ॥
विजय-विशिखार्त[16] होतां पूर्वी दुष्करहि आयकोन करी[17] ॥
भगदत्ताचें कथिलें अ-धनाचें जेविं बायको न करी ॥ ३३ ॥
तिसरे दिवशीं चक्र-व्यूह सु-दुर्भेद्य युक्तिनें रचिला ॥
जो धीर-वीर-हीर-प्रवर-प्रकरें करोनियां खचिला ॥ ३४ ॥
व्यूहातें भेदाया धर्म झटे करुनि यत्न सानुजनी[18] ॥
परि लोपवि प्रतापा गुरु तपना जेविं रत्न-सानु[19] जनीं ॥ ३५ ॥

१ कुंतीचा मुलगा—धर्म. गांठिला याचा कर्ता द्रोणानें ( अध्याहृत ). २ भगदत्तानें भीमाच्या अंगावर घातलेला **सुप्रतीक** नांवाचा हत्ती. ३ कौरवांकडील एक योद्धा (राजा). ४ (भगदत्ताच्या) हत्तीला. ५ लोखंडाच्या खांबासारखे आहेत दांत ज्याचे अशा. ६ वाहूं नको, ( याचें कर्म गर्व ). ७ हा अर्जुन. ८ इंद्राला (ही) असह्य आहे युद्ध ज्याचें असा, ह्मणजे इंद्रापेक्षां बलिष्ठ. ९ दानवांस मारणारा. १० अर्जुनाच्या बाणांनीं विद्ध. ११ इंद्राचा सखा (भगदत्त). १२ महिषासुरास. १३ युद्धचातुर्य. १४ अर्जुनाचें धनुष्य. १५ शत्रूंचें तेज. १६ अर्जुनाच्या बाणांनीं पीडित. १७ भगदत्ताचा हत्ती भगदत्तानें सांगितलेली दुर्घटहि गोष्ट पूर्वी ऐकत होता; परंतु जखमी झाल्यावर त्यानें सांगितलेलें ऐकेनासा झाला. दरिद्राची बायको जशी त्याची आज्ञा मानित नाहीं, तसा. १८ आपल्या धाकट्या भावांसह. १९ मेरुपर्वत.

सौभद्र ह्मणे शिरतों व्यूहीं, डोहीं नसा मतंगज, वा ॥
हरि-पोत दंति-यूथीं, कीं दहनीं करुनियां पतंग जवा ॥ ३६ ॥
भीमादि स-बळ सर्वहि ते उठले व्यूह-कोट फोडाया ॥
इकडुनि कौरव-कटकहि होय पुढें शत्रु-सैन्य मोडाया ॥ ३७ ॥
रथ थडकले, भडकले हय, शस्त्र-ज वह्नि धडकले वरते ॥
अन्योन्य द्व्यंगुलही राहों देती न धड कलेवर ते ॥ ३८ ॥
पावत असतां दोन्ही करुनि सु-तुमुलाहवास वध सेना ॥
व्यूहीं सौभद्र शिरे चित्तें हि जयांत वासव धसेना ॥ ३९ ॥
प्रभुचा मर्मी हाणी सर्वांसहि तीन तीन शर भाचा ॥
वाटे बहु सिंहांशीं समर करी कुपित पोत शरभाचा ॥ ४० ॥
अंध ह्मणे रे संजय हें त्या पौत्रास वर्ष सोळावें ॥
लोळावें मांडीवरि तेणें द्रोणादिकांसि घोळावें ॥ ४१ ॥
न पवे सु-नीतिचें परमार्थाची वाट लेंकरुं काय ! ॥
सत्यचि कथिशी परि हें मज लटिकें वाटलें करूं काय ॥ ४२ ॥
संजय ह्मणे ह्मण अ-नृत भीष्माचा एकला पणतु मुलगा ॥
करिता झाला गुह-सा बहुतांनीं वेढिला रण तुमुल गा ॥ ४३ ॥
कुरु-सैन्यांत गमे ज्यापरि रंभा-काननांत वारा हो ॥
त्या विजय-श्री देउनि परिरंभा कां न नातवा राहो ॥ ४४ ॥
अ-क्षत-धनु तोंवरि हें वीर शिरो-रत्न नावरायाचें ॥
यास्तव सर्वहि रक्षूं आजि करुनि यत्न नांव रायाचें ॥ ४५ ॥
कर्ण करी चर्माचे श्रित-विघ्नाचे जसे गण-प टुकडे ॥
तरि पाहोंहि न शकले वीर वि-शस्त्राहि त्या रण-पटु-कडे ॥ ४६ ॥
त्या सौभद्रावरि बळ-सागर गरगर गदेसि फिरवीत ॥
दुःशासन-सुत धांवे निज-भुज-भुज-ग-प्रताप मिरवीत ॥ ४७ ॥
युद्ध-चमत्कार रुचिर सु-चिर प्रकटुनि महा-गद भ्राते ॥

---

१ सुभद्रेचा मुलगा-अभिमन्यु. २ दोन बोटें. ३ अत्यंत दारुण युद्धाला. ४ श्रीकृष्णाचा भाचा अभिमन्यु. ५ **सुनीति** नांवाच्या स्त्रीचा मुलगा **ध्रुव**. ६ केळींच्या वनांत. ७ त्या नातवा ( अभिमन्यूला ) विजयश्री परिरंभा देऊन कां न राहो ? ह्मणजे त्यास जय कां नाहीं मिळणार ? ८ गणपाते. ९ आपल्या बाहूंची सर्पाप्रमाणें चपलता दाखवीत. १० हा शब्द एथें ' प्रकटवून ' ह्याबद्दल घातला आहे. ११ गदायुद्धांत प्रवीण. १२ दुःशासनाचा पुत्र व अभिमन्यु.

अन्योन्य-कृताघातें बा मूर्छा पावले अ-दभ्रा ते ॥ ४८ ॥
आधीं उठोनि उठतां सौभद्र शिरीं प्रेमो गदा घाली ॥
वि-वेश करी ती दुष्परि-हार्या जेविं प्र-भोग-दावाली ॥ ४९ ॥
पडली जशी कराया प्रेक्षक सुर वि-रस मस्तकोपरि ती ॥
भूवरि सौभद्र-तनुहि ओकुनि स-रुधिर समस्त कोप रिती ॥ ५० ॥
धर्म ह्मणे हा हा म्यां मंदें दाटुनि कुमार मारविला ॥
बहु-वीर-सूत दिसल्या अधिक सुभद्रा उमा रमा रविला ॥ ५१ ॥
तुज उत्तरें मुलि दिला म्यां कापायास मान विश्वास ॥
कलि-काल काय बुडविल मज बहु-पापा-समान विश्वास ॥ ५२ ॥
संशप्तक वधुनि विजय सांजे शिबिरासि यावया परते ॥
प्रभुसि ह्मणे कां कांपे मन कांपविले जरि स्वयें पर ते ॥ ५३ ॥
कंठ गहिंवरें भरला, शिरली हृदयांत केशवा धडकी ॥
येतें रडें वृथा कां बा माझी प्रकृति काय गा रडकी ॥ ५४ ॥
अ-तुल प्र-ताप लोकीं ज्या सैंल-बल-जलधि-वाडवाभाचा ॥
तो कृष्णा आज तुझा मज आला कां न आडवा भाचा ॥ ५५ ॥
शिबिरीं शिरोनि विजयें धर्मादिक देखिले अधो-वदन ॥
तें पुत्र-रत्न एकचि न निरखिलें सद्गुणर्द्धिचें सदन ॥ ५६ ॥
मृदुल-प्रकृति न साहे सुत-शोका जेविं न रविला पाला ॥
शिबिरीं करी परोपरि नारायण-मित्र नर विलापाला ॥ ५७ ॥
ज्याचा शस्त्रीं शास्त्रीं व्यवहारीं वासुदेव-वत् समज ॥
काय तुह्मीं केला हो आणुनि तो भेटवाचि वत्स मज ॥ ५८ ॥
बहुधा तुह्मीं धरुनि गुरु-कृत-चक्र-व्यूह-भेद-कामातें ॥
केलाचि पुढें नाहीं तरि करिता स्पर्श खेद कां मातें ॥ ५९ ॥

१ पुष्कळ वेळ असणारी—मोठी. २ हे धृतराष्ट्रा. ३ मूर्च्छित. ४ (प्र + भोग + द + अघ + आली ) अतिशय दुःख देणारी पातकपंक्ति. ५ सूर्य हा जगच्चक्षु आहे, ह्मणून त्यास दिसल्या, ह्मणजे सर्व जगास दिसल्या हें तात्पर्य. ६ अन्वय–कलिकाल ( कलियुग ) (अधर्मप्रवृत्तीनें जगताचा मोठा नाश करणारा आहे, तरी तो ) मज बहुपापासमान ( मी जो परम पापी हा जितका बुडवील तितका) विश्वास ( जगतास ) बुडवील काय ? ७ शत्रु-सैन्यरूप समुद्राला वडवाग्नीसारखें तेज आहे ज्याचें अशाचा. ८ उत्तम गुणांच्या समृद्धीचें ह्मणजे पुष्कळ उत्तम गुणांचें. ९ कोंवळ्या मनाचा. १० द्रोणानें रचलेला चक्रव्यूह फोडण्याच्या इच्छेला.

तुमच्या भुज-शस्त्रांतें धिक् हा निः-सार हो खटाटोप ॥
शिर ज्या न रक्षवे तो कार्याचा काय ओखटा टोप ॥ ६० ॥
कुंतीस काय सांगूं कृष्णेला दाखवूं कसें वदन ॥
दुष्कर मला सुभद्रा-सांत्वन दुर्दर्श उत्तरा-सदन ॥ ६१ ॥
कां माझें उर न उले कवि पवि कीं ह्मणति तोक-शोकाला ॥
लोका लाजे मन कीं जावें यश हारवूनि ओकाला ॥ ६२ ॥
हा वत्सा रक्ताक्षा झाले त्वत्सु-गुण आजि घातक-से ॥
बा वाहिले परांचे तुजला हाणावयासि हात कसे ॥ ६३ ॥
मारिन जयद्रथ, करिन यश भुवनीं विशिख-जाल वितत रणीं ॥
हें न घडतां जळेन ज्वलनीं होतांचि [२]अस्तमित तरणी ॥ ६४ ॥
कृष्णोत्तरा-सुभद्रा-धेनूंच्या मथुनि मोह-यवनातें ॥
भवनातें येउनि तो प्रभु विजयाच्या करी [३]संमवनातें ॥ ६५ ॥
शयनीं निजोनि पाहे परमेश्वर परि न पळहि निज लागे ॥
चित्तीं चिंतेशि ह्मणे त्वां वैरिला कोण जडहि [४]निजला गे ॥ ६६ ॥
धर्म ह्मणे जें झालें तें कथितों सर्व ऐक बा ज्ञात्या ॥
[५]त्यां व्यूहीं द्वार करीं ऐशी केली स्वयेंचि आज्ञा त्या ॥ ६७ ॥
द्वार करी, शिरतां भी न व्यूहा जेविं सागरा मकर ॥
नुरवी कुमार पर-मद लवहि जसा धरुनि राग राम-कर ॥ ६८ ॥
होय जयद्रथ आम्हां हेतु कुमारास अंतरायास ॥
त्यास न निवारवे बा जेविं प्र-बलास अंतरायास ॥ ६९ ॥
आम्हां त्या क्षुद्र-वरें रुद्र-वरें करुनि वारिलें वाटे ॥
प्रभुनें सौभद्रासि न पांचांसहि आजि मारिलें वाटे ॥ ७० ॥
देव निशीथीं शयनीं बैसे मग दारुकासि आणवुनी ॥
त्यासीं वदे प्रतिज्ञा पार्थाची प्रथम सर्व जाणवुनी ॥ ७१ ॥
भक्तीं जसा मदात्मा देहींहि तसा न दारुका रमला ॥

---

१ व्यर्थ. २ अस्त पावलेला. ३ ( सम् + अवन )–उत्तम रक्षण. अर्जुनाची प्रतिज्ञा शेवटास जाऊन त्याचें रक्षण कसें होतें ह्याचा विचार करूं लागला, हें तात्पर्य. ४ ज्यास चिंता लागली त्यास झोंप यावयाची नाहीं, हें तात्पर्य. ५ ह्या पुस्तकांतील जयद्रथकृत द्रौपदीहरण पहा.

या विजय-वेद-वचना[1] धावा लागे•सदा रुकार मला ॥ ७२ ॥
निज-रक्षणाधिक ध्वज-रक्षण राजासि दारुका पडतें ॥
मोलें राज-शिराहुनि बहु असतें काय दोरु[2] कोपड[2] तें ॥ ७३ ॥
देव ह्मणे अर्जुनजी व्हा सिद्ध रथ-स्थ तेपन-कोपार्थे[3] ॥
तें कां न ह्मणेल मनीं ब्रह्मपदाद्यर्थ[4] तप नको पार्थ ॥ ७४ ॥
करुनि प्रदक्षिणा द्विज-वृंदासि रथासि तो कविनयानें- ॥
मग वेंघोनि[5] अधिष्ठी, जनकांकीं जेविं तोक वि-नयानें ॥ ७५ ॥
झाला निज-दासाचा ज्या स्तविति सु-धीर विप्र तो दास ॥
श्री-नलिनीचा[6] चक्र त्यजुनि धरि सुधी रवि[6] प्रतोदास ॥ ७६ ॥
पांसु-निकरहि प्रभुच्या हेतु बहु-प्रीतिचा बुकासा च ॥
वाटे न कौस्तुभाला जपला जगदीश चाबुका साच ॥ ७७ ॥
कृष्ण रथीं चढले मग तोहि चढे पुत्र सैंत्यकाचा[7] हो ॥
जेविं हर-रथीं विधि हरि दुसरा दृष्टांत सत्य काचा हो ॥ ७८ ॥
द्रोणें रचिला सैंधव[8]-रक्षार्थ व्यूह-नायक व्यूह ॥
परमार्थ[9]-रक्षण-क्षम अ-परा-जित[10] जेविं काय कव्यूह[11] ॥ ७९ ॥
सेनाग्रीं वाजविती नर-नारायण सखे दर-वरा जे ॥
ते मोर-से, भुजग-से ऐकति होउनि स-खेद रव राजे ॥ ८० ॥
रोमांच-कंचुकाला कडकडतां कृष्ण-कंबु कंपि[12] ल्याला ॥
पर सोडी भानाला सिंह-रवें जेविं जंबुक पिल्याला ॥ ८१ ॥
हांसोनि द्रोण ह्मणे पार्था मजला न जिंकितां आजी ॥
जिंकावया जयद्रथ शक्य नव्हे मज-सवें करीं आजी[13] ॥ ८२ ॥
ऐसें वदोनि मार्गण-वृष्टि तयावरि महा-तपा सोडी ॥
जैसी आटोपाया मत्त-गज-शिरीं महात पासोडी ॥ ८३ ॥
मारुति सात्यकि धृष्टद्युम्न तसे कुरु-बळासि तुडवीती ॥

१ वेदवाक्य जसें उल्लंघितां येत नाहीं तसें अर्जुन जें ह्मणतो तें मला मोडतां येत नाहीं, हा आशय. २ ध्वजाचें लाकूड व वस्त्र. ३ सूर्यास राग आणावा ह्मणून; ह्मणजे तूं सूर्यापेक्षां तेजस्वी दिसलास ह्मणजे त्यास राग येईल. ४ ( ब्रह्म + पद + आदि + अर्थ ) सत्यलोकादिकांच्या प्राप्त्यर्थ. ५ बसे. ६ श्री ( लक्ष्मी ) हीच कमलिनी, तिला रविच ( कृष्ण ). ७ सात्यकि. ८ सिंधु देशाचा राजा ( जयद्रथ ). ९ सुरस अर्थ अथवा मोक्ष ह्यास राखण्याविषयीं समर्थ. १० अबाध—सर्वांस मान्य. ११ ( कवि + ऊह ) कवीची कल्पना. १२ मारुति. १३ युद्ध.

कु-नृपति-राष्ट्रांसि जसे दुष्काळ व्याधि चोर बुडवीती ॥ ८४ ॥
द्रोण न थोरे क्षण पर-कटकांत जसा[1] न रुद्ध थारावा ॥
तच्चाप-रवा पांडव भीति जसे अहि [2]गेरुद्रथारावा ॥ ८५ ॥
इषुनीं झांकुनि नेती ते करुनि छत्र-केतु विध्वस्त ॥
तो [3]अ-प्रकाश त्यांचा आप्त-कुमुद-खेद-हेतु विध्वस्त ॥ ८६ ॥
अरि एक कोश पुढें [4]लक्षुनि ज्या ज्या शरा विजय सोडी-॥
कोश पुढें गेल्यावरि मागें तो तो तदीय शिर तोडी ॥ ८७ ॥
श्वश्रू-कर जेविं शिरे गेहिं जरी न ह्मणती सुना सरि ॥
व्यूहीं तेविं कुरु-चमु धिक्कारुनि तो [5]धरा-सुनासीर ॥ ८८ ॥
श्रमला जयद्रथाच्या जायासि न शक्त हा निकट कांहीं ॥
हें योजुनि वेढियला पार्थ करायासि हानि कटकांहीं ॥ ८९ ॥
त्या समयीं पार्थ ह्मणे देवा [6]संश्रित-शुभाकरा वाजी- ॥
श्रमले कीं श्रम-शमना घडिभरि तरि रथ उभा करावा जी ॥ ९० ॥
उतरे रथावरुनि नर पळवी कुरु-कटक कृत-पराभव तें ॥
करि निर्मनुष्य मंडल तो एक कोश आपणा-भवतें ॥ ९१ ॥
स्वस्थ-स्वांतें क्रीडे कुरु-बळ-पंक-ज-वनांत पार्थ-करी ॥
मंत्र-बळें सु-सरोवर निर्मुनि शर-गृह [7]अनातपार्थ करी ॥ ९२ ॥
शर जेविं किरण भवतें जें कौरव-कटक तोचि परि-वेष ॥
रविच कवि-मतें अर्जुन तेजें रूपेंहि, भिन्न परि वेष ॥ ९३ ॥
निः-शंक कुरु-बळीं नर जेविं हरि-शतावृतींहि शरभ वनीं ॥
पवीं शिवालयींसा शिरला देवर्षि शीघ्र [8]शर-भवनीं ॥ ९४ ॥
[9]प्रभुनें मुक्त करुनि हय चुचकारुनियां हळूच कौशल्यें ॥
निज-बोधें श्रित-हृद्गत-दुःखेंशीं सकळ काढिलीं शल्यें ॥ ९५ ॥

---

१ स्थिर झाला नाहीं ह्मणजे शत्रुसैन्यास अत्यंत दुःसह झाला; हें तात्पर्य. २ ( गरुद्रथ + आरावा ) गरुडाच्या शब्दास. ३ बाणांनीं झांकल्यामुळें त्यांचें अदर्शन, हें आप्तरूप कुमुदांच्या खेदास कारणभूत. ( विधु + अस्त )—चंद्रास्तच झाला. ४ अर्जुनाच्या रथाचा वेग इतका होता कीं, शत्रु एक कोसभर दूर असतां, त्याला मारण्याकरितां अर्जुन जो बाण सोडी तो त्या शत्रूचें शिर तोडित आहे तोंच तो रथ त्या शत्रूच्यापुढें एक कोसभर जाई. ५ पृथ्वीवरील इंद्रच ( अर्जुन ). ६ (संश्रित + शुभ + आकरा) आश्रितांच्या कल्याणाची खाणच—अशा देवा. ७ (अन् + आतप + अर्थ) ऊन न लागावें ह्मणून. ८ बाणांच्या गृहांत. ९ परमात्मस्वरूपज्ञानानें.

अश्व पर-शरांहीं भव-तापांहीं जेविं दास पोळविले ॥
ते देवें भक्ति-रसें जाणो स्व-चरण-रजांत लोळविले ॥ ९६ ॥
देवर्षि मुखीं घालुनि बोट ह्मणे हा सु-योधना कुटिला ॥
भक्ति-बळेंचि पहा हा परमेश्वर आजि अर्जुनें लुटिला ॥ ९७ ॥
ज्याचें पद-नख दासां जें सुख दे तापल्या न तें विधु तो- ॥
भगवान् स्वयें अहा या विजय-हयां सत्पदांस तेविं धुतो ॥ ९८ ॥
ज्याच्या श्री-पद-दास्यें पावे तोखा सदा रमा-जाया ॥
हरितो मना नराचा होउनि तो खासदार माजा या ॥ ९९ ॥
पुरुषार्थ-द ते केले दास-हय-हितोदया कर खरारे ॥
झालासि दास-दास प्रभुही तूं बा दया-कर खरा रे ॥ १०० ॥
प्रेमें माता बाळा न्हाणी कीं भक्त शंभुच्या लिंगा ॥
तैसाचि नर-हयां हरि कवि हो याचेचि पाय आलिंगा ॥ १०१ ॥
औषध सु-चकण कल्पी पीत-पट पसाहि तोबरा माप ॥
श्रित-साहित्य कराया न बरा मंदार तो बरा मा-प ॥ १०२ ॥
हरि हरित-तृणीं चारी तो प्रभु ज्याचा प्र-ताप दुर्वार ॥
हरि हरि तई करिति पद देउनि गणपति-शिरीं हि दुर्वा र ॥ १०३ ॥
तोक-तृपा-शमना कीं क्षाल्राया तात तोक-मळ पाणी- ॥
प्यायाचें ही वेंची, करि न पिउनि तेंचि तो कमल-पाणी ॥ १०४ ॥
उच्चैःश्रवा ह्मणावा पार्थाच्या कां न नीच तुरगांनीं ॥
ज्यां पूजी तो ज्याचें यश नंदन-काननीं चतुर-गानीं ॥ १०५ ॥
योजुनि तुरग-वर रथीं आपण कुरु-बळ पहात देव रिघे ॥
मग वि-जयानें मर्दुनि रडवाया खळ-प हात दे, वरि घे ॥ १०६ ॥

१ तो ( कृष्ण ) साधूंचे पाय धुवावे त्याप्रमाणें. २ नराचा ( अर्जुनाचा ) खासदार होऊन या माजा ( माझ्या ) मना हरितो ( हें नारदाचें ह्मणणें आहे ). ३ ( आपल्या ) दासाच्या घोड्यांच्या (हित + उदय) कल्याणासाठीं. ४ पीतपट ( पीतांबर ) हाच तोबरा, व पसा हेंच माप. ५ कल्पवृक्ष. ६ लक्ष्मीपति. ७ हे उद्गारबोधक शब्द. ८ र ( रुदन ). ९ कृष्ण. १० ज्या कृष्णाचें यश नंदनवनांत चतुरगानीं ( चतुरांच्या गायनांत ) आहे तो ( कृष्ण ) ज्यां पूजी ( ज्यांची सेवा करितो ) त्या तुरगांनीं इत्यादि. ११ महादुष्ट.

# कर्ण-पर्वांतील कर्णार्जुन-युद्धाच्या आर्या.

( म० भा० अ०३१-९१ मोरोपंत अ०२०-४९ )

**द्रोणाचार्य** मरण पावल्यावर **कर्ण** हा कौरवांच्या सैन्याचा सेनापति झाला. नंतर **कर्णानें दुर्योधनास** सांगितलें कीं जर **मद्र** देशाचा राजा **शल्य** हा माझें सारथ्य करील तर मी अर्जुनाचा समाचार घेईन. आज युद्धांत तो मला मारील किंवा मी त्याला मारीन. हें ऐकून **दुर्योधन** राजा शल्याच्या शिबिरांत गेला व कर्णाचा सारथि होण्याविषयीं त्यानें त्याची प्रार्थना केली. तें ऐकून शल्यास फार राग आला. परंतु दुर्योधनानें फारच विनवणी केल्यामुळें अखेरीस त्यानें मी कर्णाचें सारथ्य करितों असें कबूल केलें. परंतु माझी अट अशी आहे कीं मी कर्णास युद्धाच्या प्रसंगीं हवें तें बोलेन त्याचा राग त्यानें मानूं नये. अशा अटीलाहि कर्ण व दुर्योधन हे दोघे कबूल झाले. शल्यानें रथ तयार करून आणल्यावर त्यांत कर्ण बसून युद्धास गेला. युद्धाचे वेळीं शल्यानें कर्णाची फार निर्भत्सना करून त्याचा उत्साह भंग केला तरीहि त्यानें मोठें शौर्य केलें. सरतेशेवटीं रथाचें चाक पृथ्वींत गेलेलें वर उचलित असतां अर्जुनानें त्यास मारिलें अशी कथा या आख्यानांत दिलेली आहे.

कर्ण ह्मणे कुरु-नाथा पार्थाशीं संगरांगणामाजी ॥
घालीन गांठि त्यातें मी कीं मारील तो मला आजी ॥ १ ॥
कार्य-बहु-त्वा-साठीं गांठि न पडली तया-सवें मागें ॥
त्वां आह्मा दोघांचीं आजि पहावीं बळें महा-भागें ॥ २ ॥
मी जिष्णुतें न वधितां आजि न मागें फिरेन हे वाचा- ॥
साची असो, असावा निश्चयचि तुझा मनुष्य-देवाचा ॥ ३ ॥
अश्वाच्या हृदयाचा ज्ञाता कृष्णा-समान कौशल्य ॥
जाणतसे जरि माझें सारथ्य करील आजि हा **शल्य** ॥ ४ ॥
तरि मी धनंजयाधिक होइन तुज जय घडेल अ-भ्रांत ॥
मग मज पार्थांत[1] सु-कर जैसा क्षुब्धानिळासि अभ्रांत[2] ॥ ५ ॥
तेव्हां ह्मणे सु-योधन हें आहे सर्व सिद्ध मी आंगें- ॥
चालेन तुझ्या मागें मग भक्ताला अभीष्ट तें सांगें ॥ ६ ॥

---

१ ( पार्थ + अंत ) अर्जुनाचा वध. २ (अभ्र + अंत) मेघांचा नाश—ढग उडवून टाकणें.

ऐसें वदोनि गेला वि-नयें शल्या-समीप मग राजा ॥
प्रणयेंकरूनि त्यातें प्रार्थी साधावया महा-काजा ॥ ७ ॥
सत्य-व्रता समर्था मेद्राधीशा[1] महा-रथा साधो ॥
वंदूनि विनवितों बा तुझ्या प्रसादेंचि कार्य हें साधो ॥ ८ ॥
पदर पसरिला तुजला रिपु-गज-पंचानना नृपां-माजी ॥
व्हावें प्रसन्न मजला द्यावा वर एक याचका आजी ॥ ९ ॥
वर-दा त्वां कर्ण-वचन केलेंचि श्रवण सु-प्र-बुद्धातें ॥
स-फळ करीं पार्थाशीं व्हावा अंगेंद्रे[2] योग्य युद्धातें ॥ १० ॥
बा वासुदेव-सम तूं जाणसि सारथ्य-कर्म नर-नाथा ॥
तुजसम पटु अन्य नसे ह्मणवुनि मी ठेवितों पदीं माथा ॥ ११ ॥
ब्रह्मा[3] महेश्वराचा झाला कीं जेविं कृष्ण वि-जयाचा ॥
सारथि तूं कर्णाचा हो वर-दा हेतु मुख्य वि-जयाचा ॥ १२ ॥
तो कृष्ण संकटीं त्या पार्थातें रक्षितो यथा राया ॥
तूं कर्णातें रक्षीं हो सेतु स्व-यश-तोय थाराया ॥ १३ ॥
बल अल्प पांडवांचें परि त्यांहीं फार मार्दिलें सैन्य ॥
आतां निज-पक्षींचे दोघे योद्धे तुह्मी हरा दैन्य ॥ १४ ॥
अरुण रवीचा सारथि, दहनाचा वायु, यत्न कीं विधिचा, ॥
सारथि हो तूं तैसा कर्णाचा धैर्य-जळ-पयो-निधिचा ॥ १५ ॥
शल्य सु-योधन-वाक्यें कोपे, चोळी करें करा, डोळे- ॥
आ-रक्त करी, चावे अधरातें, फार तो मनीं पोळे ॥ १६ ॥
मग कुरु-राजासि ह्मणे राया अव-मानितोसि बाहूनी ॥
ह्मणसी सोडुनि धनु शर, धरिं हय-रश्मि प्रतोद बाहूंनीं ॥ १७ ॥
करिशी बहु प्रशंसा या नर-वर-मंडळांत कर्णाची ॥
सांगसि सारथ्याची पदवी मजलागिं हीन-वर्णाची ॥ १८ ॥
सिंहासनोचिताला मज सारथ्याधिकार हा नीच ॥
इच्छिसि नृपा कराया मत्तेजाची जनांत हानीच ॥ १९ ॥
युद्धीं दुर्बळ मी हें गमलें तुज ह्मणवुनीच भू-पा हें- ॥

१ (मद्र + अधीशा) मद्रदेशाच्या राजा (शल्या). २ अंगदेशाचा स्वामी—कर्ण.
३ शंकरानें जेव्हां त्रिपुरासुर मारिला तेव्हां ब्रह्मदेव त्याचा सारथी झाला होता, अशी कथा आहे.

सारथ्य योजिलें तरि दे दावुनि बेग, शक्ति तूं पाहें ॥ २० ॥
सांग मला भाग तया जिंकुनि जाईन आपुल्या देशा ॥
अथवा एकचि मी रिपु-बळ मर्दिन दे मला रणादेशा ॥ २१ ॥
हे दास, सूत, बंदी यांहीं आह्मां नृपांसि वाहावें ॥
सारथि होउनि उच्चें जो नीच रथी तदुक्त मानावें? ॥ २२ ॥
हो ह्मणसी सूताचा सूत भला गा भला मला पदवी- ॥
देसी, हे सीमा तव सु-ज्ञ-पणाचीच हें असें वदवी ॥ २३ ॥
जातों गृहासि झालों कृत-कृत्य प्राप्त मोक्ष-सम यज्ञ ॥
प्रेक्षुनि घालों कीं तूं धृतराष्ट्र-सुता गुण-ज्ञ समय-ज्ञ ॥ २४ ॥
ऐसें वदोनि मग नृ-प वीर-समाज त्यजूनि करि गमन ॥
आटोपेना त्याचें त्यासहि अप-मान-कोप-करि-ग मन ॥ २५ ॥
तेव्हां धांवे कुरु-वर दीर्घ दृढ प्रेम-बाहु-पाशातें ॥
पसरोनि शीघ्र कवळी नमुनि ह्मणे न करिं वंध्य आशांतें ॥ २६ ॥
शत्रूंच्या हृदयीं तूं शल्य ह्मणुनि शल्य ह्मणति तुज राया ॥
कुब्जेसि कृष्ण-सा तूं पटु मज्जय-सिद्धि-लागीं उजराया ॥ २७ ॥
बहु वि-क्रम कर्णाचा न्यून परा-क्रम तुझा असें न मनीं ॥
असतें जरि तरि माझें शिर होतें सिद्ध हें कसें नमनीं? ॥ २८ ॥
कर्णाहुनि मजहुनि तूं आधिक अधिक यादवाधिपाहूनी ॥
व्हावें प्रभो वर-प्र-द मज आजि पैरा-भवाधि पाहूनी ॥ २९ ॥
हय-हृदय कृष्ण जाणे त्याहुनि तूं द्वि-गुण जाणसी माम्या ॥
भुज-युद्धीं हि परिसिली न बळाची तुझिच आण सीमा म्यां ॥ ३० ॥
पार्थाधिक कर्ण तसा कृष्णाधिक तूं ह्मणूनि सारथि-ता ॥
स्व-गुण न लोपीं प्रगटीं, वरिली विधिनें हि शंभु-सारथि-ता ॥ ३१ ॥
शल्य ह्मणे राया मज राज-समूहांत हात जोडोनी- ॥
ह्मणसी कृष्णाधिक हें दुर्लभ यश जात नाहिं सोडोनी ॥ ३२ ॥
झालों प्रसन्न तुज मी वर देतों घे करीन सारथ्य ॥
पथ्य अ-पथ्य न ह्मणतां पारि सोसावें मदुक्त हें तथ्य ॥ ३३ ॥

---

१ नेमून दिलेलें काम. २ अपमानामुळें आलेला राग हाच हत्ती त्यावर बसलेलें. ३ चांगल्या दशेला आणण्याला. ४ (पराभव + आधि) पराभवापासून होणारें मनाला दुःख.

सारथि होतों परि मी प्रभु सूतातें[1] ह्मणे न कां हां जी ॥
गांजीन तरि सहावें, ह्मणिजे वैद्यें दिली सुधा कांजी ॥ ३४ ॥
कर्ण सु-योधन ह्मणती केलें मान्य त्वदुक्त बापा हें ॥
अंगी-कृत कार्याच्या निर्वाहीं सु-यश तूंहि बा पाहें ॥ ३५ ॥
शल्यें सारथ्याचा केला स्वीकार तेधवां यास- ॥
कुरु-पति कथि इतिहास त्रि-पुराचा चित्त हृष्टवायास[2] ॥ ३६ ॥
सूत-कुळांत न झाला मज वाटे देव-पुत्र हा कर्ण ॥
क्षत्र-कुळींच उपजला हें याचा स्पष्ट सूचवी वर्ण ॥ ३७ ॥
लोकांत प्रगट न हो कुल-कारण एक हेंचि सत्य जिला ॥
झाला तिनें उपजतां बाळपणीं करुनि साहस त्यजिला ॥ ३८ ॥
हा दीर्घ-भुज स-कुंडल-कवच उपजतांचि बाळ-भास्कर-सा ॥
प्रसवे न यासि राधा, प्रसवेल सुधाकरासि काय रसा ॥ ३९ ॥
अजि सिंधु-शुक्ति-गर्भी मौक्तिक उपजे, नदींतही असती- ॥
पुष्कळ शिपा तरि तीं त्यांच्या उदरीं न मौक्तिकें वसती ॥ ४० ॥
राधा धात्रीच गमे कर्णाच्या न जननी शरीरा या ॥
सांगा जी व्याघ्रासि प्रसवेल मृगी कधीं तरी राया ॥ ४१ ॥
हा प्राकृत पुरुष नव्हे सांगावें काय स्यां तुला कविला ॥
कर्णाच्या तेजें बहु वीरां-करवीं स्व-गर्व टाकविला ॥ ४२ ॥
सारथि होय पितामह रुद्राचा जेविं तूंहि कर्णाचा ॥
लाजों तुला सु-रथ-हय-गुण धरितां बंधुही[3] सु-पर्णाचा ॥ ४३ ॥
सारथि अधिक रथीहुनि असतांचि घडे जय प्रजा-पाळा ॥
पाळा कर्णासि तुह्मी घालू कंटांत कीर्ति मणि-माळा ॥ ४४ ॥
पार्थातें कृष्ण तसा कर्णातें तूंहि संगरीं रक्षीं ॥
त्वां मारुतें करावा कर्ण-वळाग्नि प्रदीप्त रिपु[4]-कक्षीं ॥ ४५ ॥
शल्य अवश्य ह्मणे तों कर्ण ह्मणे तूं यथोक्त रथ कल्पीं ॥
मद्र-पते निजवूं दे सत्वर भीमानुजासि शर-तल्पीं[5] ॥ ४६ ॥
शास्त्र-प्रोक्त-विधानें रथ कल्पुनि शीघ्र आणिला शल्यें ॥
जेविं मनोरथ साक्षात् केला देवेंचि सिद्ध वात्सल्यें ॥ ४७ ॥

१ सारथ्याच्या कुळांत झालेल्या कर्णास. २ आनंदित करण्याकरितां. ३ गरुडाचा भाऊ-अरुण. ४ शत्रुरूप तृणांत. ५ बाणांच्या आंथरुणावर निजवूं दे ह्मणजे मारूं दे.

शल्य बसे मग बैसे वैकर्तन[1] निज-रथीं जसा तरणी ॥
पाहुनि शोभा मानिति जन कीं केलाचि पार्थ-घात रणीं ॥ ४८ ॥
धर्म धरावा किंवा मारावा पार्थ वर मला दे हा ॥
अथवा पांचहि मारीं वि-जय-श्री-शुद्ध-कीर्तिच्या गेहा[2] ॥ ४९ ॥
ऐसें वदे जयार्थी नृप त्यासि ह्मणे अवश्य तो कर्ण ॥
झाला सिद्ध महात्मा वाराया सर्व आप्त-लोकर्ण[3] ॥ ५० ॥
हर्षे शल्यासि ह्मणे मद्राधीशा वर-प्र-तापा हूं- ॥
प्रेरीं वाजी आजी त्वद्दर्शित यान-शीघ्र-ता पाहूं ॥ ५१ ॥
मारीन पांडव रणीं शल्या निश्चयाचि जाण ते जित कीं ॥
शस्त्रें धरितिल खंडिन माझे अति-तीव्र बाण [4]तेजित कीं ॥ ५२ ॥
शर-वृष्टिनें धनंजय शांतीतें पाववीन मी थोर ॥
घन-वृष्टि-रसीं सादर आजि रणीं या करीन कुरु-मोर ॥ ५३ ॥
शल्य ह्मणे सूत-सुता कां गा अव-मानिशी सु-भव्य जना ॥
वंश-जहि शूर्प न गुणें लंघी सभ्यादृता शुभ व्यजना ॥ ५४ ॥
न विलोकिला धनंजय ह्मणवुनि ऐसें यथेष्ट बोलवतें ॥
न लवे वेतस-शिर परि येतां गुरु-पूर तें किं हो लवतें ॥ ५५ ॥
मद-भूत-ग्रस्ता तुज धर्मात्मा सिद्ध-मंत्र पाहील ॥
साधुपुढें मोह तसा क्षणभरिही हा प्र-लाप राहील ॥ ५६ ॥
कर्ण अनादरुनि वचन शल्यासि ह्मणे सु-शीघ्र हय हाकीं ॥
आकर्षिला[5] कृतांतें चुंबक-मणिनेंच जेविं अय हा[6] कीं ॥ ५७ ॥
कर्ण ह्मणे शल्या गति भीष्माची शत्रुंनीं तशी केली ॥
गुरुहि अ-धर्में वधिला विजय-श्री ओढुनी बळें नेली ॥ ५८ ॥
पार्थ-प्र-ताप साहे आहे मजवेगळा असा कोण ॥
गंगा-सुत वृद्ध भला तो ब्राह्मणही पुरातन द्रोण ॥ ५९ ॥
माझें प्रिय बहु केलें धृतराष्ट्र-सुतें तदर्थ साधीन ॥
ह्याविषयीं प्रिय-भोगासह जीवित करिन अंत-काधीन ॥ ६० ॥
इत्यादि आत्म-वि-क्रम जेव्हां स्व-मुखें यथेष्ट कर्ण वदे ॥

---

१ विकर्तन ह्मणजे सूर्य त्याचा मुलगा—कर्ण. २ विजयलक्ष्मीपासून होणारी जी निर्मळ कीर्ति तिचें स्थानभूत अशा कर्णा. ३ ( आप्त + लोक + ऋण ) आप्तांचें ऋण. ४ तेजस्वी, प्रखर. ५ लोहचुंबकानें. ६ कर्ण.

शल्य तया उत्तर दे उग्र जसें विष हरासि अर्णव दे ॥ ६१ ॥
नर-वर अर्जुन कोठें पुरुषाधम सूत-पुत्र तूं कोठें ॥
वाचाळा नाचावें सत्स्तवनीं न स्व-वर्णनीं ओठें ॥ ६२ ॥
तुज नित्य [1]घोष-यात्रा-स्मरण असावें परंतु हा मद तों ॥
आहेचि वि-स्मृतीचें बीज ह्मणुनि लेशमात्र मी वदतों ॥ ६३ ॥
तूं प्रथम पळालासि प्राण-क्षय-भय धरूनि मनिं मार्गे ॥
जिंकोनि बद्ध केला दुर्योधन [2]ख-चर-नायकें रागें ॥ ६४ ॥
बद्ध-वि-मुक्त सु-योधन तेव्हां त्वां कीं धनंजयें केला ? ॥
राधेय अन्य तूं तो अन्याचि जाणो पळोनि जो गेला ॥ ६५ ॥
त्या गो-ग्रह-प्रसंगीं भीष्म-द्रोणादि सर्व एकानें- ॥
केले भग्न दशा ते तुमची क्षण आयकों नये कानें ॥ ६६ ॥
तेव्हां त्वां तो अर्जुन राधेया कां न जिंकिला शस्त्रें ? ॥
अस्त्रें गेलीं होतीं कोठें नेलीं हिरोनि जैं वस्त्रें ॥ ६७ ॥
झालें युद्ध उप-स्थित आजि पळेनासि जरि तुला पार्थ- ॥
मारील निश्चयें हें कर्म करिशि निज-वधू-विलापार्थ ॥ ६८ ॥
ऐसें सज्जन-संमत हित, सत्य, श्राव्य, जें वदे शल्य- ॥
कर्णाच्या कर्णा दे दुःख तसें तप्तही न दे शल्य ॥ ६९ ॥
कर्ण ह्मणे गा शल्या मागील कथा कशास जरि आजी- ॥
मज जिंकील तरि खरें तव [3]कत्थन, शीघ्र चालवीं वाजी ॥ ७० ॥
शल्य ह्मणे बहु बरवें पार्थाशीं गांठि घालितों तूर्ण ॥
ईश्वर-वरानुकूलें दैवें होतात कामना पूर्ण ॥ ७१ ॥
यापरि बोलत जातां पांडव-पृतना विलोकिली दूर ॥
कोठें अर्जुन ऐसें सादर ज्या त्यासि तो पुसे शूर ॥ ७२ ॥

१ घोष—गौळवाडा त्याप्रत यात्रा —गमन. पांडव द्वैतवनांत असतां त्यांस आपलें वैभव दाखवावें ह्मणून दुर्योधन हा, कर्ण, शकुनि वगैरे मंडळी व चतुरंग सैन्य बरोबर घेऊन, तेथें असणाऱ्या आपल्या गायी पाहण्याच्या मिषानें त्या वनांत गेला. तेथें क्रीडा करण्याकरितां चित्रसेन गंधर्व आला होता. त्याचें व दुर्योधनाचें कांहीं कारणावरून युद्ध झालें, त्यांत कर्ण पळाला व चित्रसेन दुर्योधनाला बांधून स्वर्गलोकीं नेऊं लागला असतां अर्जुनानें त्यास सोडविलें. ह्या सर्व प्रकरणास घोषयात्रा असें ह्मणतात.
२ चित्रसेन गंधर्वानें. ३ बडबड.

कर्ण ह्मणे सुखवाया भू-प-सखा करुनि शत्रुचें निधन ॥
सांगेल पार्थ मज जो देइन मागेल जें तयासि धन ॥ ७३ ॥
शल्य ह्मणे राधेया वांटिशि धन कां कुबेरसा अ-ज्ञा ॥
पार्थ पहाशील सुखें व्यय-वेत्ते वित्त वेंचिती यज्ञा ॥ ७४ ॥
कंठीं बांधोनि शिळा बाहु-बळें जेविं सागरीं तरणें ॥
कीं भृगु-पतन तसें हें जें तूं करणार त्या अरींत रण ॥ ७५ ॥
व्यूह रचोनि सकळ नृ-प बंधु सुत सु-योधनादिकांसहित ॥
पार्थाशीं युद्ध करीं जरि ह्मणसी स्व-जय हो न हो अ-हित ॥ ७६ ॥
कर्ण ह्मणे शल्या मी स्व-भुज-बळें प्रार्थितों रणीं पार्था ॥
हे प्रभु सहाय असतां साधीना कर्ण कोणत्या स्वार्था ॥ ७७ ॥
तूं निश्चित हित-शत्रु स्तविशी घडिघडि स-धर्म-भीमातें ॥
माच्युत-धनंजयातें तूं देऊं पाहतोसि भी मातें ॥ ७८ ॥
या दृढ मदभिप्रायापासुनि वारूं शके न शक्र मला ॥
मर्त्याची काय कथा प्राकृतसा काय कर्ण हा गमला ? ॥ ७९ ॥
शल्य ह्मणे राधेया जेव्हां तुझिया स्मरोनि कर्मातें ॥
अर्जुन तीव्र शरांनीं समरीं भेदील सर्व मर्मातें- ॥ ८० ॥
तेव्हां पश्चात्तापा बापा तूं पावशील पापानें ॥
सापानें धरिला प्लव न जगे बडबडसि तूं जसा पानें ॥ ८१ ॥
तूं विजयासि वधाया वांछिसि हें कोण जाणता साहे ॥
अंबांक-स्थित शिशु शशि-मंडळ कवळावया जसा पाहे ॥ ८२ ॥
शव-मांस-मत्त जंबुक तूं गज-मुक्ताश सिंह तो जिष्णु ॥
तूं शशक, पार्थ गज-पति, कीं दानव तूं सिताश्व तो विष्णु ॥ ८३ ॥
स्व-बिल-स्थ कृष्ण-सर्पा काष्ठें टोंचोनि खवळिशी कां गा ॥
तीव्र त्रिशूळ-वदनें तूं खाजवितोसि आपुल्या आंगा ॥ ८४ ॥
पार्थ-पयो-धर गर्जे स्पर्धा मंडूक तूं वृथा धरिशी ॥
त्याच्यापुढें टुरुटुरू टरोंटरों शब्द हे किती करिशी ॥ ८५ ॥
श्वान स्व-पोषकाच्या सदनाच्या आश्रयें उभा राहे ॥

---

१ पर्वताच्या कड्यावरून पडणें. २ हे माझे समर्थ बाहु. ३ बेडूक. ४ मद्यप्राशनानें. ५ ( अंबा + अंक + स्थित ) आईच्या मांडीवर बसलेला. ६ ( गज + मुक्ता + आश ) हत्तीच्या गंडस्थळांतील मोत्यें खाणारा.

जिकडे वनांत गर्जे शार्दूल तया दिशेकडे पाहे ॥ ८६ ॥
भुंके बळें यथेष्ट व्यथित करी निकट-वर्ति-जन-कर्णा ॥
अर्जुन दृष्टि न पडला तोंचि तसा भुंकतोसि तूं कर्णा ॥ ८७ ॥
शश-मंडळांत कोल्हा ह्मणतो मी सिंह वल्गना करितो ॥
जोंवरि न पाहिला गज-मुक्त-फळ-कवळ-भक्षिता हरि तो ॥ ८८ ॥
कर्ण ह्मणे गुणवद्गुण जाणे गुणवंत अ-गुण नेणेची ॥
प्रसवे तीच अभि-ज्ञा शल्या तैसी न वांझ वेणेची ॥ ८९ ॥
मी आपणासि जाणें जाणें त्या जिष्णुलाहि तत्त्वानें ॥
तैसें न जाणिजे त्वां इतरें बा सत्त्व-हीन सत्त्वानें ॥ ९० ॥
पार्थ-वधाचें साधन आहे तें सांगतों तुला जेणें- ॥
आज द्वैरथ-युद्धीं विजयाचे प्राण निश्चयें घेणें ॥ ९१ ॥
आहे अहि-मय सायक मृदु-चंदन-चूर्ण-पूर्ण भात्यांत ॥
त्यावांचुनि शर दुसरा नाहींच क्षोणि-वल्लभा त्यांत ॥ ९२ ॥
तो आहेय शरोत्तम सोडुनि मी मेरुतेंहि फोडीन ॥
कवचाची काय कथा पार्थीं कीं केशवींच सोडीन ॥ ९३ ॥
तूं झालासि कु-देशीं संगर-पांडित्य काय तुज ठावें- ॥
शल्या, कल्याण-गुणा पात्र जगीं पुण्य-संग्रहें व्हावें ॥ ९४ ॥
भ्यालासि मूढ-बुद्धे बडबडसी फार वानिसी अरिला ॥
भाव तुझा मज कळला धीर तुझा मृत्युच्या भयें हरिला ॥ ९५ ॥
ते मारितील मज कीं त्यांला मारीन मी स्व-बळ जाणें ॥
कृष्णाला कर्ण न भी तनु टाकुनि एकदां असे जाणें ॥ ९६ ॥
दोघांची काय कथा जरि कृष्णार्जुन सहस्र येतील ॥
तरि माझे शर त्यांच्या प्राण-धनातें हिरोनि घेतील ॥ ९७ ॥
तुज भेदिलें परांनीं स्पष्ट ह्मणुनि बोलसी असें खोटें ॥
सर्वा पापांमध्यें हें मित्र-द्रोह-पाप मज मोठें ॥ ९८ ॥

---

१ जवळ असणाऱ्या मनुष्यांच्या कानाला. २ प्रसववेदनेची ( बाळंतीण होण्याच्या वेळच्या दुःखाची ) जाणणारी. ३ बुद्धिरहित प्राण्यानें. ४ रथ्यांच्या द्वंद्वयुद्धांत. ५ सर्प-रूप- -अग्नीनें अर्जुनाच्या मदतीनें खांडववन जाळलें त्या वेळीं त्यानें सर्व तक्षककुळ जाळलें. फक्त तक्षकाचा पुत्र अश्वसेन हा वांचला. तो ह्या वेळीं अर्जुनाला मारावें ह्या हेतूनें कर्णाच्या भात्यांत बाणरूपानें येऊन राहिला होता, अशी कथा आहे. ६ सर्पाचा.

मज युद्धाभिप्रायापासुनि मागें बळेंचि फिरवील- ॥
ऐसें भूत नसेचि त्रि-जगीं जें ह्या यशास मिरवील ॥ ९९ ॥
म्याडासि भेडसावीं मी म्याया उपजलों नसें कांहीं ॥
वि-क्रम-यश साधाया झालोंसें चाल पथ पुढें पाहीं ॥ १०० ॥
शल्य ह्मणे रे सूता बडबड करितोसि फार मद्य-प-सा ॥
गुरु-सागर बहु गर्जे परि मुनिचा एकही भरे न पसा ॥ १०१ ॥
तेव्हां दुर्योधन नृ-प निज-कार्याचा न व्हावया घात- ॥
कर्णास मित्र-भावें वारी शल्यासि जोडुनी हात ॥ १०२ ॥
नृप-बहु-मानें झाले अति वाद त्यजुनि उप-रमा वरिते ॥
मग हरिवर[1] करि-वर-से गेले दोघे नरोत्तमावरि[2] ते ॥ १०३ ॥
कर्ण त्रि-दश-गुरु-मतें[3] रचुनि महा-व्यूह तन्मुखीं ठाके ॥
बार्हस्पत्य-व्यूहा पाहुनि बहु धर्म तो मनीं धाके ॥ १०४ ॥
भू-प ह्मणे तूंचि करीं कर्णाशीं युद्ध उद्धरीं कांटा ॥
भांडो सु-योधनाशीं भीम, तयाचाचि तो असे वांटा ॥ १०५ ॥
अमृत-रसाची धारा धर्माची श्वेत-वाह[4] आज्ञा पी ॥
होय पुढें, सैन्यातें ऐसें वर्ता ह्मणोनि आज्ञापी ॥ १०६ ॥
शल्य ह्मणे राधेया तो येतो जिष्णु विष्णु-सम-शील ॥
गरुडीं कालीय तसा ज्यावरि तूं कोप-गरळ वमशील ॥ १०७ ॥
कर्णा पुससी ज्याला आला तो पार्थ दाव-पावक-सा ॥
वधितो मृगांसि हरि-सा सोसेल परांसि तत्प्रभाव कसा ॥ १०८ ॥
तुजशीं धनंजयाशीं गांठि पडाया नकोचि बहु वेळ ॥
पाहीन मी तयाचा आणि तुझाही रणांगणीं खेळ ॥ १०९ ॥
वधिशील जिष्णुला तरि कर्णा होशील आमुचा राजा ॥
परि हें दुर्घट इंद्रा जरि काय सहाय आणिला आजा[5] ॥ ११० ॥
कर्ण ह्मणे मद्रेशा नीट पहा पार्थ-केतुचा शेंडा ॥
संशप्तकांत झाला मग्न जसा सागरोदरीं भेंडा[6] ॥ १११ ॥
शल्य ह्मणे वरुणातें कोण समुद्रोदकांत बुडवील ॥
विझवील तृणें दहना अनिळाला करुनि बद्ध तुडवील ॥ ११२ ॥

---

१ सिंहावर. २ अर्जुनावर. ३ देवांचा गुरु बृहस्पति त्याच्या मताप्रमाणें. ४ अर्जुन. ५ ब्रह्मदेव. ६ मातीचा गोळा.

ऐसें जों कर्णाशीं शल्य वदे तोंचि शीघ्र त्या सेना- ॥
मिळती, मारण-मरणाहूनि दुजें अधिक ज्यांसि भासेना ॥ ११३ ॥
कुरु-पांडव-सेनांसीं होतां संग्राम राम-शिष्य-मणी- ॥
गज यूथावरि हरि-सा धांवे मारी अनेक वीर-मणी ॥ ११४ ॥
अरि एक बाण हाणी तों हाणी कर्ण शर तया ति-पट ॥
निपट प्रत्युपकृति-पटु झांकी रिपु पसरुनि स्व-हेति-पट ॥ ११५ ॥
काढी जोडी ओढी सोडी शर कर्ण लाघवास्तव तें- ॥
न दिसे, दिसे शरासन-मंडळ हत शत्रु-बळहि त्या-भवतें ॥ ११६ ॥
हत-नर-तुर-ग-गजांच्या रक्तांची गुरु-तरंगिणी वाहे ॥
साक्षात् सरस्वती ती स्वर्ग जन जिच्या नि-मज्जनें लाहे ॥ ११७ ॥
रक्त-नदीच्या स्नानें, पानें गंधेंहि वीर ते भुल्ले ॥
दिसती वसंत-समयीं किंशुक-तरु कटक-काननीं फुल्ले ॥ ११८ ॥
शल्य ह्मणे आला रे आला काळानळ-प्र-बळ भीम ॥
भी मन काळाचेंही यास प्रति-मल्ल एक बळ-भीम ॥ ११९ ॥
बहु-काळ संचितोग्र-क्रोध-गरळ तुजवरीच ओकाया ॥
हा भीम-भुज-ग आला सावध हो देख तेज-ओका या ॥ १२० ॥
कर्ण ह्मणे मद्रेशा सत्याचि वदतोसि भीम हा साचा ॥
घेईल सूड समरीं आह्मीं केल्या महोपहासाचा ॥ १२१ ॥
हा वीर धीर कोपी प्र-बळ नसे यासि चाड देहाची ॥
चौघांहुनी शत-गुण प्रीति द्रुपदात्मजेशि दे हाची ॥ १२२ ॥
याला वधीन किंवा वि-रथ तरी मी करीन कोपार्थ ॥
याच्या कैवारें तरि मजशीं घालील गांठि तो पार्थ ॥ १२३ ॥
शल्य ह्मणे न वदें बहु आधीं भीमासि चाल वाराया ॥
कर्ण ह्मणे तुज सागर भासे मज भीम काल्वा राया ॥ १२४ ॥
भीमातें नाराचें ताडी कर्ण स्तनांतरीं आधीं ॥
मग बुडवि शर-समुद्रीं कपि गिरितें जेविं दुस्तरागाधीं ॥ १२५ ॥
भीमहि झांकी कर्णा बाण-पटें तत्तनूंत नव रोप- ॥
खोंवी तो वीर-मनीं स्व-मनीं तेव्हां धरी अ-मित कोप ॥ १२६ ॥

---

१ परशुरामाच्या शिष्यांमध्यें श्रेष्ठ असा-कर्ण. २ पळसाचीं झाडें. ३ हनूमान्. ४ सांचत आलेला भयंकर क्रोध हेंच विष. ५ पराक्रमाचें स्थान. ६ बाणानें.

लोक ह्मणति दारुण रण नेणों होईल आजि काय कसें ॥
दोघेही प्र-बळ हटी दिसतें हें युद्ध भीति-दायक-सें ॥ १२७ ॥
हांमे भीम मनिं ह्मणे जरि नसता कर्ण जिष्णुचा वांटा ॥
कां टाकितों सु-यश कां गुरु-हृदयांतिल न काढितों कांटा ॥ १२८ ॥
कौसुंभ-रक्त-रंजित वस्त्रानें शोभते जशी महिला ॥
हत-कटक-रक्त-रंगें आली शोभा तशी रणीं महिला ॥ १२९ ॥
भीमें कुरु-बळ मथिलें जरि केलें गुरु-सुतादिकीं जतन ॥
हत-नष्ट रुद्र-रोषें होय जसें दक्ष-मख-महायतन ॥ १३० ॥
पार्थ मुकुंदासि ह्मणे संशप्तक मारिले पहा कृष्णा ॥
कृष्णा-देवीची जाशि ताशि पुरवाया स्व-भूमिची तृष्णा ॥ १३१ ॥
कर्णाचा गेज-कक्ष ध्वज दिसतो आमुच्या बळांतचि तो ॥
पुरुष-व्याघ्र प्राया वीरांचे राशि संगरीं रचितो ॥ १३२ ॥
चाल सख्या हरि स-त्वर तेथें ने तन्निवारणार्थ मला ॥
मम लाजो तव दासा वाटे वृष काळ पांडवां गमला ॥ १३३ ॥
कर्णातें साहेसा न दुजा मजवेगळा तुला कळतें ॥
अद्भुत तेज तयाचें भस्मचि केलें असेल गा बळ तें ॥ १३४ ॥
जो साराथि सुख-धामा तुज-सम शूरहि नवांबु-द-श्यामा- ॥
आला अरिच्या कामा तो राजा शल्य आमुचा मामा ॥ १३५ ॥
ने रथ तेथें जेथें कर्ण करितसे मदीय-बल-दमना ॥
स्मरत असेल वृष-दहन-दग्धाच्या कृष्ण-मित्र-जल-द मना ॥ १३६ ॥
हरि हर्षे हरि हांकी तैं हरिणाचाचि न हरिती सर्व- ॥
ते ऐसे जवन लव न पवन-कुमारींहि उरविती गर्व ॥ १३७ ॥
शल्य कपि-ध्वज पाहुनि कर्णासि ह्मणे पहा महा-बाहो- ॥
आला अर्जुन सावध आतां युद्धार्थ शीघ्र तूं बा हो ॥ १३८ ॥
कर्ण ह्मणे सत्य वदसि धैर्याची धरुनि घट्ट कांस रहा ॥
वदलासि यथार्थ नृपा मज झाला प्राप्त धन्य वासर हा ॥ १३९ ॥

१ ( दक्ष + मख + महा + आयतन ) दक्षप्रजापतीच्या यज्ञाचें स्थान ( यज्ञमंडप ). २ हत्ती ज्याच्या पदरावर काढिला आहे असा. ३ कर्णरूप अग्नीनें जळणाऱ्या ( माझ्या ) लोकांस कृष्णाचा मित्र जो अर्जुन हाच मेघ तो आठवत असेल ह्मणजे माझे लोक अशा संकटसमयीं माझी आठवण करित असतील. ४ वायुपुत्र हनूमान् त्याच्या अंगीं.

मी शुद्ध युद्ध यासीं निर्भय-चित्तें करीन, काम रणीं- ॥
होतो पूर्ण, पहावा धर्म-ज्ञ-जनें हि दोष का मरणीं ॥ १४० ॥
भीष्म-द्रोण-चरित्राहुनि कोणाचें चरित्र सन्महित ॥
परि तेंहि विसरवीन स्व-चरित्रें मी करीन जन्म-हित ॥ १४१ ॥
कृष्ण ह्मणे पार्था हा आला क्रोधांध कर्ण अंत-क-सा ॥
मृत्युं-जय-वर-पात्रा तूं याचा न करिशील अंत कसा ॥ १४२ ॥
याच्या शरासि साहे ऐसा त्रि-जगांत तूंचि एक रणीं ॥
वीर उदंड असति परि त्यांला पार्था तुझी न ये करणी ॥ १४३ ॥
कर्णातें जिंकाया तूं शक्त तव प्र-ताप मी जाणें ॥
झाला प्रसन्न तुज तो जो जाळी त्रि-पुर एकले बाणें ॥ १४४ ॥
मारीं हर-प्रसादें कर्णा वृत्रा जसा सुनाशीर ॥
राधे-सह ताडूत व्याकुळ-चित्ता तिच्या सुना शीर ॥ १४५ ॥
पार्थ ह्मणे कृष्णा मज जय घडतो आजि निश्चयें हा कीं ॥
बा सर्व-लोक-गुरु तूं आहेसि बहु प्रसन्न हय हाकीं ॥ १४६ ॥
आजि पहाशील सख्या मच्छर-शकलीकृतांग कर्णातें ॥
तदसृक्कण-सिक्तातें आकाशातें हि शोण-वर्णातें ॥ १४७ ॥
मी त्याचें कीं माझें तो आजि करील निश्चयें हनन ॥
मन न व्यग्र तुझें हो रणिं जय-मरणार्थ आमुचें जनन ॥ १४८ ॥
जिष्णुसि हरि ने धर्म-स्वांतींचें उद्धरावया शल्य ॥
कर्ण-रथासह आणी स-त्वर समरांगणांत तो शल्य ॥ १४९ ॥
उत्साह तेज विद्या शिक्षा बळ धैर्य शौर्य दोघांचें ॥
तुल्यचि ज्यापरि गंगा-यमुनांच्या पावन-त्व ओघांचें ॥ १५० ॥
इंद्र ह्मणे कर्ण-वधें हो पार्थ स्तोत्र-पात्र अ-मरांत ॥
सूर्य ह्मणे पार्थ-वधें संपादू वि-जय कर्ण समरांत ॥ १५१ ॥
कर्ण ह्मणे शल्या जरि मजला मारील आजि पार्थ कसें- ॥
करिशील सांग ऐकों मैत्रीचें होय ज्यांत सार्थकसें ॥ १५२ ॥
शल्य ह्मणे कर्णातें न घडो दैवें घडेल ही जरि तें ॥

१ ( मत् + शर + शकलीकृत + अंग ) माझ्या बाणांनीं छिन्नविच्छिन्न झालें आहे अंग ज्याचें अशा. २ ( तत् + असृक् + कण + सिक्तातें ) त्याच्या रक्तबिंदूंचा सडा ज्यावर झाला आहे अशा.

तरि मी त्वदर्थ युद्धीं मारीन रणांत. जिष्णुतें हरितें ॥ १९३ ॥
पार्थहि हरिस ह्मणे जरि अरि मज मारील काय करिशील ॥
न पुसावें परि पुसतों कीं तूं संशय समस्त हरिशील ॥ १९४ ॥
ऐकोनि कृष्ण शिव शिव ऐसें आर्धीं ह्मणोनि मग हांसे ॥
कीं कर्ण काय, न बळी काळाचे ही स्वे-सेवकीं फांसे ॥ १९५ ॥
शुष्क उदधि, शीत अनळ, जरि होईल प्रभा-करा पात- ॥
तरि ह्या कर्णापासुनि नाहीं होणार बा तुझा घात ॥ १९६ ॥
जरि विपरीतचि होइल तेंही स्मर-हर-वर-प्र-दान मृषा ॥
तरि मी निज-भुज-तेजें भस्म करिन मद्र-पति-समेत वृषा ॥ १९७ ॥
ऐसा निश्चय केला पार्थें कर्णेंहि मांडिलें समर ॥
कौतुक पाहति कौरव-पांडव-पक्ष-स्थ आणखी अ-मर ॥ १९८ ॥
पार्थाकडील कटकें कर्णें, कर्णाकडील त्या पार्थें- ॥
केलीं तीव्र-शरांहीं भग्नें मग्नें भयीं हेत-स्वार्थें ॥ १९९ ॥
वर्षति अन्योन्यावरि कर्णार्जुन ते घनावरी घनसे ॥
पुरुहूत-दूत-वात-द्युमणिकरां शर-गृहांत रीघ नसे ॥ १६० ॥
तों आला वध-समय द्विज-शापहि भू-मुखेंचि तो डावें- ॥
गिळवी रथ-चक्र ह्मणे रामास्त्रा प्रेम तूंहि सोडावें ॥ १६१ ॥
चक्र क्षितिनें गिळितां न स्मरतां भार्गवास्त्र रवि-जाला- ॥
स्पर्शे विषाद, ह्मणती बळ-तेजो-नाश-हेतु कवि जाला ॥ १६२ ॥
व्यसनीं पडतां क्षात्रीं धर्मीं होऊनि तो वि-रस हाय ॥
कर्ण ह्मणे धर्मासहि मानी कीं हा नव्हे चिर सहाय ॥ १६३ ॥
विधि फिरतां जरि दिधला व्यसनें त्या फार कंप दात्यातें ॥
परि परि-रंभण देउनि होती शुचि-सत्व-संपदा त्यातें ॥ १६४ ॥

१ माझ्या भक्ताला ( बांधण्याला ). २ ज्यांचा स्वार्थ ( जयाशा ) नाहींसा झाला आहे अशीं. ३ मेघ ( पाणी ). ४ कोणा एका वेळीं कर्ण मृगयेस गेला असतां त्याच्या बाणानें एका ब्राह्मणाची गाय मेली तेव्हां त्या ब्राह्मणानें " ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं युद्धांत पृथ्वी तुझ्या रथाचें चक्र गिळील " असा शाप दिला होता. ५ परशुरामानें दिलेल्या अस्त्रा. परशुरामाचा भीष्माशिवाय इतर क्षत्रियांस विद्या न सांगण्याचा नियम होता. तेव्हां कर्ण ब्राह्मणाचा वेष घेऊन त्याजपासून कपटानें विद्या शिकला. पुढें तो क्षत्रिय आहे असें परशुरामास कळल्यावर मजपासून मिळविलेली विद्या प्रसंगीं तुला उपयोगी पडणार नाहीं असा त्यानें त्यास शाप दिला होता.

तो वृष भूमि-ग्रस्त-स्यंदन-चक्रासि उद्धरायातें ॥
उतरे स्व-रथाखालें करुनि असें अ-तुल युद्ध राया तें ॥ १६५ ॥
उद्धरण करूं पाहे कर्ण भुजांनीं धरूनि चक्रातें ॥
परि पृथ्वी सोडीना जाणो व्रत घेतलेंचि नक्रानें ॥ १६६ ॥
सप्त-द्वीपा पृथ्वी वृष उचली चार अंगुळें वरि ती ॥
बडिशासि जशी मत्स्यी नुगळी चक्रासि कांपली परि ती ॥ १६७ ॥
सद्रसना नामातें कीं सोडी बंधु-ता न दायातें ॥
तैशी क्षिति चक्रातें, श्रम झाला फारसा तदा यातें ॥ १६८ ॥
त्या व्यसनीं तो पाणी आणी नेत्रासि वृष ह्मणे हाय ॥
काय करील, न साहे ते बहु मर्मींहि साहिले घाय ॥ १६९ ॥
स्व-वधोद्यतार्जुनातें कर्ण ह्मणे बळ तुझें अनंत रहा- ॥
स्वस्थ मुहूर्तभरि रण-श्रद्धा पुरवील गा अनंतर हा ॥ १७० ॥
रथ-चक्र उद्धरूं दे श्रुति-शास्त्र-ज्ञा महा-रथा कुल-जा ॥
साधु न हाणिति अरिला पाहति अ-धृतायुध व्यथाकुल जा (ज्या) ॥ १७१ ॥
तूं स्व-रथीं, क्षितिवरि मी, तूं सायुध, मी अ-शस्त्र-कवच रणीं ॥
न वधावें मज जों मी रथ-चरणीं लाग तूंहि भैव-चरणीं ॥ १७२ ॥
भ्यालों न तुज हरीसहि जो न तुला वि-मुख काय कातर तो ॥
कथितों यास्तव कीं जन धर्में भव-सिंधु-नायका तरतो ॥ १७३ ॥
रक्षावा धर्म बुधें कुशळाचा धर्म हा निधी, राहें- ॥
स्थिर, जें करिसि निरायुध-मथन करिल धर्म-हानि धीरा हें ॥ १७४ ॥
कृष्ण ह्मणे राधेया भला बरा आजि स्मरसि धर्मातें ॥
नीच-व्यसनीं बुडतां निंदिसि दैवास न स्व-कर्मातें ॥ १७५ ॥
जेव्हां तूं दुर्योधन दुःशासन शकुनि एक-मति झालां ॥
कैसें कपट-द्यूतीं चित्तींहि न धर्म लंघितां भ्यालां ॥ १७६ ॥
जेव्हां सभेसि नेली पांचाळी मानिलें मनीं शर्म ॥
तेव्हां गेला होता कोठें राधा-सुता तुझा धर्म ॥ १७७ ॥
फेडी वस्त्र सतीचें जेव्हां उघडें करावया आंग ॥
गेला होता कोठें धर्म तुझा तेधवां वृषा सांग ॥ १७८ ॥

१ जमिनींत रुपलेलें रथाचें चाक त्याला. २ न सोडी. ३ साधूंची जिव्हा. ४ भाऊबंद. ५ विभाग (हिस्सा). ६ सहन न होतील असे. ७ शिवपदीं.

चारुनि विषान्न भीमा सर्प डसविले असें नृपें खोटें- ॥
कर्म करवितां कर्णा होता तव धर्म तेधवां कोठें ॥ १७९ ॥
केले दग्ध जतु-गृहीं त्वां पांडव वारणावतीं जेव्हां- ॥
गेला होता कोठें धर्म तुझा सूत-नंदना तेव्हां ॥ १८० ॥
अभिमन्यु बाळ बहुतीं वधितां त्वां वारिलें न तें कर्म ॥
तेव्हां गेला होता कोठें राधा-सुता तुझा धर्म ॥ १८१ ॥
पूर्वी धर्म न रुचला त्यजिला निपटूनि जो जसा कुचला ॥
आतांचि बरा सुचला काळ-गृहा सर्व व्हा परासु चला ॥ १८२ ॥
मार्गेचि तुह्मी भजतां धर्माला तरि तुह्मांस वांचविता ॥
आतां मरा, न वांचे दीप्त-गृहीं जो न तोय सांचविता ॥ १८३ ॥
मार्गेचि धर्म करितां जरि देतां राज्य धर्म वांचविता ॥
न जगे जो दुर्भिक्ष-व्यसनापूर्वी न धान्य सांचविता ॥ १८४ ॥
आतां रक्षिल कसा धर्म तुह्मीं वित्त-मद्य, मत्तांनीं- ॥
जो लोटिला दहादां स्व-हितहि मानूनि अ-हित लत्तांनीं ॥ १८५ ॥
रक्षावा धर्म असा करिशी उप-देश तरि असे मान्य ॥
रक्षितसों धर्मातें आह्मांला धर्म ठाऊका नान्य ॥ १८६ ॥
आ-श्रित-जनाभिमानी प्रभु बोले जेधवां असें रागें ॥
निश्वास वृषें लज्जावनत-मुखें सोडिला जसा नागें ॥ १८७ ॥
न वदे कांहींच रथीं वेंचे घे सूर्य-सूनु चापातें ॥
सोडी बाण कराया मूर्छित शक्रासि सूनुचा (च्या) पातें ॥ १८८ ॥
तेव्हां पेर-पुरुष ह्मणे पार्था दिव्यास्त्र-वात सोडावा ॥
झोडावा मोडावा वैर-द्रुम कर्ण बाण जोडावा ॥ १८९ ॥
कर्णावरि बहु कोपे पार्थ जई तेधवां अनळसाचा- ॥
देह ज्वाला-माली भासे त्या रण-मखीं अनळ साचा ॥ १९० ॥
शर सोडिला रवि-सुतें धीर-जनेंहि स्व-धीर यामार्गे ॥
जो सोडिलाचि नव्हता व्यसनांत कधींहि मणि जसा नागें ॥ १९१ ॥
तो शर गर-धर-वर-सा पवि-सा रवि-सा स्मरारि-सायक-सा ॥
पार्थ-भुजांतरिं शिरला, वल्मीकामाजि नाग-नायक-सा ॥ १९२ ॥

---

१ धर्मराजाला. २ परमात्मा (कृष्ण). ३ (अन् + अळस [illegible]) ज्याला आळस नाहीं अशाचा.

त्या खर-शर-प्र-हारें विव्हळ झाला महेंद्र-सुत राया ॥
जरि होता निकट कुशल मंत्री प्रभु बाण-सर्प उतराया ॥ १९३ ॥
ऐसा निज-भुज वि-क्रम दावुनि सर्वां भटांसि शुद्ध रणीं ॥
उतरे वृष दावाया भू-ग्रस्त-रथांघ्रिच्याहि उद्धरणीं ॥ १९४ ॥
बहु यत्न करी प्रार्थी परि धरिलें सोडिनाचि चाक रसा ॥
द्विज-शाप-मान्य पति-सा गुरु कर्ण न मान्य तीस चाकर-सा ॥ १९५ ॥
देव ह्मणे पहिलें गुरु-नाम मग स्व-धनु बाण बरवें त्रे ॥
खंडीं शिर रिपु पुनरपि जों रथ-रत्नाचिया न वर वेंत्रे ॥ १९६ ॥
प्रभुची आज्ञा होतां पार्थ प्र-खरषु सोडुनी त्वरित- ॥
रण-दक्षा स्व-वि-पक्षा करि कक्षा केतु खंडुनी ज्वरित ॥ १९७ ॥
तुटला ध्वजचि न केवळ वि-जयाचा भरंवसाहि तुटला हो ॥
सुहृदश्रु बिंदुंसह तो पडला बळ-धैर्य सेतु फुटला हो ॥ १९८ ॥
केतु च्छेदुनि पार्थ द्यु-मणि-सुताचे हरावया प्राण ॥
जोडी गांडीव-गुणीं शत्रु-हर हरायुधा असा बाण ॥ १९९ ॥
योजुनि महास्त्र-मंत्रित शर विजय ह्मणे "जरि स्व-गुरु सर्व- ॥
तोषविले असतील, ज्ञान-वृक्षाचा नसेल तिळ गर्व,- ॥
विधिनें जोडुनि नेलें असेल जरि कीर्तनें न तप नाशा- ॥
तरि या शरें वृष मरो, हरिचीच पुरो पुरो न तपनाशा" ॥ २०२ ॥
ऐसें वदोनि पार्थें ओढुनियां स-गुण-बाण कर्णांत ॥
पाठविला काळें निज-दूत तसा व्हावयासि कर्णांत ॥ २०३ ॥
नयनाग्नि-कील नीलग्रीवाचा मीनकेतुवरि जैसा ॥
अरिवरि सायक-नायक जाय कराया क्षय त्वरित तैसा ॥ २०४ ॥
तो शर कृत्यानळसा दुर्घट चक्रोद्धृति-क्रियानळसा- ॥
गांठी कुरु-बळ-विजय-प्रासादाच्या रवि-प्रभा कळसा ॥ २०५ ॥

---

१ ध्वजवस्त्राचा पट २ शंकराचें आयुध पाशुपतास्त्र त्यासारिखा. ३ शंकराच्या (तृतीय) नेत्रांतें अग्नीची ज्वाळा मदनावर जशी पडली. ४ (कृत्या + अनळ + सा) शत्रूचा घात व्हा . ह्मणून जो होम करावयाचा त्याच्या अग्नीसारखा. ५ (चक्र + नं उद्धृति + क्रिया + अनलस) रथाचें चाक उपटून काढण्याच्या व्यापारांत आळस न ळ करणाऱ्या अशा कर्णा[illegible] रविप्रभा कुरुबळ विजयप्रसादाच्या कळसा गांठी असा अन्वय पा-वणारा ह्मणजे कौ[illegible] राज्याची वेळ आली. बोधाचें.

शाण-निशित-मुख-बाण प्राणभृदीड्यार्क-सूनुच्या अमळा- ॥
खंडी नाळापासुनि कमळा मारुत तसा शिरः-कमळा ॥ २०६ ॥
सासाश्रु शिर वृषाचें प्रथम क्षोणी-तळीं गळालें हो ॥
मग स-कुसुम-वृष्टि तनू स-धर्म-भय शत्रु-बळ पळालें हो ॥ २०७ ॥
कर्ण-शरीरापासुनि तेज निघालें दिवा-करीं शिरलें ॥
गुरु-हृच्छोक-तमावरि जाणो सत्पुत्र-रत्न तें फिरलें ॥ २०८ ॥
ऐसा केला असतां कृष्ण-कृपेनेंचि कर्ण-नाश तदा ॥
पांडव पांचाळ करिति विजयाच्या वीर्य-वर्णना शत-दा ॥ २०९ ॥
बहु-सिंह-नाद वाद्य-ध्वनि जय-जय-कार करिति धर्म-बळें ॥
ह्मणति तरला युधिष्ठिर दुस्तर कर्णार्णवासि धर्म-बळें ॥ २१० ॥
भग्न-रथें शल्य पळे क्षितिप ह्मणे क्षोभलीस तूं कां गे ॥
दुर्योधनासि भेटे स्व-मुखें कर्णांत-वृत्त तें सांगे ॥ २११ ॥
भू-प ह्मणे हा हा आशि कशि झाली आजि अंग-राज-गती ॥
स्वर्ग-श्री साधावी मग,आधीं करुनि संगरा जगती ॥ २१२ ॥
तें वि-परीत कसें त्वां केलें कर्णा सख्या अगा, धार्मी- ॥
[illegible] तरों कैसा ह्या त्वद्विरहार्णवा अ-गाधा मी ॥ २१३ ॥

---

## आर्या-सन्मणि-मालेंतील.

" सत् ह्मणजे साधु हींच रत्नें ह्यांची माला. " ह्या आर्यांपैकीं प्रत्येकींत एकेका साधूचें वर्णन केलें आहे, ह्मणून ह्या प्रकरणास **सन्मणि-माला** ह्मटलें आहे.

जो ज्ञान-राज भगवान् श्रवणें सु-ज्ञान दे, वदे वाचा ॥
अव-तार गमे अकरा-वा कां सु-ज्ञां न देव-देवाचा ॥ १ ॥

---

१ साणेवर तीक्ष्ण केलेलें आहे मुख ज्याचें. २ जीवांना स्तुत्य असा जो सूर्य त्याच्या पुत्राच्या ह्मणजे कर्णाच्या ( प्राणभृत् + ईड्य + अर्क + सूनु ). ३ (स + आप्त + अश्रु) इष्टमित्रांच्या अश्रूंसहवर्तमान. ४ देवांनीं केलेल्या पुष्पवृष्टीसह. ५ धर्मराजाच्या मनांतील न्यायुद्धां. ६ आपल्या बापाच्या हृदयांतील शोकरूप अंधारावर. ७ धर्मराजाकडील ८ ज्ञानदेव.

अथा-

उठतां बहु त्वरेनें 'कोठें जातां'[1] असें तुह्मां देवी ॥
पुसती झाली जाणो, पुसतां ज्ञाता पुढें न पद ठेवी ॥ १ ॥
किंवा नारद आला आलापीत[2] स्वकीय[3] सच्चरितें ॥
प्रेमळ गीत तुह्मांला हरि[4] हरिणापरिस बहुत वश करितें ॥ २ ॥
कीं माझें दुर्दैव प्रभुच्या मार्गीत आडवें पडलें ॥
शरणागत-भय-शमना[5] यास्तव येणें तुझें नसे घडलें ॥ ३ ॥
किंवा मजहुनि दुसरा कोणी बहु दीन दास आढळला ॥
तच्छुभ-दैव-समीरें[6] त्यावरि करुणा-घन प्रभू वळला ॥ ४ ॥
अथवा येतां झालां तन्मय शिव-तांडवांत कैलासीं[7] ॥
केला असेल गरुडें गर्व पुन्हा काय त्याच बैलासीं[8] ॥ ५ ॥
बहुधा बळिचें द्वार क्षणभरिही सोडितां नये देवा ॥
न चुकावी छल-पाप-प्रायश्चित्तार्थ[9] साधुची सेवा ॥ ६ ॥
प्राय: सु-मुहूर्ताचा शोध करायासि लागला वेळ ॥
होय महत् कार्य परि प्रभुचा तों नित्य महज हा खेळ ॥ ७ ॥
कीं मी भागवतांचा भाग[11] असें आणिलें मनीं स्वामी ॥
हें सत्यचि परि कैंचा हा भेद प्रभु-वरा तुझ्या धामीं ॥ ८ ॥
किंवा तुज एकाकी पाहुनि खळ दैत्य आडवे आले[12] ॥
फुटतां सागर सिकता-सेतूचें[13] काय त्यापुढें चाले ॥ ९ ॥
किंवा तुज गुंतविलें भजकीं, परि ते दयार्द्र या रंकीं ॥
उद्धरित्यासि न सज्जन गुंतविनी गाय कष्टतां पंकीं ॥ १० ॥

---

१ कोणी कामाकरितां बाहेर जात असतां त्याला कोठें जातां? असें कोणी विचारिलें तर तो अपशकुन समजून त्यानें बाहेर जाऊं नये असें आहे; ह्या गोष्टीस अनुलक्षून हें लिहिलें आहे. २ गात गात. ३ तुमचीं स्वत:चीं. ४ अहो हरि. ५ शरण आलेल्यांचें भय नाहींसें करणाऱ्या. ६ त्याचें शुभकारक दैव हाच समीर ह्मणजे वायु, त्यानें. ७ येत असतां (वाटेंत) कैलासपर्वतावर शिवाच्या नृत्यांत तर तुह्मी तल्लीन झालां नाहीं ना ? ८ एकदा विष्णु कैलासीं शिवदर्शनार्थ गेला असतां, त्याचें वाहन गरुड ह्यानें बळाच्या गर्वानें नंदीच्या नाकांत बोटें घालून त्याचा उपहास केला; तेव्हां त्यास मोठा क्रोध येऊन त्यानें गरुडाला श्वासानें नाकांत ओढून घेतलें; अशा रीतीनें त्याच्या गर्वाचा परिहार केला; अशी कथा आहे. ९ वामनावतारीं (बळीचा) छल केल्यामुळें जें पाप लागलें त्याच्या प्रायश्चित्ताकरितां. १० मजसारख्या मोठ्या पातक्यास तारणें हें महत्कृत्य खरेंच. ११ मीं (ईश्वर) भक्तांच्या मात्र वांट्यास येणारा ह्मणजे त्यांसच प्राप्त होणारा. १२ (युद्धाकरितां) आडवे आले. १३ वाळूच्या बांधाचें.

किंवा चुकलें कांहीं स्तवनीं तेणेंचि म्हणुनि रुसला असशी ॥
तरि हें मन्मूर्खत्व प्रभु तूं दोष-ज्ञ ही तसा नससी ॥ ११ ॥
कीं कळवाया कर्में धर्में तुज दाविली असेल वेही ॥
त्वद्दृष्टि-पुढें राहे ऐसा पापांत त्या नसे लव ही ॥ १२ ॥
कीं न श्रवणीं गेली ही माझी हाक, हा कसा तर्क ॥
कशि गुरु-जनीं मैतीची शिवला ज्या कुमुदिनीस असदर्क ॥ १३ ॥
अथवा स्वस्थचि असशी कीं घेतो नाम रक्षणीं शूर ॥
हें सत्य परि प्र-बळ हि बळ दुर्बळ जरि रणीं धणी दूर ॥ १४ ॥
कीं भीतो भ्रांत वृथा मृग-जळ-मग्नासि काय तारावें ॥
सत्यचि हें, परि शिशुनें भय जाया बागुलासि मारावें ॥ १५ ॥
कीं कांहीं व्रत-नियमीं बोलों चालों नये असें झालें ॥
तरि दीन-रक्षणाहुनि अधिक-फळ-व्रत कधीं मना आलें ॥ १६ ॥
कीं हाक ऐकतांचि प्रभुला हा रक्षणार्हसें वाटे ॥
वाटे या दुः-शील-ग्रीष्मीं तव नव दया-नदी आटे ॥ १७ ॥
कीं पावावें समयीं स-दय मनांतून योजिलें जरि तें ॥
तरि जेविं रुक्मिणीचें चित्ता माझें अ-धीर मन करितें ॥ १८ ॥
किंवा पुराण-पुरुषा संप्रति बहु भागलासि या कामीं ॥
तुज नीज लागली तों सजलों मारावयासि हाका मी ॥ १९ ॥
किंवा बरी परीक्षा केल्यावांचूनि न प्रसाद करां ॥
तरि बरि तसाच आंतहि उगाळिता कोळसा प्रे-यास करा ॥ २० ॥
कीं धाडिलें पुढें निज नाम करो सर्व सिद्ध-ता आधीं ॥

१ यम हा प्राणिमात्रांचीं सर्व कर्में जीत लिहून ठेवीत असतो तीं. अशा महापातकी मनुष्यास तारणें योग्य नाहीं, असें म्हणून यमानें तुला माझीं पातकें दाखविलीं असतील - असा संशय. २ पतिव्रता द्रौपदी हिची. ३ ( असत् + अर्क ) खलदु:शासनरूप सूर्य. ४ सैन्य. ५ (दीनरक्षणापेक्षां ) अधिक आहे फल ज्याचें असें व्रत. ६ हा मी ( मोरोपंत ) जो अत्यंत दुष्टस्वभावाचा हाच ग्रीष्मऋतु त्यांत ( हे ईश्वरा ) तुझी. ७ दयारूप नदी आटे ( आटली ). ८ तुम्ही जरी मत्प्रसंगीं पावावयाचा संकेत केला असेल, तरी तुम्ही अतिप्रिय व दुर्मिळ असल्यामुळें विवाहाच्यापूर्वी रुक्मिणीचें मन जसें तुम्हांविषयीं अधीर झालें होतें तसें माझें मन अधीर झालें आहे. असा भाव. ९ हातारा. पक्षीं अनादि. १० दीनांचा उद्धार करण्याच्या कामांत. ११ हातास श्रम ( मात्र होईल ).

ऐसें प्रभो ह्मणावें तरि तुमचीं चरण-सारसें सोधीं ॥ २१ ॥
कीं आर्जविला नाम-प्रतिनिधि हा अमृत उधळितो स्वैरें ॥
न पुसे, न भी, न ऐके, यास्तव दोघांत लागलें वैर ॥ २२ ॥
कीं संप्रति अ-भय दिलें कलिला चालावया बरें राज्य ॥
परि कोण प्राणि स-दय शिंपील बळें दवानळीं आज्य ॥ २३ ॥
किंवा ह्मणसि समर्थोऽहं कर्तुमकर्तुमन्यथा कर्तुं ॥
दीनावनाविणें क्षण देइल दयिता दया कशी वर्तुं ॥ २४ ॥
कीं भक्त-क्रीडेनें हरिलें मन, सर्व कार्य जी चुकवी ॥
तरि बहु मूळ एकाचि भजदवन-व्यसन वर्णिती सु-कवी ॥ २५ ॥
कीं संकटीं पुष्कळ भक्त, तिळ स्थळ नसे नसावेंची ॥
वसता पुरें, पुरे कां ह्मणतां, धनवंत कण कसा वेंची ॥ २६ ॥
कीं बहु काळ विसरला फारचि संकोचला सख्या लाजे ॥
येत असेल हळु हळू ह्मणुनचि एकहि न पादुका वाजे ॥ २७ ॥
कीं नाम स्पर्श-मणि स्पर्शे परि काय करिल त्यापर मी ॥
स-दयाहि वाटील कसा दुर्दैवाला सुर्वा सख्या परमीं ॥ २८ ॥
कीं प्रथम मदपराधें नाकें ना ह्मणुनि वाहिल्या आणा ॥
प्रभुजी पुरे प्रति-ज्ञा, भारत-रण-वृत्त तें मनीं आणा ॥ २९ ॥
कीं याचकांसि देतां सरले चौरीहि मुक्ति-धन-राशी ॥
भक्तिच मज द्या, द्यावें देवाला अमृत, योग्य न नराशी ॥ ३० ॥
कीं जरि ह्मणाल असतां जन्म-शुचि स्व-पद-तीर-जा मिळतो ॥
तरि अकविनां सख्या अजि चुकला नव्हताचि कीं अजामिळ तो ? ॥ ३१ ॥
कीं वाटलें स्वळाला मुक्ति न द्यावी जशी सुधा सर्पा ॥

१ ज्यांना डामडौल आवडत नाहीं अशीं. २ नाम हा तुझा प्रतिनिधि ज्यानें (कोणी) आर्जव केलें असतां तो यथेच्छ मोक्ष देतो; व तुह्मांला पुसत नाहीं इत्यादि. ३ तुह्मां दोघांत. ४ समर्थः (समर्थ) अहं (मी) कर्तुं (कोणतीहि गोष्ट करावयास) अकर्तुं (को० गो० न करावयास). अन्यथा कर्तुं (को० गो० उलट करावयास). ५ दीनांच्या रक्षणावांचून. ६ तुमची आवडती दया. ७ वागावयास. ८ सोंगटी खेळण्यानें. ९ (कार्य करण्यांत) विघ्न आणितें. १० दृढ झालेलें. ११ भक्तांचें रक्षण हेंच व्यसन (छंद). १२ वेंचतो (सांचवून ठेवतो). १३ कृष्णानें 'मी शस्त्र धरणार नाहीं' ही प्रतिज्ञा अर्जुनाचें रक्षण करण्याकरितां मोडिली. या कथेस अनुलक्षून हें लिहिलें आहे. १४ सलोकता, समीपता, सरूपता आणि सायुज्य असे मुक्तीचे चार प्रकार आहेत. १५ जन्मापासून पवित्र.

तरि ती अश्वादिकांला द्या, सु-वरा• भक्ति-मात्र मज अर्पा ॥ ३२ ॥
कीं अ-कृपा नावडती आवडती स्त्री कृपा तिचें प्राज्य ॥
लोक-त्रयांत देवा पहिलीचें काय एक मी राज्य ॥ ३३ ॥
कीं गमलें जरि आधीं ह्मणतों दावा स्व-पाद• यां लोकीं ॥
जो जो वांछिल जें जें तें द्यावें हें मुधा दयालो कीं? ॥ ३४ ॥
कीं आज काल ज्याचा तेणें अधिकार देतला रागें ॥
तरि हें अ-श्रद्धेय प्रभ्वंतर ऐकिलें नसे मागें ॥ ३५ ॥
कीं भेटि बहुदिसां भय भेटाया दीन-बंधुला वाटे ॥
तरि भेटावें विधिनें गेले जाताति साधु ज्या वाटे ॥ ३६ ॥
कीं स्त्री-पूर्व-शिखंडी त्यातें समरांत भीष्म पाहेना ॥
मीहीं पाहिला पापी तैसें करितां सु-कीर्ति राहेना ॥ ३७ ॥
कीं भीशी मज एका उद्धरितां लागतील फार झटें ॥
तरि कोणाहि न कळतां न्यावा झांकूनि दास पीत-पटें ॥ ३८ ॥
कीं लक्ष-भोजनापरि केला सं-कल्प संपला देवा ॥
तरि दास क्षुद्रिकला मग न ह्मणति काय या बसा जेवा ॥ ३९ ॥
कीं एक मीच उरलों पापी, हें बीज ठेविलें जतन ॥
तेंतन स्वकीय मज कां करितें त्वन्नाम मंगलायतन ॥ ४० ॥
कीं कार्य बहु-त्वें तुज फावेना यावया जगत्पाळा ॥
तरि रूप त्या दुजें, ती विद्या कंठीं वसे जशी माळा ॥ ४१ ॥
कीं मागें गुप्त उभा असासि प्रेमें उभारुनी बाहे ॥
तरि काय बाळकाचे तूं सादर बोल ऐकशी वा हे ॥ ४२ ॥

---

१ हरिविजय ( श्रीधर ) यावरील टीप पहा. २ ज्ञकोनें. ३ अधिकार चालविण्याचें स्थान. ४ योग्यता येण्याच्यापूर्वी. ५ मृत्युलोकीं आपलें दर्शन ( मला ) द्या असा अर्थ. ६ विश्वास न ठेवायाजोगें. ७ ( प्रभु + अंतर ) दुसरा ईश्वर. ८ बारा वर्षानंतर आप्ताची भेट झाल्यास सांबाच्या देवालयांत भेट घ्यावी, असा कांहीं विधि आहे; त्या विधीनें. ९ ( पूर्वी स्त्री असून पुढें पुरुष झालेला ) शिखंडी-कौरव पांडवांच्या युद्धांत भीष्म आटो-पेना, तेव्हां पांडवांनीं शिखंडीला पुढें करून मागून अर्जुनानें बाण मारावे, असें योजिलें. यांत उद्देश हा कीं, भीष्म स्त्रीवर कधीं बाण सोडणार नाहीं. ह्या गोष्टीस लक्षून हें लिहिलें आहे. १० मी पूर्वींचा पापी ह्मणून मला न पाहणें असें अगल तर. ११ भुकेनें व्याकुल झालेल्यास. १२ हक्काची जागा. १३ तुझें परम मंगलकारक नांव माझ्या मुखीं येत असतां मी सर्वांस तरल्यावांचून राहणार नाहीं हा भाव १४ कल्याणाची जागा. १५ हात.

## केकावली.·परमेश्वर-प्रार्थना.

केका ह्मणजे मोराचा शब्द आणि आवली ह्मणजे पंक्ति. मयूरपंतानें आपणास मयूरपक्षी कल्पून आपण ईश्वरास मारलेल्या हाकांना केकावली अशी संज्ञा दिली आहे.

### पृथ्वी-छंद.

तुझ्या बहुत शोधिले अघ-निधी पदाच्या रजें ॥
न तें अ-नृ-त वर्णिती बुध जनीं सदाचार जें ॥
असें(से) सतत ऐकतें सतत बोलते मीच ते- ॥
प्रमाण न ह्मणों जरी उचित माझिया नीचते ॥ १ ॥ (२)
तसाचि उरलों कसा पतित मी नसें काय, तैं- ॥
कृपाचि सरली, असें हि न घडे जगन्नायकीं ॥
नसेन दिसलों कसा, नयन सर्व-साक्षी रवी. ॥
विषाद सरिला ह्मणों, न सुरभी विष क्षीर वी ॥ २ ॥ (४)
मला निरखितां भवच्चरण-कन्यका आपगा ॥
ह्मणे अगइ ऐकिलेंहि न कधीं असें पाप गा ॥
कर श्रवणिं ठेविते. तुरवडि नेत्र, घे भीतिला ॥
न वाचिन भिडस मी जगिंहि कार्य-लोभी तिला ॥ ३ ॥ (१०)
सदैव नमितां जरी पद ललाट केलें किणें ॥
नसे इतर तारिता मज भवत्पदाब्जाविणें ॥
तता करुनि मुक्त ही ह्मणसि मी बुडालों रिणें ॥
अशा तुज न जो भजे मनु-ज, धिक् तयाचें जिणें ॥ ४ ॥ (११)

---

१ शुद्ध केलें. २ पापाचे राशीच केवळ ( असे लोक ). ३ जनीं सदाचार ( चांगलें आचरण करणारे ) बुध ( ज्ञानी पुरुष ) जें ( प्रथमचरणांतलें ) वर्णितात तें अनृत ( खोटें ) न ( नाही ). ४ ऐकणारे व बोलणारे ( लोक ). ५ तें प्रमाण न ( तें खरें नाहींत ) असें मी जर ह्मणेन तर. ६ हलकेपणास. ७ अथवा. ८ सुरभि ( कामधेनु ) जरी कोपली तरी विष कधींहि विणार ( देत ) नाहीं क्षीर ( दूधच ) देते. ९ तुमच्या पायांची कन्या ( पायांपासून उत्पन्न झालेली ) नदी ( भागीरथी ). १० या पद्यांत 'स्वभावोक्ति' नामक अलंकार आहे. ११ ललाट ( कपाळ ) किणें ( घट्टानें ) पद ( स्थान ) केलें. किंवा 'सदैव पद नमितां जरी ललाट किणें केलें'-कपाळास जरी घट्टे पडले असा अर्थ. १२ आपल्या चरणकमलावांचून.

